मुंबई शाळाखात्याकडून क्रमिक पुस्तक म्हणून शाळेंत लावण्यास
मंजूर केलेलें

# वाङ्‌मय-माला

पुष्प पहिलें

---


संपादक

प्रो० वा. म. जोशी, एम्. ए.

ना. म. पटवर्धन, एम्. ए., एल्. टी.


---


आवृत्ति चौथी

---

१९३६

---

किंमत १। रुपया

# अनुक्रमणिका

## विभाग १



## विभाग २



## विभाग ३

## विभाग ४

# पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना



'सामान्य' वाचकाला देखील ही 'वाङ्मय-माला' वाचनीय वाटण्यासारखी असली तरी ती विशेषेंकरून पाठशाळांमधील विद्यार्थ्यांकरितां रचिलेली आहे. पुस्तकांच्या बाजारांत अनेक गुच्छ, हार, माला वगैरे असतांना त्यांत या मालेची भर घालण्यामध्यें अर्थप्राप्तीशिवाय दुसरा कांहीं उद्दिष्ट अर्थ आहे काय, असा प्रश्न उत्पन्न होणें साहजिक आहे. या **'वाङ्मय-माले'**चे विशेष काय आहेत हें सांगितलें म्हणजे या प्रश्नाचें उत्तर मिळण्यासारखें आहे, म्हणून हे विशेष प्रथम सांगतों.

( १ ) मराठी गद्याचे एकोणिसाव्या व विसाव्या शतकांतलेच नमुने न देतां तत्पूर्वकालीन उतारेहि दिले आहेत. हेतु हा कीं मराठी गद्य आज आहे त्या स्थितींतच पूर्वीपासून होतें हा भ्रम नष्ट होऊन तें कांहीं बाबतींत पूर्वी किती भिन्न होतें हें ध्यानांत यावें. जुनें गद्य दुर्बोध असतें अशांतला भाग नाहीं हें पुस्तकांतील उतारे वाचले असतां ध्यानांत येईल. कांहीं शब्द कठीण आहेत तेथें पानाखालींच टीपा दिल्यामुळें अडचण भासत नाहीं. सदर उतारे केवळ जुने म्हणूनच वाचावयाचे असें नाहीं, तर सुंदर वाङ्मय म्हणूनहि ते वाचनीय आहेत.

( २ ) उतारे अगदीं त्रुटित किंवा अगदीं लहान लहान नाहींत तर ते स्वयंपूर्ण व भरघोस असे आहेत.

( ३ ) उताऱ्यांमध्यें त्या त्या लेखकांचें व्यक्तिवैशिष्टय व भाषावैशिष्टय हीं दृग्गोचर होतील अशा रीतीनेंच निवड करण्याचा प्रयत्न केला आहे.

( ४ ) केवळ सदुपदेशाकडे लक्ष न देतां कलादृष्टीनेंहि ज्यांत सौंदर्य आहे असे उतारे घेण्याकडे लक्ष दिलें आहे.

( ५ ) गद्य वाङ्मयाचे जे विविध प्रकार म्हणजे लघुकथा, नाटक, कादंबरी, गंभीर स्वरूपाचा निबंध, उपदेशपर प्रबंध, वर्णनपर लेख, विनोदी निबंध किंवा लेख, नाटयछटा इत्यादि सर्वांचा समावेश या मालेंत केला आहे.

( ६ ) वर्षामध्यें जेवढीं पानें सामान्यतः होतात त्याहून पुष्कळच अधिक

पानें घातलेलीं आहेत. हेतु हा, कीं शिक्षकाला आपल्या आवडीप्रमाणें धडे निवडतां यावेत. शिक्षकाला जे धडे आवडतात ते शिकवितांना त्याला जो आनंद होत असतो तो आनंद अमुक धडा पुस्तकांत आहे तेव्हां तो शिकविलाच पाहिजे अशा भावनेनें शिकवीत असतांना होणें शक्य नाहीं. शिक्षकाच्या आनंदी व सोत्साह वृत्तीचें प्रतिबिंब मुलांच्या वृत्तीवर पडत असतें हें ध्यानांत धरलें म्हणजे या गोष्टीचें महत्त्व ध्यानांत येईल. वर्गांत जे धडे होणार नाहींत ते मुलांनीं स्वतः वाचावेत अशी आमची इच्छा आहे.

(७) मुलांना धडे घरीं वाचतां यावेत म्हणून अगदीं आवश्यक तेथें टीपा दिल्या आहेत. त्याचप्रमाणें कोणत्या दृष्टीनें धडे वाचावेत हें त्यांना समजावें म्हणून कांहीं प्रश्न व सूचनाहि दिल्या आहेत. शिक्षकांचें साहाय्य होतां होईल तों कमी घ्यावें व प्रत्येक मुलानें आपआपल्या सवडीनुसार, आवडीनुसार, व शक्त्यनुसार अभ्यास करावा म्हणून अलीकडे 'डाल्टन प्लॅन' ( Dalton Plan ) म्हणून जो निघालेला आहे त्याला अनुसरून मराठी हा विषय शिकविण्याची कोणा शाळाधिकाऱ्यांना किंवा शिक्षकांना इच्छा झाली तर धड्याच्या अखेरीस दिलेले प्रश्न व वाचनीय ग्रंथांचे निर्देश हे त्यांना उपयुक्त होतील अशी आशा आहे. संदर्भ-ग्रंथांची यादीहि याच हेतूनें दिली आहे.

(८) प्रश्न व सूचना वगैरे देण्याचा खरा उद्देश म्हणजे मुलांनीं स्वतः विचार करावा, स्वतः उत्तरें शोधून काढावींत, बौद्धिक अन्न शिक्षक आपणांस भरवीत आहेत असें त्यांना वाटूं नये, तर स्वतःची बुद्धि चालविण्याचा सात्त्विक आनंद त्यांना वाटावा व त्यांचा आत्मप्रत्यय वाढावा असा आहे, आणि याच धोरणानें प्रश्नांची वगैरे योजना केलेली आहे.

(९) गद्यवाचनाचे असे हेतु सांगण्यांत येतात, कीं त्यामुळें (अ) मुलांच्या माहितींत भर पडावी, (आ) मुलांना स्वतः विचार करण्याची शक्ति यावी, (इ) स्वतःचे विचार शुद्ध, सरळ व शक्य तर सुंदर भाषेंत, व्यवस्थित व सुसंगत रीतीनें सांगतां यावेत, (ई) गद्यवाङ्मयांतील सौंदर्याचा रसास्वाद घेतां यावा, (उ) काव्यांतच नव्हे तर गद्यवाङ्मयांतहि सद्भावनांचें पोषण होईल असा जो भाग असतो त्यामुळें त्यांच्या भावनांवर सुसंस्कार व्हावेत व (ऊ) शक्य असल्यास मुलांनाहि आपआपल्या परीनीं

सुंदर वाङ्मय निर्माण करण्याची इच्छा व्हावी व अशी इच्छा झाल्यास त्यांच्या-पुढें सुंदर आदर्शभूत नमुने असावेत.

आम्हीं जे उतारे काढले आहेत त्यांत या सर्व गोष्टींचा शक्य तितका विचार केला आहे; व आम्हांला अशी आशा आहे, कीं ते मुलांना या सर्व दृष्टींनीं उपयोगी पडतील. आमची इच्छा मात्र अशी आहे, कीं प्रत्येक बाबतींत मुलांना शिक्षकाचा केवळ मार्गदर्शक म्हणून उपयोग व्हावा; बाकी भाषेंतील शुद्धता व सौंदर्य, विचारांतील न्यायशुद्धता व त्यांतील सूक्ष्म भेद, भावनांची सुसंस्कृतता व त्यांतील सुसंस्कृत माणसालाच कळणारे विरोधाभास, वगैरे सर्व गोष्टींमध्यें मुलांनीं आपण स्वतः डोकें चालवावें, व आत्मविकास करून घ्यावा. शिक्षकांनीं भरवावें व मुलांनीं घास घ्यावेत, हा प्रकार प्राथमिक शाळेंतहि चालूं नये, मग पाठशाळांमध्यें तर चालूं नये हें सांगावयासच नको. कोणत्याहि वाचनापासून जर फायदा व्हावयाचा असेल तर तो मुलांच्या स्वप्रयत्नानें जेवढा होईल तेवढा इतर कशानेंहि होणार नाहीं. **'आत्मैव ह्यात्मनोबंधुरात्मैव रिपुरात्मनः'**— हें अध्यात्मांतच नव्हे तर बौद्धिक क्षेत्रांतहि खरें आहे.

उदाहरणार्थ, भाषा सुधारणें ही एकच गोष्ट घेऊं या. उत्तम ग्रंथकारांची भाषाशैली चांगली म्हणून आपण म्हणतों व तिची वाखाणणी करतों; पण त्या ग्रंथकाराची स्वतःची अनन्यसाधारण अशी जी एक वृत्ति किंवा विचारसरणी किंवा त्याचें जें एक वैशिष्ट्य म्हणून असतें त्यामुळें ही भाषाशैली चांगली ठरते, तिच्यांतील उपमा-उत्प्रेक्षादि अलंकारांनीं किंवा बाह्य विशेषांवरून नव्हे. चेहऱ्यावरून किंवा पोषाखाच्या पद्धतीवरून एखाद्या मनुष्याची ओळख पटते खरी, पण त्याचें वैशिष्ट्य त्याच्या अंतरंगां-तच असतें. त्याचप्रमाणें एखाद्या ग्रंथकाराच्या भाषेच्या ठेवणीवरून व बाह्य विशेषांवरून तिची ओळख पटली तरी तिचें खरें स्वरूप त्या ग्रंथकाराच्या ग्रंथांत त्याच्या अंतरंगाचें जें प्रतिबिंब पडलेलें असतें त्यावरून ठरवावयाचें असतें. माणसाचें जसें अंतरंग तसा त्याचा पोषाख असतो; किंबहुना त्याची चेहरेपट्टी देखील अंतरंगाप्रमाणें बदलते असा अनुभव आहे; तीच स्थिति भाषेची आहे. हपूस आंबा व पायरी यांतील भेद हपूसचा तांबडा-पिवळा रंग असतो व आकार वर्तुलसदृश असतो, आणि पायरीचा रंग

हिरवा असतो आणि त्याचा आकार लांबट असून खालीं चोंच आलेली असते, या बाह्य चिन्हांवरून ओळखणें शक्य असलें तरी त्यांतील खरा भेद आंतररसाच्या आस्वादावरच अवलंबून असतो. एखादा तांबडा-पिवळा वर्तुलाकार रायवळ आंबा हपूससारखा दिसला म्हणून त्याला कोणी हपूस म्हणणार नाहीं व दुसरा एखादा रायवळ आंबा हिरव्या रंगाचा व अण-कुचीदार असला म्हणून त्याला पायरीची सर येणार नाहीं. भाषेचें अंतरंग हें मुख्य आहे व त्यावरून तिचें वैशिष्टय ठरविलें पाहिजे.

खरें म्हटलें असतां अंतरंग व बहिरंग हीं अभिन्न व अविभाज्य असून एकाचें स्वरूप अव्यक्त व दुसऱ्याचें व्यक्त असतें एवढाच त्यांत फरक आहे. वाक् आणि अर्थ हीं पार्वती-परमेश्वरांप्रमाणें अन्योन्याश्रयी आहेत असें कालिदासानें म्हटलें आहे. त्याप्रमाणेंच भाषाशैली व व्यक्ति यासंबंधानेंहि म्हणतां येईल; आणि या दृष्टीनेंच The style is the man असें कित्येक वेळां म्हणण्यांत येतें. नैतिक क्षेत्रांत ज्याप्रमाणें Manners make a man अशी एक इंग्रजींत म्हण आहे त्याप्रमाणेंच वाङ्मयक्षेत्रांतहि भाषाशैली व मनुष्याचें अंतरंग यांचा निकट, जिव्हाळ्याचा व परस्परावलंबी संबंध आहे असें म्हणतां येईल. आतां ही गोष्ट खरी कीं, मनुष्याचें अंतरंग ओळखणें साक्षेपतः कठीण असतें व शब्दांनीं तें सांगणें तर त्याहून कठीण असतें. अनुभविक व रसज्ञ जे असतात त्यांना हपूस–पायरी–रायवळ आंब्यां-मधला फरक समजेल, पण शब्दद्वारा तो सांगणें कोणालाहि कठीणच आहे; भाषेंतील रसभेदासंबंधानेंहि असेंच आहे. तथापि बाह्य चिन्हांवर भर देण्याची साहजिक प्रवृत्ति टाकून दिली व अंतरंगाकडे पाहण्याची वृत्ति पुष्ट केली तर हें कार्य कमीअधिक मानानें सुलभ होतें. त्या दिशेनें प्रयत्न मात्र पाहिजे व हा प्रयत्न ज्याचा त्यानेंच केला पाहिजे.

*बाह्य विशेषांकडे लक्ष द्यावयाचेंच नाहीं असें मात्र नव्हे;* ग्रंथकारांच्या भाषाविशेषांबद्दल बोलतांना किंवा लिहितांना फक्त बाह्य विशेषांवरच भर दिला जातो त्यावर मागील परिच्छेदाचा रोख आहे. शिवाजी-कालीन पत्रव्यवहारांत आरबी-फारसी शब्द फार येत असत ते कां येत होते, पेशव्यांच्या काळीं हें प्रमाण कां कमी झालें, आगरकरांच्या भाषेंत क्वचित् प्रसंगीं नवीन संस्कृत समासयुक्त शब्द कां असत व अगदीं क्वचित्

प्रसंगीं ग्राम्य भासणारे शब्द कां येत, टिळकांच्या भाषेंत जुन्या शास्त्रकारांची वचनें कां व आगरकरांच्या भाषेंत मिल्ल-स्पेन्सरादिकांचे विशेष उल्लेख कां वगैरेसारखे अनेक व अनेकविध प्रश्न मनोरंजकच नव्हे तर मानस-शास्त्रदृष्ट्या व दुसऱ्या दृष्टींनींहि उब्दोधक असतात व त्यांचा विचार अवश्य केला पाहिजे. बाह्य विशेषांचा विचार करूं लागल्यावर विरामचिन्हांचें अस्तित्व किंवा त्यांचा अभाव अशांसारख्या क्षुल्लक भासणाऱ्या गोष्टीं-पासून ते शाब्दिक कोट्यांचें किंवा उपमादि अलंकारांचें अल्पत्व किंवा प्राचुर्य, आरबी-फारसी शब्द टाळण्याचे बुद्धिपुरःसर प्रयत्न इष्ट किंवा अनिष्ट अशा महत्त्वाच्या मुद्द्यांपर्यंत बऱ्याच गोष्टींकडे मुलांचें लक्ष गेलेंच पाहिजे, व न गेलें तर शिक्षकानें वेधलें पाहिजे असें आमचें मत आहे. आणि म्हणूनच अशा तऱ्हेच्या प्रश्नांचें दिग्दर्शन आम्हीं धड्यांच्या शेवटीं दिलेले प्रश्न व सूचना यांमध्यें केलेलें आहे.

तुरळक मराठी शब्दांचा जन्म सातव्या, आठव्या किंवा कोणत्याहि शतकांत झालेला असो,—ज्याला वाङ्मय असें म्हणतां येईल तें इसवी सनाच्या बाराव्या-तेराव्या शतकांत जन्मास आलें, व पुढें त्याला बाळसें आलें. या बालकाला वैदिक अभिजात संस्कृत; महाराष्ट्री, शौरसेनी वगैरे प्राकृत व त्यांचे अपभ्रंश; कानडी, तेलगू वगैरे द्राविड भाषा; तसेंच आरबी, फारसी, पोर्तुगीज, इंग्रजी वगैरे हिंदुस्तानाबाहेरील भाषा यांनीं तें लहान असतांना कोणीं स्तन्यपान करवून तर कोणीं अंगलेणीं देऊन, व तें मोठें होऊं लागल्यावर कोणीं शब्दभांडार समृद्ध करून, तर कोणीं विचारांना हरतऱ्हेचें वळण लावून, प्रस्तुतच्या वर्धिष्णु, आत्मप्रत्यययुक्त, विविधविलासप्रवण, पराक्रमाकांक्षी व अभिनन्दनीय स्थितीप्रत आणून सोडलें आहे. ही स्थिति अर्थात् एकदम आलेली नाहीं, व मध्यन्तरीं संकटें, गंडांतरें वगैरे आलीं नाहींत अशांतलाहि भाग नाहीं पण सर्व गंडांतरांतून निभावून आज मराठी वाङ्मयाला जी कांहीं अंशांनीं कौतुकास्पद व अभिमानास्पद स्थिति प्राप्त झाली आहे तिचें श्रेय पुष्कळांकडे जातें. त्यांपैकीं कांहींचा थोडक्यांतच पुढें उल्लेख केलेला आहे.

पहिल्या प्रथम महानुभावांचा उल्लेख केला पाहिजे. मराठींतील व्याकरणाचीं, चरित्र-ग्रंथांचीं, धर्मतत्त्व-विवरणपर ग्रंथांचीं वगैरे बीजें यांच्या वाङ्मयांत

सांपडतात. पंडित भीष्माचार्य महानुभाव यानें एक व्याकरणाचें पुस्तक केलें असून त्याचें नांव पंचवार्तिक असें आहे. हें सूत्रात्मक पद्धतीनें लिहिलें असून त्यांत सूक्ष्मत्व किंवा सुसंघटित्व विशेष नाहीं. महानुभावांचे धर्मतत्त्व विवरण करणारे सिद्धांतसूत्रपाठादि ग्रंथ देखील सूत्रात्मक असून त्यांत खोलपणा, व्यापक दृष्टि, किंवा सुश्लिष्टत्व हे गुण विशेष दिसून येत नाहींत. या क्षेत्रांतील गद्यांत लिहिलेले आद्य ग्रंथ म्हणून त्यांचा उल्लेख करावयाचा एवढेंच. महानुभावांच्या चरित्रग्रंथांची एक स्वतंत्र पोथी असते. ही पोथी अद्याप प्रसिद्ध झालेली नाहीं. हल्लीं या चरित्रग्रंथांच्या ज्या पोथ्या मिळतात त्यांत श्रीदत्तात्रेयचरित्र, श्रीकृष्णचरित्र, श्रीचक्रपाणिचरित्र, श्रीऋद्धिपुरचरित्र आणि लीलाचरित्र अशीं पांच चरित्रें असतात असें य० खु० देशपांडे म्हणतात. या चरित्रग्रंथांत हल्लींच्याप्रमाणें गुण-दोष-विवेचन, समकालीन सामाजिक परिस्थितीचें विवेचन वगैरे कांहीं सांपडणार नाहीं असें प्रसिद्ध झालेल्या त्रुटित भागावरून दिसतें. तथापि ज्यांचें चरित्र लिहावयाचें त्याबद्दलच्या आठवणी, किंवा त्याचीं म्हणून दिलेलीं तत्त्वें स्वीकारतांना सावधगिरी ठेविली पाहिजे हें तत्त्व लीलाचरित्राच्या भिन्न भिन्न पाठांचा इतिहास देणाऱ्या महानुभाव ग्रंथकाराला माहीत होतें असें दिसतें. (य० खु० देशपांडे यांचा लेख पहा. इतिहास-संशोधक मंडळ, सप्टेंबर १९३२.)

नंतर मुसलमानी अंमलाला श्रेय दिलें पाहिजे, कारण त्यामुळें मराठी भाषेंत शब्दांची पुष्कळच भर पडली. पण ही भर फार झाली असती तर अजाण झालें असतें व रक्त बिघडलें असतें. किंबहुना मराठी भाषा मृत होऊन आरबी-फारसी भाषांच्या आहारीं पडली असती. ही आपत्ति शिवाजीमहाराजांच्या पराक्रमामुळें व राज्यव्यवहारादि कोशांच्या बुद्धिपुरःसर निर्मितीमुळें व मराठीबद्दलच्या अभिमानपूर्वक आग्रहामुळें टळली. या काळीं व तदनंतर संतकवींनींहि मराठी भाषेंत सुंदर निर्मिति करून तिचें शुद्ध स्वरूप राखलें. शिवाजीच्या काळीं आरबी शब्दांचें प्रमाण शेंकडा साठांचे वर गेलें होतें असें कै० वि. का. राजवाडे जें म्हणतात तें सामाजिक व राजकीय व्यवहारांतल्या शब्दांचें आहे. रामदासांचीं व त्यांच्या शिष्यांचीं जीं पत्रें प्रसिद्ध झालीं आहेत त्यांत एवढें प्रमाण पडत नाहीं हें ध्यानांत धरण्याजोगें आहे. संतकवींच्या धार्मिक, तात्त्विक व

पौराणिक वाङ्मयांत तर भाषेचें बरेंच शुद्ध स्वरूप सांपडतें. राजकीय व्यवहारांत मात्र आरबी-फारसीनें कहर केला होता. तथापि यासंबंधीं दोन मुद्दे ध्यानांत धरले पाहिजेतः—

( अ ) एक असा कीं, आरबी-फारसीनें कितीहि कहर केला असला तरी मराठीच्या '**प्रकृती**'वर व स्वभावावर तिचा परिणाम फारसा झाला नाहीं. नाम-विभक्ति व क्रियाविभक्ति यांतील प्रत्यय परभाषेंतून आला म्हणजे भाषेच्या मूळप्रकृतीवर किंवा स्वभावावर परिणाम झाला म्हणावयाचा; एरव्हीं बाह्य पोषाखावर व शरीरावरच परिणाम झाला आहे असें मानावयाचें असा शास्त्र-कारांचा सिद्धान्त आहे. या दृष्टीनें पाहतां मराठीनें आरबी-फारसीपासून एकहि प्रत्यय कायमचा घेतलेला नाहीं ही अभिमानपूर्वक नमूद करण्या-सारखी गोष्ट आहे. चतुर्थीचा 'ला' प्रत्यय हा फारसी 'रा' प्रत्ययापासून आला असें कै० वि. का. राजवाड्यांचें मत होतें, पण 'ला' प्रत्यय संस्कृत 'लग्' धातूपासून झालेल्या 'लागीं' शब्दापासून झालेला आहे असें बाकीच्या तज्ज्ञांचें मत आहे. 'देशमुख', 'कारकून', 'हुद्देदार' या शब्दांची प्रथमेच्या अनेकवचनांचीं 'देशमुखान्', 'कारकुनान्', 'हुद्देदारान्' अशीं रूपें फारसी धर्तीवर कांहीं वर्षें वापरण्यांत येत होतीं, पण ही रीत लवकरच मागें पडली. ( हल्लीं आपण जसें इंग्रजी वळणावर जाऊन "त्यानें १०० **रन्स** काढल्या," "हल्लीं **मोटर्स** फार झाल्या आहेत" अशीं अनेकवचनी रूपें उपयोगांत आणतों त्याप्रमाणेंच शिवाजीच्या काळीं 'कारकुनान्' वगैरे अनेकवचनी रूपें उपयोगांत येत असत.) शब्दांच्या पाठीमागें येणारीं शब्दयोगी अव्ययें मराठीच्या स्वभावाला मानवत नाहींत; 'केल्यावांचून' असें आपण म्हणूं, पण फारसी पद्धतीनें 'विनाकेल्या' असें म्हटल्यानें आपलें समाधान होत नाहीं; आणि म्हणूनच कीं काय, आपण 'विनाकेल्यावांचून' असें कित्येक वेळां म्हणतों ! मराठीचा मूळस्वभाव असा जरी असला तरी बिन, बे, बर वगैरे फारसी पूर्वगामी शब्दयोगी अव्ययें मराठीनें आपलीशीं केलीं आहेत. किल्ले पुरंदर ( किल्ला इ पुरंदर The fort of Purandar ), तालुके माणगांव ( तालुका इ माणगांव–The taluka of Mangav ) अशा शब्दसमूहां मध्यें फारसी 'ई' हें पूर्वगामी अव्यय मराठींत बेमालूम रीतीनें कायम राहिलें आहे हें ध्यानांत धरण्यासारखें आहे. तसेंच विशेषणें विशेष्याच्या पुढें

घालण्याची कांहीं प्रसंगीं दिसून येणारी लकब फारसीपासून उसनी घेतलेली आहे. 'शपथ खाणें, वगैरे वाक्प्रचार फारसीवरून मराठीनें घेतले आहेत, आरबी-फारसी शब्द व वाक्प्रचार घेऊन ते मराठीनें जिरवले व आत्मसात् केले हें तिच्या जिवंतपणाचें लक्षण होय हें जरी कबूल केलें तरी आरबी-फारसी भाषांचें शब्दसंपत्तिविषयक ऋण नाकबूल करून कसें चालेल?

(आ) दुसरा मुद्दा असा कीं, मराठीला कोणत्याहि मुसलमानी बादशहानें साहाय्य दिलें नाहीं अशी जी समजूत आहे ती चुकीची आहे. या बाबतींत कृ. पां. कुलकर्णी एका लेखांत म्हणतात तें जसेंच्या तसें खालीं उतरून घेतलें आहे. "सन १५२९ मध्यें बुऱ्हाण निजामशहानें महाराष्ट्री ब्राह्मण आपल्या दिवाणगिरीवर नेमला. ह्याच्या कारकीर्दीत ब्राह्मणी कारकुनाच्या फर्डेशाहीस चांगला मान मिळाला असावा आणि त्या योगें मराठीची जोपासना झाली असावी. सन १५५५ मध्यें इब्राइम आदिलशहा विजापूरच्या तख्तावर बसला. हा मराठ्यांच्या शौर्यधैर्यादि युद्धोपयोगी गुणांचा चाहता होता. त्यांच्या व्यवहारज्ञानाची पारख करणारा, हिंदु-मुसलमान असा दुजाभाव उत्पन्न झाला असतां हिंदूंचा कैवार घेणारा अशा समवृत्तीचा असा हा बादशहा असल्यामुळें ह्याच्या अमदानींत मराठी भाषा आणि मराठा समाज ह्यांना योग्य मान मिळूं लागला. मोठमोठ्या हुद्द्यांवर पुष्कळ मराठ्यांची योजना झाली. इतकेंच नव्हे तर दरबारांत मराठीचा शिरकाव झाला; आणि सर्व बादशाही दफ्तरहि मराठींत ठेवण्याविषयीं बादशहाचें फर्मान निघालें. खुद्द बादशहांनींच मराठी भाषेची तळी उचलल्यावर मग तिला हातभार लावण्यास साहजिकच दरबारांतील हिंदु मुत्सद्दी पुढें आले. आदिलशाहींत मुरार जगदेव, यानतराव; निजामशाहींत साबाजी अनंत; कुतुबशाहींत अकरस मानजी, मधो भानजी (आकण्णा, मादण्णा), जायण्णा लिंगरस,–ह्या सर्वांनीं एक जवळ जवळ परंपराच स्थापिली. ह्या परंपरेचा आद्य प्रवर्तक हेमाद्रिपंत म्हणावयास हरकत नाहीं."

आरबी-फारसीप्रमाणें पोर्तुगीज भाषेनेंहि मराठींत भर घातली आहे, पण तिच्या आंतरप्रकृतींवर या भाषेचा कांहीं एक परिणाम झालेला नाहीं. हपूस, साबण, पिस्तुल, शिरपेंच, कंपु, परात, गर्नाळ (तोफ), गारदी इत्यादि शस्त्रास्त्रविषयक किंवा पोषाखासंबंधीं किंवा युरोपियन पदार्थांसंबंधीं पुष्कळ

शब्द पोर्तुगीज भाषेनें आपणांस दिलेले आहेत, व ते आपण आपली प्रकृति बिघडवून न घेतां पचविले आहेत ही उभयपक्षी अभिनन्दनीय गोष्ट आहे.

पेशवाई सुरू झाल्यावर आरबी-फारसीचें व पोर्तुगीज भाषेचें माहात्म्य कमी होऊं लागलें, पण पेशव्यांनीं शिवाजीप्रमाणें बुद्धिपुरःसर मराठीच्या अभिवृद्ध्यर्थ कांहीं केलें आहे असें दिसत नाहीं. भूगोलविषयक माहिती, लढायांचीं वर्णनें, युद्धकलेबद्दल व राजनीतीबद्दल माहिती, यांची या कालांत वास्तविक फार जरूर होती; पण तद्विषयक पुस्तकें मात्र झालीं नाहींत. स्वास्थ्य नव्हतें, काळ धामधुमीचा होता हें कदाचित् कारण असेल. १७८९ सालीं 'नारायण-व्यवहार शिक्षा' नांवाचा एक राजनीत्युपदेश करणारा लहानसा ग्रंथ 'नारायण' नामक कोणीं गृहस्थानें श्रीमंत सवाई माधवरावांकरितां लिहिला, पण तो अगदीं बालोपयोगी आहे. बखरी मात्र बऱ्या लिहिल्या गेल्या, पण त्या पेशव्यांच्या प्रेरणेमुळें नव्हे, तर तत्कालीन जरूरीमुळें. एवढें मात्र झालें कीं मराठी योद्ध्यांनीं व मुत्सद्द्यांनीं अटकेपर्यंत सर्व हिंदुस्थान आक्रमिल्यामुळें सहजगत्याच त्यांच्या पराक्रमाबरोबर मराठीचें क्षेत्र वाढलें. बडोदें, इन्दूर, ग्वाल्हेर या संस्थानांत तर कालपरवांपर्यंत दफ्तरें मराठींत असत ! मराठी मुत्सद्देगिरीचा व राजकारणाचा व्याप वाढल्यामुळें तत्कालीन राजकीय पत्रव्यवहाराला, लढायांच्या वगैरे वर्णनाला मराठी भाषा समर्थ झाली, पण पेशव्यांच्या प्रयत्नांमुळें हा परिणाम घडून आला असें नाहीं. तत्कालीन लोक युद्धाचे व राजकारणाचे खेळ खेळत होते, तत्संबंधीं डावपेंच करीत होते, चढाई करीत होते किंवा प्रसंग पडल्यास माघार घेत होते आणि या सर्वांबद्दल आपआपल्या वरिष्ठांना किंवा दोस्तांना हकीकती लिहीत होते, त्यामुळें तत्कालीन पत्रव्यवहार मात्र हल्लींच्या आपल्या निर्जीव व पोरकट पत्रव्यवहारापेक्षां अधिक भरीव, रसाळ, विविध भावना चित्रित करणारा आणि मनोवेधक असा होता. त्यांत अरबी-फारसी शब्द असत, पण शिवकालीन पत्रव्यवहारापेक्षां कमी असत. प्रो० पोतदार म्हणतात त्याप्रमाणें "फारसी भाषा पोटीं पचवून पुनरपि संस्कृताभिमुख होऊन आमचे वीर-मुत्सद्दी कशी डौलदार, घाटदार, ऐटबाज व राजश्रीया विराजित राजमान्य भाषा बोलूं-लिहूं लागले होते" हें तत्कालीन पत्रव्यवहारांवरून दिसून येतें.

१८१८ मध्यें पेशवाई मावळून आंग्लाइ उगवली. आंग्लाईमुळें प्रथम

कांहीं इंग्रजी पुस्तकांचीं भाषान्तरें वगैरे होऊन क्रमिक व शालोपयोगी पुस्तकांची मराठींत भर पडली. परशुरामपंत गोडबोले, कृष्णशास्त्री चिपळूणकर, पारखी वगैरेंनीं कांहीं संस्कृत व इंग्रजी पुस्तकांचीं भाषान्तरें केलीं तीं चांगल्या वाङ्मयांत मोडण्यासारखीं आहेत. सात शास्त्र्यांनीं केलेला मराठी-मराठी कोश, मोल्सवर्थनें केलेला मराठी-इंग्रजी कोश व कँन्डीनें केलेला इंग्रजी-मराठी कोश, तसेंच दादोबा पांडुरंग यांनीं केलेलें व्याकरण यांनीं मराठीला व्यवस्थित स्वरूप आणण्यास मदत केली. कालान्तरानें कादंबऱ्या-नाटकें वगैरेचीं भाषान्तरें व रूपान्तरें झालीं कीर्तन्यांसारख्यांनीं 'माधवराव पेशवे' या पुस्तकासारखीं कांहीं थोडीं चांगलीं स्वतंत्र पुस्तकेंहि लिहिलीं. न्यायमूर्ति रानडे, विष्णुशास्त्री चिपळूणकर वगैरेंनीं आपआपल्या पद्धतीनें मराठीचा पुरस्कार केला व बुद्धिपुरःसर ती संपन्न करण्याचा प्रयत्न केला. १८७४ पासून, म्हणजे निबंधमालेच्या आरंभापासून, मराठीच्या स्वतंत्र युगाला आरंभ झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. परंतु 'स्वतंत्र' एवढ्याच अर्थानें म्हणावयाचें कीं, इंग्रजी पुस्तकें वाचून त्यांतील मजकूर पचवून व आपलासा करून, थोड्याश्या स्वतंत्र बुद्धीनें तो मजकूर मराठींत देण्याचा उपक्रम या युगांत झाला. अगदीं स्वतंत्र विचार टिळक, राजवाडे वगैरे वाङ्मय-सेवकांमध्यें अलीकडील वीसपंचवीस वर्षांत दिसूं लागला आहे, पण अशी मंडळी फारच थोडी. अर्थात् जगाच्या वाङ्मयीन संसारांत मराठीला विशेष किंमत नाहीं हें दुःखदायक असलें तरी यथायोग्यच आहे.

इंग्रजीचा मराठीवर जो परिणाम झालेला आहे त्याचा विचार तीन दृष्टींनीं करतां येईल. ( १ ) शब्द, वाक्प्रचार वगैरेमध्यें पडलेली भर; ( २ ) वाङ्मयप्रकारामध्यें पडलेली भर व ( ३ ) धार्मिक, सामाजिक, तात्त्विक, राजकीय वगैरे विचारांना मोठे धक्के बसून विचारांमध्यें व संसाराकडे पाहण्याच्या दृष्टीमध्यें घडून आलेली क्रान्ति, स्वातंत्र्यप्रीति, स्वत्वाची जाणीव वगैरे वगैरे. यांपैकीं तिसरा परिणाम सर्वांत महत्त्वाचा असून त्याचा आपण जराशानें विचार करूं. ( १ ) पहिल्या मुद्द्याचा विचार करतां असें दिसून येतें कीं इंग्रजीनें मराठीला पुष्कळ शब्द दिले आहेत, इतके कीं त्यांची गणती करणें कठीण. शब्दच नव्हे तर कांहीं वाक्यरचना व वाक्प्रचार इंग्रजीनें दिले आहेत. उदाहरणार्थ,—" नेपोलिअन, जो मोठा नामांकित सेनापति होता,

तो इ. इ." अशा प्रकारची संबंधीसर्वनाम-घटित वाक्यरचना इंग्रजीवरून आपण घेतलेली आहे. इंग्रजी अप्रत्यक्ष-निवेदन-पद्धतीचाहि ( Indirect form of narration ) मराठीवर परिणाम होऊं लागला आहे. ( एखादे वेळेस पुढीलप्रमाणें केलेल्या भाषान्तरांत हा परिणाम हास्यास्पद स्वरूपांत दिसून येतो. The Sahib asked the boy who he was. The boy replied that he was the eldest son of the Mamlatdar. याचें भाषान्तरः--तो कोण होता असें साहेबानें मुलाला विचारलें. मामलेदाराचा तो थोरला मुलगा होता असें मुलानें उत्तर दिलें. तो 'आपल्या घरीं गेला' असें न म्हणतां अलीकडे कांहीं मुलें 'तो त्याच्या घरीं गेला' असें म्हणतात हा देखील इंग्रजीचाच परिणाम.) 'उत्तरणें' 'स्मितणें, वगैरे नामधातु निर्माण करण्याची पद्धति ज्ञानेश्वर-कालापासूनची आहे; पण हरिभाऊ आपटयांनीं तिचें पुनरुज्जीवन केलें तें इंग्रजीच्या स्फूर्तीमुळें. चळवळींत भाग घेणें (to take part in the movement),उमेदवार म्हणून उभा राहणें ( to stand as a candidate ), परीक्षेंत चांगलें किंवा वाईट करणें ( to do well or ill in an examination ) वगैरे वाक्प्रचार मराठींत आहेत किंवा येऊं पहात आहेत ते इंग्रजीवरून घेतलेले आहेत.

( २ ) शोकपर्यवसायी नाटकें, कादंबऱ्या, लघुकथा, गंभीर स्वरूपाचे निबंध, विनोदी निबंध, इतिहास, चरित्रें हे वाङ्मयप्रकार आपल्याकडे बीजरूपानें असतील, पण त्यांची सुसंघटित व कलात्मक स्वरूपें आपणांस इंग्रजीवरून कळलीं व त्यांचें अनुकरण होऊं लागून आतां हे वाङ्मयप्रकार थोडयाबहुत स्वतंत्रतेनें व बऱ्याच प्रमाणांत दृग्गोचर होऊं लागले आहेत.

( ३ ) इंग्रजी वाङ्मयाचा सर्वांत अधिक महत्त्वाचा परिणाम म्हणजे मराठी भाषा बोलणाऱ्या व लिहिणाऱ्या लोकांच्या विचारांवर व मनोरचनेवर झालेला परिणाम होय. इंग्रजी वाङ्मय हें 'वाघिणीचें दूध' आहे असें विष्णुशास्त्री चिपळूणकर जें म्हणाले त्याचा अर्थ काय असेल तो असो. एवढें मात्र खरें कीं, हें वाघिणीचें दूध प्यायलेल्या मनुष्याच्या मनामध्यें फार रूपान्तर होतें. धर्माचीं मुळें व ऋषींचीं कुळें शोधणें इतके दिवस निषिद्ध मानिलें गेलें होतें; पण वरील दुधावर पोसलेले लोक हीं मुळें व कुळें

शोधूं लागले; व श्रद्धा, शास्त्रें, आप्तवचनें, बाबावाक्यात्मकप्रमाणें, परंपरा, रूढी, चालीरीती इत्यादिकांना धाब्यावर बसवून तर्क, सदसद्विवेक, स्वानुभव, भौतिकशास्त्रें, प्रत्यक्षप्रमाणें इत्यादिकांचा गौरव करूं लागले. सदर 'वाघिणीचें दूध' अंगीं मुरलेले लोकहितवादी देशमुख आपला समाज नासकासडका झाला आहे असें म्हणूं लागले; भांडारकरांनीं 'प्रार्थना समाज' काढला; व रानडयांनीं 'राष्ट्रीय सभा' काढली. टिळक राजकारणक्षेत्रांत सिंहासारखा पराक्रम करण्याची महत्त्वाकांक्षा बाळगूं लागले; आगरकर सामाजिक व धार्मिक रूढींचें व चालीरीतींचें रान मुळासकट तोडून टाकून समाजक्षेत्रांत अज्ञेयवादाचीं, तर्कप्रतिष्ठेचीं, स्त्री-पुरुष-समतेचीं, प्रेमविवाहाचीं, उपयुक्ततावादाचीं, व्यक्तिमाहात्म्याचीं वगैरे बीजें पेरूं लागले व नवीनच समाजोद्यान उत्पन्न करण्यास प्रवृत्त झाले. 'काळ-कर्ते' शिवरामपंत परांजपे, 'भालाकार' भोपटकर बंधू, सावरकर वगैरे राजकीय स्वातंत्र्याची उद्‌घोषणा करूं लागले. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांनीं विनोदी वाङ्मयाच्या योगें समाजांतील कुकल्पना व धर्मभोळेपणा वगैरेचा बीमोड करण्यास प्रारंभ केला. कृ. प्र. खाडिलकरांनीं नाटकाच्या द्वारें सरकारानुकूल ढोंगीसोंगी लोकांची टर उडविण्यास आरंभ केला, व अशा तऱ्हेनें समाजामध्यें असंतोष व खळबळ उत्पन्न होऊन विचार-विकारांचे जुने बंद तुटले, जुनीं आश्रयस्थानें नष्ट झालीं, पण त्यांच्या स्थानीं नवीनाची प्राणप्रतिष्ठापना मात्र पुरतेपणीं झाली नाहीं.

या विचारात्मक अवस्थान्तराचा मराठी वाङ्मयावर परिणाम होऊन तें पूर्वीपेक्षां अधिक जोरकस व स्वतंत्र होऊं लागलें. विचार-विकारामध्यें एक प्रकारचें नवचैतन्य किंवा नवयौवन उत्पन्न झाल्यामुळें साहसप्रियता, विविध विलासप्रियता, विविधकलाभक्ति वगैरे गुणहि मराठी वाङ्मयांत विलसूं लागले. आणि ते नाटकें, कादंबऱ्या, लघुकथा, नाटयछटा इत्यादि रूपांमध्यें दृग्गोचर होऊं लागले. शारीरिक नवयौवनामध्यें ज्याप्रमाणें अंगकान्तीकरितां, डोळ्यांतील तेजाकरितां, मनगटांतील जोराकरितां किंवा हावभावांच्या वगैरे सौंदर्याकरितां निराळे परिश्रम विशेष घ्यावे लागत नाहींत, तर या गोष्टी नवयौवन बरोबरच घेऊन येतें त्याप्रमाणें विचारात्मक नवयौवनाचेंहि आहे. हें नवयौवन जेथें असेल तेथें अलंकारादिकांचें विशेष शिक्षण घ्यावें न लागतां

भाषेंत निरनिराळे रंग-ढंग दिसूं लागतात, स्वतंत्रतेचें पाणी खेळूं लागतें, आत्मप्रत्ययाचें तेज चमकूं लागतें, व सहजगत्याच विलासामध्यें विविधता, धाडस, बेफिकीरपणा इत्यादि गुण दिसूं लागतात !

नवयौवन अभिनन्दनीय असलें तरी तें सर्वगुणपरिपूर्ण किंवा निर्दोष असतें असें नाहीं. नवयौवनावस्थ मराठी लेखकांमध्यें अद्यापि पुष्कळ उणीवा आहेत. त्यांच्या विचारांच्या स्वतंत्रपणाला विविध व विस्तृत अनुभवाचा आधार नाहीं, व व्यासंगाचें पाठबळ नाहीं; विचारांत खोली नाहीं व खोल विचारामुळें येणारी विनयशीलता व परविचारसहिष्णुताहि अर्थात् नाहींच. विचार केवळ स्वतंत्र असून चालत नाहीं; तो गहन पाहिजे, अनुभवांवर आधारलेला पाहिजे, विविधांगी पाहिजे, व्यापक पाहिजे, व सुसंघटित पाहिजे. त्यावर त्या व्यक्तीचा पूर्ण विश्वास पाहिजे, त्याकरितां जीवितसर्वस्वाचा होम करण्यास ती तयार पाहिजे. असें असेल तरच त्या विचारस्वातंत्र्याची महती. विलासप्रियतेची व कलाभक्तीची देखील अशीच गोष्ट आहे. विलासामध्यें स्वातंत्र्य असावें हें कबूल; पण तें सुसंस्कृत तरी असलें पाहिजे ना ? कलाभक्ति अवश्य असावी, कलाभक्तानें नीतीचें वगैरे फाजील स्तोम माजूं देऊं नये, हें कबूल; पण कलेला नीतीचीं नसलीं तरी स्वतःचीं बंधनें पाळलीं पाहिजेत ना ? आणि हीं स्वतःचीं बंधनें पाळावयाचीं म्हणजे नीति व सत्य या तिच्या भावंडांचा बुद्धिपुरःसर अवमान होऊं न देण्याबद्दल काळजी घ्यावयास नको काय ? बाकी खरें पाहिलें असतां सध्यां वाङ्मयात्मकलेची भक्ति नाहींच आहे. भक्तीचें सोंग-ढोंग मात्र पुष्कळ आहे. असो. मराठी आतां स्वातंत्र्ययुगांत नुकती कोठें प्रवेश करीत आहे, तेव्हां प्रथम प्रथम कांहीं दोष व व्यंगें उत्पन्न होणें साहजिक आहे; पण एकंदरींत भविष्यकाल उज्ज्वल दिसतो आहे यांत शंका नाहीं.

आठशें-नऊशें वर्षांतील या भाषेचीं सर्व अवस्थान्तरें वर जीं केवळ दिग्-दर्शित केलीं, तीं प्रातिनिधिक उताऱ्यांच्या द्वारें प्रस्तुतसारख्या पाठ-शालोपयोगी पुस्तकांत परिपूर्णतेनें दाखविणें शक्य नाहीं; तथापि त्या दिशेनें आम्हीं प्रयत्न केला आहे. पुस्तकाच्या आकारमर्यादेमुळें त्यांत कित्येक जुन्या व नव्या चांगल्या ग्रंथकारांचा आम्हांला समावेश करतां आला नाहीं, पण या बाबतींत आमचा नाइलाज होता हें कोणीहि कबूल करील. जुने ग्रंथकार

सोडून दिले व अलीकडील दहावीस वर्षांतीलच विचाराकरितां घेतले, तर त्यांपैकीं किती तरी चांगल्या चांगल्या ग्रंथकारांना या पुस्तकांत स्थान मिळालेलें नाहीं असें दिसून येईल. या ग्रंथकारांपैकीं कांहीं आमचे स्नेही असून त्यांच्या ग्रंथांतील उतारे घेण्याची आम्हांला फार इच्छा होती; पण निवडून काढलेले उतारे पुस्तकाच्या आकारमर्यादेमुळें निर्दयतेनें बाजूला सारावे लागले. पण असल्या पुस्तकांत हें सर्व अपरिहार्यच असतें.

ज्यांचे उतारे घेतलेले आहेत त्यांचें जीवनचरित्र व त्यांचा वाङ्मयसंसार याबद्दल थोडी माहिती पुस्तकाच्या अखेरीस दिलेली आहे व अधिक माहिती कोठें मिळूं शकेल याचें दिग्दर्शन केलेलें आहे. वाङ्मयसंसाराचा व जीवनचरित्राचा कार्यकारणसंबंध निश्चित रीतीनें नेहमींच सांगतां येईल असें नाहीं; पण कित्येक प्रसंगीं एकमेकांचा एकमेकांवर परिणाम झालेला असतो यांत शंका नाहीं. ग्रंथकर्त्यांच्या जीवनचरित्राचा त्याच्या वाङ्मयाशीं कांहीं संबंध आहे काय हा प्रश्न अतिशय मनोरंजक आहे; व अल्पचरित्रें देऊन हा प्रश्न सुटण्यासारखा नाहीं हें ठाऊक असतांना देखील आम्हीं तीं दिलेलीं आहेत यांतील बीज एवढेंच कीं, ग्रंथकाराविषयीं ठळक ठळक गोष्टी तरी मुलांना माहीत व्हाव्यात व पुढेंमागें त्यांनीं अधिक माहिती मिळवून ग्रंथकाराचें जीवन व त्याचें वाङ्मय यांतील धागे कांहीं जुळवितां आल्यास पहावें. ग्रंथकारांची माहिती शक्य तों त्यांच्याकडूनच मागवून व क्वचित् प्रसंगीं त्यांच्याच शब्दांत दिलेली आहे. कोणी चुका दाखविल्यास पुढील आवृत्तींत दुरुस्त करतां येतील.

उतारे घेण्याची परवानगी दिल्याबद्दल व माहिती पुरविल्याबद्दल ग्रंथकारांचे (किंवा त्यांच्या आप्तांचे ) तसेंच 'रत्नाकरा'दि मासिकांच्या चालकांचे आभार मानावेत तेवढे थोडे आहेत. त्यांनीं हें जें केलें तें आमच्यावर त्यांचा जो लोभ आहे त्यामुळें केलें आहे हें आम्ही ओळखून आहों. सर्वांच्या या लोभाचा विचार मनांत येऊन आमच्या हृदयांत आतां काय होत आहे हें सांगण्याचा प्रयत्न न करतां या लोभाला पात्र होण्याचा आम्ही प्रयत्न करूं एवढेंच आम्ही सांगतों.

राजगुरु आणि कंपनी या छापखान्याचे मालक रा. बापूराव राजगुरु यांनीं

आपलेपणानें आम्हांला जी मदत केली तिचाहि उल्लेखच करतों, अधिक विस्तार करीत नाहीं.

या पुस्तकाची उपयुक्तता कितपत ठरावयाची असेल ती ठरो; व त्याचें जें भवितव्य व्हावयाचें असेल तें होईलच. एवढी गोष्ट निश्चित, कीं उतारे काढतांना व तदनंतर ते वाचतांना, टीपा लिहितांना, प्रश्न व सूचना लिहितांना, चरित्रें लिहितांना वगैरे आम्हां उभयतांना जें सहकार्य करतां आलें व हें सहकार्य करतांना उभयतांना जो निरतिशय सात्त्विक आनंद चाखतां आला त्याची योग्यता कांहीं निराळीच ! ती शब्दांनीं सांगण्याचा आम्ही प्रयत्नच करीत नाहीं.

हिंगणें,<br>
१ जानेवारी १९३३.<br>
पौष शु॥ ५मी १८५४

वा० म० जोशी<br>
ना० म० पटवर्धन

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना



हें पुस्तक खाळाखात्यांनीं क्रमिक पुस्तक म्हणून मंजूर केल्यामुळें त्याची पहिली आवृत्ति लौकरच संपून ही दुसरी आवृत्ति काढण्याचा योग येत आहे हें पाहून आनंद होतो.

ज्या ज्या शाळांमध्यें हें पुस्तक लावलें असेल त्या त्या शाळांतील शिक्षकांनीं या पुस्तकांत अध्यापनदृष्ट्या (किंवा इतरहि दृष्ट्या) जे दोष असतील ते कळविल्यास व इतरहि कांहीं सूचना केल्यास आम्ही त्यांचा ( तिसऱ्या आवृत्तीचा सुयोग आल्यास त्या वेळीं ) अगत्य विचार करूं. पहिल्या आवृत्तींतील कांहीं चुका व उणीवा दाखविल्याबद्दल प्रो० पोतदार व इतर मित्रमंडळी यांचे आम्ही आभारी आहों.

या आवृत्तींत आम्ही ( १ ) लेखकांचे फोटो घालणें, ( २ ) पाठांचे ४ विभाग करणें, ( ३ ) कै० गडकरी यांच्या लेखाची भर घालणें, या व इतर किरकोळ सुधारणा केल्या आहेत त्या पुस्तकाच्या उपयुक्ततेंत भर घालतील अशी आशा आहे.

पुस्तकाचीं पानें वाढलीं असूनहि विद्यार्थ्यांचे सोयीकरितां किंमत दीड रुपया होती ती सवा रुपया केली आहे.

या पुस्तकांतील ब्लॉक्स् विनामूल्य दिल्याबद्दल 'चित्रशाळा', 'केसरी-प्रबोध', 'यशवन्त' यांच्या चालकांचे आम्ही मनःपूर्वक आभार मानतों. तसेंच सर्व लेखकांनीं ( किंवा त्यांचे आप्तांनीं ) आपापल्या उताऱ्यांचा कायमचा उपयोग करण्याची परवानगी दिल्याबद्दल आम्ही किती उपकृत आहोंत हें शब्दांनीं सांगणें शक्य नाहीं.

याहि वेळीं श्री० बापूराव राजगुरु यांनीं नेहमींच्या दक्षतेनें थोडक्या अवधींत पुस्तक छापून दिलें याबद्दल त्यांचे आभार मानले पाहिजेत.

हिंगणें–पुणें ४,
नागपंचमी, २७ जुलै १९३४.

वा० म० जोशी
ना० म० पटवर्धन

---

# तिसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना



या आवृत्तींत 'टोकळ्याचें चित्र' हा उतारा गाळलेला आहे. इतर फेरफार अगदीं किरकोळ व शाब्दिक स्वरूपाचे आहेत. शिक्षकांकडून सूचना आल्यास त्यांचा अगत्य विचार केला जाईल.

हिंगणें–पुणें ४,
ता. २ जुलै, १९३५.

वा० म० जोशी
ना० म० पटवर्धन

---

# चवथ्या आवृत्तीची प्रस्तावना



ही आवृत्ति मागील आवृत्तीचें पुनर्मुद्रण आहे.

हिंगणें–पुणें ४,
नागपंचमी, २३ जुलै १९३६.

वा० म० जोशी
ना० म० पटवर्धन

# वाङ्मय-माला (पुष्प १ लें)



## विभाग १



### कोल्ह्याचें शहाणपण

[ पुढील उतारा मराठी पंचतंत्रांतला आहे. यालाच 'पंचोपाख्यान' असें दुसरें नांव आहे. हें पुस्तक इसवी सनाच्या अदमासें १४ व्या शतकांतलें असावें असें त्यांतील भाषेवरून दिसतें. त्याचें मूळ कदाचित् आधींचेंहि असूं शकेल, व त्याला हल्लींचें स्वरूप नकलाकारांनीं दिलें असेल. या पंचोपाख्यानाचा विशेष हा कीं, ज्याला वाङ्मयात्मक गद्य ग्रंथ म्हणतां येईल असा हा मराठींतला— आज तरी उपलब्ध असलेला— पहिलाच ग्रंथ होय. याच्या पूर्वींचीं शिलालेखांवर वगैरे लिहिलेलीं कांहीं किरकोळ वाक्यें उपलब्ध आहेत; त्याचप्रमाणें महानुभावीय ग्रंथांमध्येंहि कांहीं गद्य लिखाण सांपडतें; पण वाङ्मयात्मक आल्हाद देणारें मराठींतलें पहिलें मोठें गद्य पुस्तक 'पंचोपाख्यान' हेंच होय.

यांतील शब्दांचीं कांहीं रूपें कानांला चमत्कारिक वाटतात, पण समजण्यास तीं कांहीं फारशीं कठीण नाहींत. व्याकरणदृष्ट्या त्यांचें परिशीलन करणें महत्त्वाचें आहे, पण वाङ्मयदृष्ट्या वाचीत असतां त्यांची सांगोपांग छाननी करण्याकरितां खोळंबून राहण्याचें कारण नाहीं. ]

[1]उत्तमं प्रणिपातेन शूरं भेदेन योजयेत्
नीचमल्पप्रदानेन समशक्तिं पराक्रमैः ॥

मगरु पुसे । वान्नरु सांगे । कोण्हे येके वनिं चतुर नामें कोल्हा। तेणें वन हिंडता मेला हस्ति देखिला । त्याचें चर्म बळिकट भेदेना। म्हणौनि भोंवताला भोंवतु असे । परि न चाववे । तंव तेथें सिंहु आला । तया सिंहासि कोल्हा म्हणे जी हा हस्ती भक्षा । तंव तो म्हणे मि स्वहस्तें प्रत्यक्ष मारुनि खायें । लोकें मारिलें आणि मेलें । तें मिं न खायें । आणिक मृतमांस मज विशेषें खावों नये । म्हणौनि हस्ति तुज दिधला । यैसें म्हणोनियां तो सिंहु गेला । तंव व्याघ्रु आला । तयासि कोल्हा भेद करि । म्हणे हा हस्ति सिंहें मारिला । तो मी खातु असें । येक वेळ व्याघ्रें मेला गजु उच्छिष्ट केला । तेणें तो सिंह व्याघ्रावरी कोपला तैं लागुनि गोसावी[3] व्याघ्रातें देखौनि मारिती । तरि तुं पळ । सिंहु यावयाची वेळ झालि असे । यैसें ऐकुनि तो व्याघ्रुहि पळाला । तंव वेउलें आला । तयातें देखौनि कोल्हा विचारि । म्हणे याचां दांतिं चामें भेदैल म्हणोनि तयातें म्हणे । तुं आमुचा अतीथु । सिंह ये तंव तुं खाये । तों तया हस्तिचें चाम फोडी । इतुकेन तो कोल्हा म्हणे सिंहु आला । आतां तुं पळ । तो पळाला । इतुकेन त्याच कोल्हियानें खावों आदरिलें । तंव आणिक येकु कोल्हा आला । तो स्वजाती देखौनि नाभीचैं । मग तयातें दांतें चाउनि पळविला । हळुहळु

१ उत्तमाशीं गांठ पडली असतां प्रणिपात करावा, शूराशीं गांठ पडली असतां 'भेद' करावा, नीचाशीं गांठ पडली असतां अल्पप्रदान करावें व समान-बल असलेल्याशीं पराक्रम करावा आणि आपला कार्यभाग साधून घ्यावा. २ भ्रमत, हिंडत. ३ गोस्वामी, पशुपति, सिंह. ४ चित्ता. ५ चर्म, चामडें. ६ खाऊं लागला. ७ न भी, भिईना.

येकल्या कोल्हियानें सारा हस्ति खादला। तैसें तुं करिं। तया सुसरातें तुं मारुनि पळवीं। इतुकेंनि तुं सुखीं। आपुले घरीं राहे।

(पंचोपाख्यान)

**प्रश्न व सूचना**

(१) वरील उतारा कै० विनायक लक्ष्मण भावे यांनीं संपादिलेल्या 'महाराष्ट्र-कवि' या मासिकामधून घेतलेला आहे. सबंध मूळ पहावयाचें असल्यास सदर मासिकाचे अंक ३८ ते ४५ पहावेत.

(२) आपलें कार्य साधण्याकरितां कोल्ह्यानें कोणत्या चार युक्त्या योजिल्या? वरील गोष्टीसारखी कोल्ह्याच्या शहाणपणाची दुसरी एखादी कल्पित गोष्ट तुम्ही रचूं शकाल काय? प्रयत्न करून पहा.

(३) खातु, म्हणौनि, भांवतु, खावों, वगैरे रूपांकडे तुमचें लक्ष गेलें आहे काय? त्यांचीं आधुनिक रूपें काय होतील?

(४) या उताऱ्यांतील प्रथमेचीं व तृतीयेचीं रूपें निवडून काढण्याचा प्रयत्न करा.

(५) मराठींतील उपलब्ध असलेलें अगदीं पहिलें वाक्य असें आहेः— 'श्री चावुण्डराजें करवियलें' (इ० स० ९८३). सध्यां उपलब्ध असलेले मराठींतले अगदीं पहिले शब्द 'दिण्णलें' (दिलें), व 'गहिलें' (घेतलें) असे आहेत. ते इ० स० ७७८ चे सुमारास असून प्रो० चिं. वि. जोशी यांस ते 'अपभ्रंशत्रयी' या पुस्तकांत आढळले.

(६) कै० वि० ल० भावे यांनीं 'महाराष्ट्र-सारस्वत' नांवाच्या पुस्तकांत मराठींतील शिलालेखांत व ताम्रपटांत सांपडणारीं दिलेलीं वाक्यें; त्याचप्रमाणें महानुभावीय वाङ्मयाविषयीं दिलेली माहिती वाचण्यासारखी आहे. विद्यार्थ्यांनीं ग्रंथालयांतून हें पुस्तक मिळवून तीवरून सहज नजर तरी फिरवावी.

# छत्रपति शिवाजीचें एक पत्र

[ अफझुलखानानें शिवाजीवर चाल केली त्या वेळेस इकडील सरदार-जहागीरदारांनीं शिवाजीच्या पक्षाला मिळूं नये म्हणून त्यानें अनेक पत्रें लिहिलीं. एक पत्र भोर पेट्यांतील सरदार कान्होजी जेधे यांसहि गेलें. आपण कोणत्या पक्षास मिळावें यासंबंधीं सरदार कान्होजी जेधे यांना प्रश्न पडून त्यांनीं शिवाजीला पत्र लिहून सल्ला विचारला. खालील पत्र जेधे यांचे पत्रास शिवाजीनें पाठविलेलें उत्तर आहे. त्यांत शिवाजीनें निश्चित असें कांहीच उत्तर दिलें नसून असला बिकट प्रश्न ज्याचा त्यानेंच सोडवावा आणि आपल्या व आपल्या कुटुंबाच्या सुरक्षिततेबद्दल योग्य ती खबरदारी घ्यावी असें सुचविलें आहे हें वाचकांच्या ध्यानांत येईलच. ]

श्रीशंकर

॥ श्रीमंत सकळगुणअलंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजेश्री कान्होजी जेधे देशमुख तपे[1] भोर किले रोहिडा प्रति राजश्री शिवाजीराजे जोहार येथील क्षेम जाणौनु स्वकीय कुशळ लिहिणें तुम्ही पत्रिका पाठविली सकल अभिप्राउ कलो आला लि की खान अलीशानखान अजेम[2] येही[3] लिहिले आहे की जावलीवरी सुरू केले आहे तरी तुम्ही आपले जमेतीसी सीतॉब[4] येणे म्हणौनु लिहिले आहे तरी[5] तुमचा व त्यांचा पहिलेपासून घरोबा आहे गेले तरी पाहिजे आमां खासा[6] अगर पुत्र पाठवावयाचे जाले तरी बोलभाक[7] बरवे रिती घेउनु मग जाणे दगा होये ऐसे न करणे येक भले माणूस दरम्यान[8] देउनु मग जाणे तुमचे नजरेसी पडत असिले की खासा च जावे जरी तुमचे मन बारे[9] देत नसले तरी

---

१ तर्फ भोर, भोर पेटा. २ सर्व श्रेष्ठ, सन्मान्य. ३ यांनां. ४ जलद, लौकर. ५ लेकिन, पण. ६ खाश्या स्वारीनें, स्वतः. ७ आणभाक, शपथ. ८ मध्यस्थ म्हणून. ९ ग्वाही, खात्री.

कौलै बोल घेऊनु पुत्राबराबरी लोक देऊनु पाठविजे हरयेक बहाणा करून तुम्ही राहणे दोन्ही गोस्टी तुम्हास लिहिल्या आहेती यात तुम्ही स्याहणे असा बहूत लिहिणे नलगे (मर्यादेयं विराजते)

मर्या-
देयं विरा-
जते

पौ[2] छ[3] २४ रजब[4]

प्रतिपच्चंद्रलेखेव
वर्धिष्णुर्विश्ववंदिता ॥
शाहसूनोः शिवस्यैषा
मुद्रा भद्राय राजते

**प्रश्न व सूचना**

(१) पूर्वीच्या लिखाणांत अलीकडचीं विरामचिन्हें नव्हतीं. मार्ग ऊ गोष्टींत दिल्याप्रमाणें उभ्या रेघा देत, किंवा : अशीं दोन टिंबें देत. स्वल्पविरामादि-चिन्हें न दिल्यामुळें अर्थ समजण्यास विशेष अडचण पडत नसली तरी तीं न दिल्यामुळें वाचणारांची एखादे वेळेस कशी दिशाभूल होते हें उदाहरणें देऊन सांगा.

(२) पत्राच्या शेवटीं उजव्या बाजूला दिलेला श्लोक शिवाजीच्या मुद्रे-वरील (छापावरील) आहे. प्रतिपच्चंद्रलेखेप्रमाणें शिवाजीची मुद्रा वर्धिष्णु (वाढती) व विश्ववंदिता (जगन्मान्य) असून ती प्रजेच्या कल्याणाकरितां आहे असा सुंदर अर्थ त्यांत सुचविला आहे. या मुद्रेवरून शिवाजीची महत्त्वा-कांक्षा त्या काळापासूनच किती पल्लेदार होती व त्याचें ध्येय किती उच्च होतें हें दिसून येईल.

(३) पैवस्तीचा शेरा मारून आलेल्या पत्रांची व्यवस्थित नोंद करण्याची पद्धति लक्षांत घेण्याजोगी आहे. पैवस्ती लिहिण्याचा उपयोग काय?

(४) शिवाजीच्या काळीं मराठी भाषेवर फारसीचा पगडा किती बसला होता हें वरील पत्रावरून दिसून येईल. व्यावहारिक लिखाणांतील शेंकडा

---

१ अभयवचन, आश्वासन. २ "पैवस्ती" या फारसी शब्दाचें संक्षिप्त रूप. पैवस्ती म्हणजे पत्र दाखल झाल्याची नोंद. ३ चंद्र तिथि, तारीख. ४ आरबी वर्षाच्या सातव्या महिन्याचें नांव.

साठ किंबहुना अधिक शब्द फारसी असत असें तत्कालीन पत्रांवरून दिसतें. आरबी-फारसीच्या वाढत्या पगड्याला पायबंद घालण्यासाठीं शिवाजीनें पुढें काय उपाय-योजना केली ?

( ५ ) आरबी, फारसी, इंग्रजी वगैरे परभाषांतील शब्दांना मराठी लिखाणांतून अजिबात मज्जाव करणें शक्य व इष्ट आहे काय ?

( ६ ) 'किल्ले रोहिडा' म्हणजे वास्तविक किल्ला ई रोहिडा ( = रोहिड्याचा किल्ला ). 'तालुके मावळ' इत्यादि शब्दप्रयोगांत फारसी 'ई' ( म्हणजे 'चा' ) असा शब्द आहे. असेंच आणखी एखादें उदाहरण सांगा.

( ७ ) 'जमेतीसी' व 'नजरेसी' या शब्दांतील 'सी' या प्रत्ययाचे अर्थ संदर्भावरून सांगा.

---

# वंशपरंपरा वतनें कां देऊं नयेत ?

[ रामचंद्रपंत अमात्य यांचें 'आज्ञापत्र' म्हणून जें आतां पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालें आहे, त्याचा आरंभ असा आहेः—" राज्यभिषेक शके ४२ मन्मथ संवत्सरे मार्गशीर्ष शुद्ध ४ गुरुवार ( ता. २१।११।१७१६ ) रोजीं शंभू छत्रपतींनीं रामचंद्र पंडित अमात्य यांसी आज्ञा केली ऐसी जे " या 'आज्ञापत्रा'संबंधीं व त्यांत उल्लेखिलेल्या व्यक्तींसंबंधीं काशीनाथ नारायण साने लिहितातः— " जुन्या मराठी गद्य ग्रंथांत दोन ग्रंथ राजनीतीवर रचलेले आढळतात. एक रामचंद्र नीलकंठ अमात्य यांचा; दुसरा मल्हार रामराव चिटणीस यांचा; पैकीं रामचंद्रपंत अमात्य हे वडील राजनीतिकार होत. त्यांनीं शककर्ते थोरले शिवाजीमहाराज यांच्यापासून तों कोल्हापूरकर संभाजीमहाराजांपर्यंत सर्व कारकीर्दी पाहिलेल्या होत्या. राजाराममहाराजांच्या वेळीं तर स्वराज्याचा मूळ प्रदेश जो घाटमाथा तो सर्व– इकडे कोल्हापूर विशाळगडापासून तों थेट भीमानदीपर्यंत– त्यांच्याकडे सोंपवून राजारामसाहेब तंजावर प्रांतीं चंदीस (जिंजीस) गेले. रामचंद्रपंतांनीं छत्रपति शिवाजीपासून सर्व कारभार कसा चालत होता तें पाहिलेलें होतें. राजारामाच्या वेळीं तर ते खरोखरीच 'सर्व-राजकार्य-धुरंधुर'

झाले होते; व औरंगजेब महाबळी सर्व दाक्षिणभर धिंगाणा घालीत असतां त्यांनी स्वराज्याचा बचाव उत्तम प्रकारें केला. अशा कर्त्या पुरुषानें स्वतःच्या माहितीनें व अनुभवानें सिद्ध झालेली राजनीति राजसबाईचे पुत्र संभाजी-महाराज यांस उपदेशिली, तीच 'आज्ञापत्र' या नांवानें 'विविध-ज्ञान-विस्तार' मासिक पुस्तकांत मागें कांहीं वर्षांपूर्वी दोनदां प्रसिद्ध झाली होती ती आतां तपासून पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाली आहे."

रामचंद्रपंताचा बाप निळो सोनदेव १६७२ त मरण पावला. रामचंद्रपंत सन १७१७ मध्यें मरण पावला.]

मुख्य अर्थ हाच कीं न्यायान्यायें दुसऱ्याचा वृत्त्यपहार[1] करावा हे क्षुद्र बुद्धि सहसा धरू नये तसेच सेवक लोकीं अथवा वृत्तिवंतांनीं सेवा उदंड केली तरी त्यास द्रव्य अश्व गज वस्त्र भूषणादि द्यावीं योग्य पाहोन थोर सेवा सांगावी परंतु नूतन वृत्ति करून देऊं नये किंनिमित्त कीं दिवाण[2] महसुलांत[3] वृत्ति करून दिली तर तितका महसूल वंशपरंपरेनें न्यून्य होतो महसूल न्यून्य होणें हीच राज्याची जीर्णता तोच राज्यलक्ष्मीचा पराभव याकरितां राज्यकुलीं निर्माण झालेल्यांनीं कोणाचें खुशामतीवग न जातां मोह न पावतां महसूल न्यून न पडूं द्यावा जर रयतेवर हक्क करून दिधला तरी नूतन कानूमुळें रयतेवर जलाल[4] होऊन रयत पीडा पावते श्रमी[5] होते एकाचे सुखानिमित्त बहुतांस श्रम द्यावे या कार्यामध्यें दुसरा श्राप द्यावाच नलगे बहुतांचा श्राप इहलोकीं परलोकीं बाधक तसेंच ज्यास वृत्ति द्यावी त्याजसारिखे वंशज होतील असें नाहीं कदाचित् त्याचे वंशजांनीं त्यामागें हरामखोरीची नजर धरली तर त्यास त्याच वृत्तीचें बल होणार तेव्हां विशेष अमर्यादा होते मग आपण होऊन राज्याचें शाश्वत अकार्य करून ठेविलें असें होतें अथवा केल्या

---

१ वृत्तीचा ( उपजीविकेच्या साधनाचा ) अपहार. २ वसूलकचेरी. ३ वसूल ४ जुलूम. ५ कष्टी.

अन्यायास्तव आपले वंशजांनीं वृत्ति दूर केली तर स्वदत्तापहारदोष[1] आपले वंशजांवर येतो तसेच या कलियुगीं दिवसेंदिवस पापाधिक्य-च होणार प्रस्तुत होत चाललें आहे तथापि वृत्तिवंतास पापाचें भयच नाहीं कदाचित् त्याच वृत्तीवर होत होत ज्यास वृत्ति द्यावी त्याणें अथवा त्याचे वंशजानें दस्युभाव[2] धरून देशास पीडा करूं लागले तर तो दोष वृत्ति देणारावर येतो इत्यादि दोष बरें चित्तांत आणून नूतन वृत्ति कोणास करून न द्यावी तसेंच सेवक अथवा वृत्तिवंत यांस हरयेक कार्यप्रयोजनामुळें भूमि इनाम करून देणें हा परम अन्याय जो राजा होत्साता तो राज्याचा शत्रु असेल त्यानें भूमीवर उदार व्हावें राजास भूपति असें भूमीकरितां म्हणावें ते भूमिच गेल्यावर राज्य कशाचें करणार पति कोणाचा होणार कदाचित् विशेष सेवा केली म्हणून ग्राम अथवा भूमि द्यावी तरी राज्य आहे तेथवर वंशपरंपरेनें कार्य आहेतच सेवकहि काम करणारे आहेत तेव्हां ज्याचे वेळेस जे सेवक काम करतील त्यास भूमि देत असावें असें देतां देतां संपूर्ण राज्य भरीस घालावें असें होतें वरकड एतद्विषयींचे विशेष दोष वृत्तीच्या विषयांत लिहिले आहेत तेहि अवश्य-मेव प्राप्त होतात याकरितां जो राजा राज्य करणार राज्य वाढवि-णार नीतिवंत म्हणोन कीर्ति संपादणार त्याणें सर्वार्थी मोह न पावतां यवोदरप्रमाण[3] भूमि तीही इनाम देऊं नये सेवक लोकीं वंशपरंपरेनें उपयोगास येई अशी सेवा केली तर त्यास वंशपरंपरेनें चाले असें म्हणावें तर जेव्हां मान्य करून सेवक झाला वेतन घेतो तेव्हां त्यानें पडेल तसें जिवाभ्य[4] श्रम साहस करून स्वामि-कार्य करावें हा सेवाधर्मच आहे तथापि एखादी उत्कृष्ट सेवा

---

१ स्वतः दिलेल्याचा अपहार. २ दस्यु = राक्षस, दुष्ट मनुष्य. ३ जवाच्या उदराच्या प्रमाणाएवढें. अत्यंत लहान. ४ जिवापासन. जिवापाड.

जे कोणाच्यानें न होय असें केलें तर त्यास एखादी चांगली सेवा मुशाहिऱ्याचें वतन करून देऊन रयतेवर जलाल अथवा महसुलांत न्यून्यता न होय असें करावें धर्मार्थ भूमिदान देणें याचें पुण्य अनंत आहे परंतु धर्मात अधर्म अधर्मात धर्म ही धर्माची सूक्ष्मता बरी शास्त्रतः विचारून[2] धर्मार्थ भूमि देणें ते देश काल पात्र पाहून द्यावी जोगी जंगम वेशधारी इत्यादि जे स्वकार्यार्थ वेश धरितात ज्यांस भिक्षार्थ फिरावयासही कार्यात यश येतें अशांस अथवा जे स्वतां अथवा ज्यांचे वंशज दुष्ट दुराचारप्रवर्तक होऊं शकतात अशांस तसेंच स्वधर्मविरोधी पाखांडी यांस ग्राम अथवा भूमि न द्यावी.

**रामचंद्रपंत अमात्य**
(आज्ञापत्र)

**प्रश्न व सूचना**

(१) वरील उताऱ्याचें मनन करून वंशपरंपरा वृत्ति कां देऊं नये याचीं नक्की कारणें सांगा. शिवाजीचें हें धोरण शेवटपर्यंत चाललें काय ? कां चाललें नाहीं ? न चालल्यामुळें कसें नुकसान झालें ?

(२) वरील उताऱ्यांत विरामचिन्हें दिलेलीं नाहींत. कारण मागें सांगितल्या-प्रमाणें त्या वेळीं अलीकडील विरामचिन्हांची पद्धति नव्हती. वरील उताऱ्यांतील सातव्या पानावर अर्थानुरोधानें आधुनिक पद्धतीचीं विरामचिन्हें द्या.

(३) रामचंद्रपंत अमात्यांच्या भाषेचे कांहीं विशेष देऊन मागें दिलेल्या पत्रांतील भाषेशीं तिची तुलना करा.

(४) 'श्राप', 'न्यून्य' हे शब्द संस्कृतदृष्ट्या शुद्ध आहेत काय ? असलेच दोन चार 'अपभ्रष्ट' शब्द सांगा.

---

१ दरमहा पगार. २ विचार करून.

# वसई फत्ते झाली !

[ पुढें दिलेलें सुंदर पत्र कै० वि० का० राजवाडे व कै० रावबहादुर पारसनीस यांनीं धावडशीकर ब्रह्मेंद्रस्वामींसंबंधीं कांहीं पत्रें छापिलीं आहेत त्यांपैकीं एक आहे. १७३९ सालांतील वसईच्या वेढ्यांतील शेवटच्या प्रसंगाचें रसपूर्ण वर्णन त्यांत आहे. खुद्द चिमाजी आपानेंच तें लिहिलें असल्यामुळें त्याला भाषेशिवाय आणखीहि एका निराळ्या प्रकारचें महत्त्व प्राप्त झालें आहे. ]

श्री. १६६१ वैशाख व० १

श्रीमंत महाराज श्रीपरमहंस बाबा स्वामींचे[1] सेवेसि आपत्यें चिमाजीनें कृतानेक सा॥ नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता॥ वैशाख बहुलें[2] प्रतिपदापर्यंत मुक्काम वसई स्वामींचे आशीर्वादेंकरून सुखरूप असो. विशेष. स्वामींचे अभयावरून वसईस मोर्चे माघ शु॥ दशमीस लाविले. त्यादारभ्य[3] मोर्चे चालविले व धमधमे[4] चार पांच बांधले. सुरंगे[5] चालविले. जे जे उपाय स्थल हस्तगत करावयाचे ते केले. फिरंगीयांनीं[6] निराकरणाचा मंत्र पूर्वीं युद्धप्रसंगीं मोठ्या मोठ्या सुरांनीं केले तदन्वयें फिरंग्यांनीं सुरंगावर व धमधमेयावर गरनाळा[7] टाकिल्या सुरंग विच्छिन्न केले. पनळ लावून पाणी सोडिलें. आगीचे ओंडे जळके टाकून त्यावर तेल दारु राळ टाकून चार चार रोज डोंबराही सारखा करीत. बरकंदाजी व तोफाजी फिरंगियाची निस्सीम म्हणावी तैशी. तथापि स्वामींचा

१ धावडशीकर ब्रह्मेंद्रस्वामी. २ वद्य. ३ तेव्हांपासून. ४ टेहळणीच्या, हल्ल्याच्या वगैरे सोईकरितां मातीचा केलेला धक्का किंवा बुरूज. 'धमधमा प्रतिगुल्मः स्यात्।' (राजव्यवहार-कोश). ५ जमिनींत भुयाराप्रमाणें पुष्कळ लांब खोदून त्यांत दारू भरून वरील भाग उडवून देण्याचा प्रकार. 'सुरंगं विवरं स्मृतम्' (राजव्यवहार-कोश). ६ पोर्तुगीज. ७ रुंद तोंडाच्या तोफा.

आशीर्वाद व दंड हें सबळ शस्त्र आम्हांजवळ. त्याचे प्रतापें इकडून तोफा लावून फिरंगियांच्या तोफा मना केल्या. सफेलें पाडून लेशें केली. वसई जागा बांकें बुलंद. सुरंगाचा उपाय नाहीं. परंतु स्वामीचे कृपाकटाक्षें सुरंग चालवून दोन्ही बाजूंनीं खांब वरती तक्तपोशी त्यावर दोन अडीच हात रेती टाकून सुरंग नेऊन पोहोंचावून दोनशें पाथरवट लावून मोठे मोठे चिरे फोडून सुरंगाचे बुधलियासें जागा करून वैशाख शु॥ पंचमीस सकल सिद्धता करून सुरंग लोकांस बाजू वाटून देऊन नगारेयाची इषारत करून सुरंग उडतांच सर्वांनीं येलगारास उठावें बुरजावर चढावें शिड्या टेकून चढावें ऐसा करार करून वैशाख शु॥ ६ बुधवारीं दोन घटका दिवस प्रातःकाळचा येतांच सुरंगांस बत्त्या दिल्या. डावे बाजूचे सुरंग कांहीं उडाले कांहीं उडणें होते तोंच लोकांनीं उतावळी करून कोटावर चालून घेतलें तों दुसरे सुरंग तेच बाजूचे उडाले त्यांणीं लोक दडाले व ठार जाले. तसेच उजवे बाजूचे सुरंग उडाले एक दोन उडतांच बुरजास वाट जाहलीसे देखून लोक वरते चढले तों दुसरे सुरंग उडाले त्यांणीं वरते लोक चढले होते ते उडोन गेले. लोक कचरले. हिरमोड होऊन काम बंद पडलें. फिरंगी यांणीं संभाळून हुंके व गरनाळा व रेजगरीचा मार न भूतो न भविष्यति केला, त्याणें लष्करचे

१ तटाची भिंत किंवा गच्ची ( आरबी 'फसील'पासून ). २ ( मारा करण्यास वगैरे ) लायक, तयार, सिद्ध (?). पारसनीस 'रुफेल सोडून' असा पाठ देतात व 'लेश'चा अर्थ काय असें विचारतात. ३ घेण्यास कठीण. ४ उंच. ५ सुरुंग उडविण्याची दारू ज्यांत ठेवीत तें चामड्याचें पात्र, बुधला. ६ हल्ल्यास. ७ निश्चित करून. ८ बाँबसारखे स्फोटक पदार्थ. ९ तोफेच्या नळींत दारूबरोबर ठासण्याच्या लोखंडी अगर दगडी वस्तु ( मा० त्र्यं० पटवर्धन. )

लोकांस व हषमांस[1] अवसान राहिलें नव्हतें. उजवे बाजूचा मातबर[2] सुरंग राजेश्री मल्हारजी होळकर यांजकडील उडणें होता त्याचा शोध करून पुन्हा त्यांत बुधले घालून रंजक[3] दुरुस्त करून लोकांची निवड केली आणि सुरंग उडतांच खामखा[4] निशाणें चढवावीसा करार करून वैशाख शु॥ ७ गुरवार उजवे बाजूचा सुरंग उडविला. तेच समयीं लोक जाऊन बुरुज अर्धा उडाला त्याजवर चढले. फिरंगीयांनीं सफेलीच्या आंतून मेढा घालून पेटी भरून तोफा लाऊन तयार होतांच तेथें फिरंगी बळाऊन हुके गरनाळाच्या दारूच्या पोत्यास आग लावून मार केला, व रेजगिरीचा मार सीमे परता केला. लोकांवरी अग्नीचा पर्जन्य करून भाजून काढिले तथापि स्वामीचे अभय आशीर्वादाचें वज्रकवच लोकांचे अंगीं होतें, तेणें-करून आगिची तमा न धरितां लोकांनीं हत्यार बरे वेजेनें[5] केलें. फिरंगीयांनीं मरदुमी शिपायिगिरी करावी तैशी केली. त्याप्रमाणें इकडील लोकांनीं भारती युद्धाप्रमाणें युद्ध केलें. यामागें युद्धें बहुत जालीं परंतु या लढाईस जोडाच नाहीं. सर्व स्वामींचा आशीर्वाद. लोक बुरूज सोडीनातसे जाहले. तेव्हां स्वामींच्या दंडकप्रहारें करून फिरंगी धर्मद्वेष्टे बेहिमत होऊन अष्टमीस प्रहर दिवसास कौलास[6] आलें. कौल घेतला. आठ दिवसांत कबिलांसुद्धां[7] झाडून जातोसे करार केले याजवरून मार महकूफ[8] केला. फिरंगी यांणीं कबिले वस्तभाव गलबतांत भरिली. काल वैशाख पौर्णिमेस फिरंगी झाडून गेला. स्वामीचे पुण्येंकरून जागा फत्ते जाहली. लष्करचे

---

१ नोकरांचाकरांस, शिपाईप्याद्यांस. २ मोठा. ३ दारू. ४ अवश्य, खात्रीनें. ५ चांगल्या रीतीनें. ६ कौल मूळ अर्थ—करार. कौलास येणें म्हणजे कांहीं अटींवर स्वाधीन होण्यास तयार होणें, "to be ready to capitulate." ७ बायकांमुलांसह. ८ रहित, तहकूब.

व हषमाचे लोक सुरंगानें उडाले व जाया ठार अदमासें पांच हजार किंबहुना विशेष होतील. तैसेंच फिरंगीयांचे सात आठशें माणूस[1] ठार व या निराळे जखमी झाले. भारती युद्धाप्रमाणें युद्ध झालें. वसई बांकी जागा. पश्चिमेकडून समुद्र दक्षिणेकडे खाडी पूर्वेकडे खाजेणं चिखल तिहींकडून किमपि इलाज नाहीं. एक उत्तरकडून उपाय. तिकडे ही रेती धर नाहीं. स्वामी साक्षात्कार ईश्वराचा अंश, स्वामींनीं वसई दिली. त्रिवार लिहिले ते शब्द अन्यथा कसे होतील? वरकड वसईची गोष्ट मनावी लोकांनीं म्हणावी असें नाहीं वसई स्वामीचे आशीर्वादें फत्ते जाली. श्रीचें सुदर्शन धर्मद्वेष्टयाचे मस्तकीं वज्रप्रहार होऊन टोपीकर[3] म्लानत्व पावले. अन्यथा वसई बसई[4] होती व फिरंगी आगीचा पुतळा होता ! स्वामीचे कर्तृत्वास पार नाहीं ! स्वामीचा महिमा स्वामी जाणत ! आम्हा मानवी लोकांस काय कळे ? "वसई फत्ते होतांच सव्वाशें पुतळी पाठवून देणें व श्री भुलेश्वरास सव्वाशें रुपयांचा मुगुट घातला" म्हणोन आज्ञा केली. याजवरून स्वामीचे आज्ञेप्रमाणें वसई फत्ते होतांच श्रीनिवास केदार याजबरोबर पुतळ्या सव्वाशें व श्रीभुलोबास मुगुट सव्वाशें रुपयांचा घातला ते रुपये १२५ सव्वाशें स्वामींचे सेवेशी पाठविले आहेत. प्रविष्ट होतील. आम्ही लेंकरें स्वामींचीं असो सर्व प्रकारें कृपा करणार स्वामी समर्थ आहेत. स्वामींचें वितरिक्त दुसरें दैवत आम्हां काय आहे?

१ "मालीस" असा राजवाड्यांचा पाठ (खंड ३). मालीस म्हणजे काय? "माणूस" असा पाठ पारसनीस देतात. मूळ पत्र मोडींत होतें; त्याची नकल करतांना पाठभेद झाले. २ खारी जमीन. ३ फिरंगी पोर्तुगीज. ४ सई करण्यास (जिंकण्यास) अशक्य. 'वसई वसई होती' असें कांहीं ठिकाणीं छापलें आहे तें चुकीचें आहे.

सारांश[1] स्वामींच्या आशीर्वादें व दंडाच्या प्रतापें कार्य सिद्धीतें पावलें असे. स्वामींचा महिमा आम्ही वर्णावयास सामर्थ्य धरीत नाहीं. श्रीनिवास केदार पुतळ्या व रुपये देऊन रवाना केले आहे ते लवकरच पावतील. वर्तमान त्वरेनें विदित व्हावें यास्तव हें पत्र पुढें रवाना केलें असे. सेवेसी श्रुत होय. हे विज्ञापना.

**प्रश्न व सूचना**

( १ ) या पत्रांतील पुढील गोष्टी विद्यार्थ्यांनीं लक्षांत घेण्याजोग्या आहेतः— ( अ ) त्यादारभ्य, वितरिक्त इत्यादि रूढ परंतु संस्कृतच्या दृष्टीनें अशुद्ध शब्द. ( आ ) आरबी व फारसी शब्दांचें प्राचुर्य. ( इ ) मोडी लिहिण्याचे पद्धतीमुळे 'फिरंगीयाचे', 'धमधमेयाचे' अशीं झालेलीं रूपें. ( ई ) लहान लहान पण जोरदार ठसकेबाज वाक्यें.

( २ ) देशाभिमानाची आजची कल्पना व त्या वेळची कल्पना यांत तुम्हांला कांहीं फरक दिसतो काय ? दिसत असल्यास कोणता ?

( ३ ) या वर्णनाच्या व इतर माहितीच्या आधारें वसईच्या वेढ्यासंबंधीं शाळेच्या संमेलनांत करतां येतील असे २–३ प्रवेश तयार करा.

---

# पानपतचा पळ

[ सदरहु उतारा 'भाऊसाहेबांची बखर' या नांवानें प्रसिद्ध असलेल्या बखरींतून घेतला आहे. ही बखर कोणीं कोणाकरितां लिहिलीं हें बखरीच्या सुरुवातीसच दिलेल्या पुढील भागावरून दिसून येईलः—

" राजश्रियाविरजित राजमान्य राजश्री व्यंकाप्पा नाईक
दिंडोरे कसबा वेळापूर स्वामींचे सेवेशीं.
पोष्य कृष्णाजी शामराव मुक्काम दिल्ली इंद्रप्रहस्थ. कृतानेक
साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसी जे. स्वामींनीं कृपाकरून पत्र

---

१ " सारांश " पासून पुढें खुद्द चिमाजी अप्पांचें हस्ताक्षर आहे असें मूळ पत्र वाचणारे रा० ब० पारसनीस म्हणतात. खाशी मंडळी पूर्वी कारकुनांकडून पत्रें लिहून घेऊन शेवटले कांहीं शब्दच स्वदस्तुरचे लिहीत असत.

पाठविलें तेथ आज्ञा केली कीं, हिंदुस्थानांतील आद्यंत वर्तमान प्यादाचा फर्जी नजीबखान रोहिला होऊन दक्षिणदेशीं हिंदुपद श्री राजा शाहू छत्रपति यांचा मुख्य प्रधान आदिकरून सव्वा लक्ष फौजेनिशीं भाऊ गर्दी होऊन प्यादेमात कशी झाली हें सविस्तर ल्याहावें म्हणून आज्ञा."

बखरीचा शेवट पुढें दिल्याप्रमाणें आहेः—

"याप्रमाणें ही हकीगत जाली त्याप्रमाणें विस्तार करून लिहिलेलें आहे त्याची माहितगार ते वेळचे कोणी अनुभवी असतील त्यांस मात्र ठाऊक असा इतरास दाखला पोंचणार नाहीं. आपण हिंदुस्थानचें आद्यंत वर्तमान लिहून द्यावें म्हणून आज्ञा केली होती त्यास हें वर्तमान माहितगारांनेंच लिहिलें पाहिजे. त्याजवरून विचारणा करून सेवेशीं विस्तार लिहून [पाठविलें आहे] ध्यानास आणावें आणि मनन करून मिथ्या असल्यास सोडून द्यावें आणि सत्य असेल तर जमेस धरावें हें लिहून कळवावें असा विचार नाहीं सेवेशीं कळावें, बहुत काय लिहिणें कृपालोभाची वृद्धि करावी हे विज्ञापना. ही बखर समाप्त मिति ज्येष्ठ वद्य ७ शके १७८१ सिद्धार्थीनाम संवत्सरे ते दिवशीं सायंकाळीं लिहिली. लिहिणार विष्णु बापुजी निफाडकर राहणारा धोपेश्वर तालुके राजापूर चुकली तरी क्षमा करावी हे विज्ञापना.

नानासाहेब व भाऊसाहेब अवतारी पुरुष. उभयतांप्रमाणें मनुष्यलोकीं यामागें कोठेंही जाले नाहींत व पुढेंही होणें कठीण. उभयतांचा ऋणानुबंध कीं एक मरतांना एकानें मरावें. पूर्वी बाजीरावसाहेब मुक्त जाहालियावरी सहा महिन्यांनीं चिमाजी आपा गेले. तैसेंच भाऊसाहेब गैब जाल्यावर वर्तमान नानासाहेब यांनीं ऐकतांच सहा महिन्यांतच मृत्यु पावले. भाऊसाहेब मृत्यु पावले हें कोणी ऐकिलें नाहीं. व पाहिलें नाहीं. भगवंत इच्छेंकरून त्या कहरांतून पार पडून वांचून हरेक कोठें असले तरी

निर्माण होतील. बहुन भाऊ आहेत परंतु श्रीमंत लोकांत याप्रमाणें भाऊपणा कोठें नाहीं रामभरताची साम्यता. याप्रमाणें वर्तमान जाले, नजीबखान प्यादा होता तो फर्जी झाला."

वरील १७८१ हा शक नकला करणाऱ्याची नकल पुरी लिहून झाल्याचा आहे. मूळ बखर कृष्णाजी शामराव यानें पानपतानंतर लौकरच लिहिली असावी. हा कृष्णाजी शामराव शिंद्यांच्या पदरचा असून तो मोठा शोधक बुद्धीचा पुरुष असावा असें दिसतें.]

याजवर इकडे पार्वतीबाईचे बंदोबस्तास विसाजी कृष्ण जोगदंड यास पांचशें धनगर नेमून देऊन रखवालीस बरोबर ठेविलें होतें. त्यास आज्ञा केली होती कीं आम्ही झुंजून पार निघालों असें कळलें तरि तुम्ही यांस घेऊन दिलीचे रोखें आमचे मागें पिछाडीस घेऊन यावें. आणि रणांत पडलों असें वर्तमान ऐकल्यावर यांस तुम्ही जिवें मारोन निघोन जावें. गिलच्यांचे हातीं भाऊसाहेब यांची स्त्री जिवंत सांपडली असा लौकिक मात्र न होईल तें करावें. असें निश्चयरूप सांगून त्यास रखवालीस ठेविलें होतें. तों मोड जाला. लोक पळो लागले. ते समयीं विसाजी कृष्ण व लोक यांणीं धास्त खाऊन बाईची आस्था सोडून आपले जीव वांचविले. कोणीकडे गेले त्यांचें ठिकाण नाहीं. भाऊसाहेबीं सांगितलें होतें त्याप्रमाणें कांहींच घडलें नाहीं. तों एक घटिका दिवस राहिला. ते समयीं पार्वतीबाई अंबारींत होती तिनें हत्ती बसवून पायउतारी[1] होऊन, बुणागियाचे रोखें पळों लागली. केवळच भांबावली. घरचा पोरगा कोतवाल[2] घोडी घेऊन उभा होता तो बाईसाहेब घोडीवर बसावें असें म्हणों लागला. परंतु तिजला घोडियावर बसावयाचें देहभान राहिलें नाहीं. त्या समयीं जानू भिंताड्या खिसमतगार

---

१ पायीं चालूं लागून. २ मूळ अर्थ किल्लेदार, येथं उमदी.

मात्र एकटा जवळ राहिला होता त्याणें हिंमत धरून सोबत दिली. तशा आकांतांत बारत्रेकर म्हणून मातेबर[1] मनुष्य व घोडेंही सख्त[2] पाठाळ[3] होतें त्याची गांठ पडली तेव्हां त्यास बोलिली कीं मी भाऊसाहेबांची स्त्री आहे मजला घोडियावर घ्यावें म्हणतांच तोहि मनुष्य चांगला भला तो हिंमत धरून बोलिला कीं बाईसाहेब रिकिबींत पाय देऊन घोडियावर यावें म्हणतांच तिनें रिकिबीस पाय देऊन [त्यानें] पाठीवर घेतली. आणि तिच्याच शालजोडीनें कंबरेस पाठीमागें बळकट आंवळून बांधिली. आणि भोंवताली नजर केली तों गिलचे अवघे भोंवताले. मागें पुढें ढिगांचे ढीग देखिले. तेव्हां बाईस बोलिला कीं बाईसाहेब निभावणीचें कठीण दिसतें. असो तुमचें सुकृतें[4] तरी पार पडलों तरि पळून जाऊं म्हणोन त्यानें डोळे झांकून फौजेंतून घोडें घातलें. तों बाईचें पुण्य सबळ म्हणोन अशा अरिष्टांतून पार पडली. तों दिवसही अस्तमान जाला. कोस-पर्यंत गिलचे यांणीं पाठलाग केला. परंतु पाठाळ सख्तशीर होतें म्हणून तशांतून निभावून गेली.

नाना फडणविस यांची मातोश्री श्रीभागीरथीचे यात्रेस जावयासि आली होती ती गिलचे यांजकडे सांपडली. तिची गत पुढें काय जाहली न कळे. नानाची स्त्री होती ती मात्र रणांतून बाहेर आलियावरि तिणें घोडी टाकून दिली. ती पायउतारा होऊन अंगावरील दागिने काढून फाटकें वस्त्र नेसून अंगास माती लावून दिल्लीच्या रोखें गेली.

* * *

यानंतर पार्वतीबाई यांजपाशीं जानू भिंताड्या खिजमतगार होता

१ थोर. २ कठीण, मजबूत, अतिशय. ३ रुंद पाठीचें. ४ पुण्याईनें.

त्याणें व बारवेकर यानें पाठीशीं बांधून आणिल्यावर घोडें थकलें. मग पिराजी राऊत होता त्यानें पाहातांच आपल्या घोडियावर बसवून सहा कोसपर्यंत आणिली. पुढें त्याचा घोडाही थकला. मग त्यानेंही उतरून ठेविली. पुन: जानू भिताड्या खिजमतगार [याणें] कोस आदकोस चालवीत आणिली. बळकट घोडियाचा मातबर कोणी भेटलियास त्याच्या घोड्यावर बसवी. असें करीत करीत दिल्ली अलीकडे तीन मजलांवर मल्हारराव होळकर व नाना पुरंदरे व कितीएक सरदार व पागेचे बारगीर शिलेदार असे शेंपन्नास भेटले त्यांमध्यें येऊन मिळाली. बळवंतराव याचा पुत्र आपाराव तोही निभावून आला. पार्वतीबाईचे चित्तांत कीं भ्रतार दिल्लीस आला असेल म्हणोन बहूतच आशा होती.

* * *

पार्वतीबाई दिल्लीनजीक आली तों भाऊसाहेब नाहींत म्हणोन ऐकतांच आशेची निराशा जाली. पळाचे तीन हजार जमले होते ते बाहेर वाळवंटींत होते. तों त्यांस सर्वांस पळाचें वर्तमान कळलें. परंतु तहकीक[1] कळेना. कदाचित भाऊसाहेब दिल्लींत आले अगोदर पळाले असें जाहालें त्यांस तोंड दाखवावयासही जागा नाहीं यास्तव धीर धरून राहिले. दक्षिण देशांतील लष्कराचे उदमी कित्येक दिल्लींत जाऊन राहिले होते त्यास शहरचे लोक लुटूं लागले व मारूंही लागले. वाळवंटीस पथकें होतीं त्यांणीं गुरुवारीं तिसरा प्रहरपर्यंत धीर धरून होते. मग झ्या झ्या करीत निघाले. नारो शंकर वगैरे किल्ल्यांत होते ते गुरुवारीं संध्याकाळपर्यंत धीर धरून होते. कांहीं खजिना सरकारचा होता तो अगोदरच कडेस काढून बाहेरलीं पथकें व आपण एकत्र होऊन निघून गेले असते तरि निभावून जाते तें

१ निश्चित.

न जालें. संध्याकाळीं गंगोबा तात्या होळकरांचे दिवाण पळतच दिल्लींत आले. नारो शंकर यांजकडे भोजन केलें. सविस्तर वर्तमान सांगितलें. याजउपरि ज्यास जैसा भगवंत मार्ग देईल तैसें निघोन जावें. सुवा मार्ग दिसत नाहीं तुम्ही डोळे झांकून काय बसलां असें नारो शंकर यांसि सांगितलें. आणि ते स्वार होऊन तैसेच निघून गेले. तेव्हां अवसानें यांचीं गेलीं. खजिना काढावयास अनुकूल पडलें नाहीं. दिल्लींतील वाणी बकालें[1] बायका देखील[2] गांवकुटार[3] लष्कराच्या लोकांस मारूं लागले. गर्दी करून लुटूं लागले. शहरांत धूम बहूत जाली. तेव्हां जिवानिशीं मारामार करीत नारो शंकर वगैरे कुलें[4] झाडून[5] निघाले. खजिना जाग्यावरच राहिला. अगोदर वाळवंटीं पथकें होतीं तीं निघोन फर्दाबादेस पोंचलीं आणि जीन उतरलें. तों नाना पुरंदरे व बाळकोबा तात्या आणखी शेंपन्नास असे तेहि आले. ते हे एकत्र होऊन तीन मजल आले. तों होळकराची व बायकांची गांठ पडली. तेथून मजल दरमजल लष्कर अकरावे दिवशीं भिंडीस[6] दाखल जालें.

* * *

पार्वतीबाई व होळकर व नाना पुरंदरे असे होते तेथें सर्वत्र जमा जाले. तेथें पंधरा मुक्काम जाले. तेव्हां सुरजमल जाट याणें रुपराम कटारी याजसमागमें लक्ष रुपये व वस्त्रें मथुरेवर पाठवून दिलीं. तेथून मल्हारराव होळकर व नाना पुरंदरे व पार्वतीबाई एक महिना ग्वालेरीस जाऊन राहिले. पळाचे लोक आले. त्या सर्वत्रांस वस्त्रें व पांच रुपये खर्चीस बाईनीं दिले व नाना पुरंदरे

१ धंदेवाला. २, ३ गांवकुटार. गांवांतील कुटाळ (?) सुद्धां. ४, ५ सर्व.
६ ग्वालेरीच्या पूर्वेस ५३ मैल.

यांणीं तेथून बैरागी भाऊसाहेबांच्या शोधास पाठविले. परंतु भाऊ-साहेबांचें कोठें ठिकाण लागलें नाहीं.

कृष्णाजी शामराव
( भाऊसाहेबांची बखर )

प्रश्न व सूचना

( १ ) मुळामध्यें विरामचिन्हें मुळींच नसलीं तरी विद्यार्थ्यांच्या सोयीकरितां फक्त पूर्णविराम दिले आहेत.

( २ ) ( अ ) तेव्हां अवसानें यांचीं गेलीं. ( आ ) तिनें पायउतारा होऊन बुणगीयाचें रोखें पळों लागली. ( इ ) वाळवंटीस पथकें होतीं. ( ई ) त्यांनीं गुरुवारीं तिसरा प्रहरपर्यंत धीर धरून होते. अशा वाक्यांत व्याकरणासंबंधीं तुम्हांस विशेष कांहीं दिसतें काय ? हीं वाक्यें व्याकरणदृष्ट्या चूक म्हणण्यापेक्षां त्या वेळच्या सर्रास चालू असलेल्या रूढीला अनुसरून असल्यामुळें तीं शुद्धच आहेत असें म्हणतां येईल काय ?

( ३ ) या बखरीची भाषा कानाला फार चांगली लागते. ती तशी कां लागते याचीं कारणें शोधून काढा.

( ४ ) पेशव्यांनीं स्वारीबरोबर स्त्रियांनाहि घेतलें हें आपणांस आतां फार चमत्कारिक वाटतें. तथापि त्यांचेहि वर्तनें समर्थनपर असें कांहीं तुम्हांला म्हणतां येईल काय ?

( ५ ) जानू भिंताड्यासारख्या स्वामिनिष्ठ सेवकांचीं मराठ्यांच्या इतिहासांतील दुसरीं कांहीं उदाहरणें सांगा. अशीं स्वामिनिष्ठ माणसें पदरीं असतां मराठ्यांस अपयश कां यावें ?

---

# शिवाजीमहाराजांचा निधनप्रसंग

[ खालील उतारा मल्हार रामराव चिटणीसकृत "श्रीशिवछत्रपतिमहाराज यांचें सप्तप्रकरणात्मक चरित्र" या नांवाच्या बखरींतून घेतला आहे. मल्हार रामराव चिटणीस यांनीं संभाजी, राजाराम, शाहूमहाराज वगैरेंचींहि चरित्रें लिहिलीं आहेत. त्यांचा राजनीतीवरहि एक अर्धवट भाषांतरात्मक ग्रंथ आहे. हे साताऱ्च्या महाराजांचे पदरीं होते. ही बखर त्यांनीं एकोणिसाव्या शतकाच्या

प्रथम चरणाचे सुमारास लिहिली. शिवाजीमहाराजांच्या प्राणोत्क्रमणाचें हें वर्णन अत्यंत करुणरसपूर्ण असून तें वाचीत असतां तो हृदयद्रावक प्रसंग डोळ्यांसमोर उभा राहतो व हरतऱ्हेचे विचार व भावना मनांत उत्पन्न होतात. ]

या उपरि आपली अवधी पांच सात दिवस इतकी राहिली म्हणोन सर्व मातबर सरकारकून व सरदार आदिकरून जमा करविलें आणि सर्वांस जवळ बोलावून सर्वांस दर्शन भाषण करणें तसें केलें प्रधानादि कारभारी व विश्वासू आप्त जवळ बोलावून बसवून सांगितलें जे हें राज्य आपण मोठें पराक्रमें श्रीचे प्रसादानें संपादिलें ऐशी हजार पागा केली किले कोट जंजिरे प्रांत व द्रव्यहि अनेक प्रकारचे कोट्यावधी संग्रह केला दानधर्म यश कीर्ती दोन्ही साध्य केली. पुढें याचें रक्षण करून आम्हांहून अधीक पराक्रम करून एक दिल्लीची पातशाहात व उत्तरचें राज्य साध्य करणें तें आयुष्य पुरलें नाहीं व मेळविलें राज्य व माणसें तुम्ही सर्व मोठे मोठे पराक्रमी यांचीं भूषणें योग्यता वाढवून अधीक राज्य वाढविणें येविशीं वडील पुत्र वयेंकरून योग्य परंतु क्रूर आणि व्यसनी तेव्हां पुढील विचार यथास्थित दिसत नाहीं धाकटे पुत्र गुणेंकरून युक्त परंतु वयेंकरून लहान व धाकटेच तेव्हां विभाग करून द्यावे परंतु विभागांनीं चार मातबर लोभाविष्टपणें एकांत एक विरुद्ध चालतील तेणेंकरून राजवृद्धी राहून कलह प्राप्त होईल. राज्य ऐशी मर्यादा राहणार नाहीं. वडिलांनीं राज्य करावें कनिष्ठांनीं त्याचे आज्ञेंत चालून सेवा करावी ऐसे राजधर्म तो योग दिसत नाहीं शत्रूस संधी होतील हें राज्य देवाचें देणें नाश होईल वडील संभाजी राजे याजकरितां त्याजकडेच सर्व लोक पाहतील व पाहणें प्राप्त परंतु त्यांची चाल एक प्रकार सरकारकून व योग्यतेचीं माणसें ज्यांनीं

जिवाभ्य[1] श्रम राजवृद्धीसाठीं केले तीं थोर थोर माणसें यांच्या अप्रतिष्ठा करतील नाश करतील. राज्याचा व द्रव्याचा नाश करतील बुडवितील लाहान माणसांचे सहवासेंकरून थोरांच्या अप्रतिष्ठा होतील. निर्नायकी[2] होईल. आम्ही पाया घातला माणसें गुणसंपन्न मेळविलीं वाढविलीं तीं राहणार नाहींत. द्रव्य खजीना सर्व नाश पावेल मोठा सबळ शत्रु औरंगजेब तो आपलें स्थळ सोडून निघाला असतां आमचे तेजप्रभावें आपलें राज्यांतच राहिला आहे तो पुढें चाल करील. विजापूर भागानगर[3] पादशाही कमजोर पडल्या घेउन[4] हें राज्य घेउन[5] इच्छील तेव्हां संभाजीचे वस्तूं[6] रक्षणार नाहीं परंतु होणारच ऐसें दिसतें. म्हणोन एक घटकापर्यंत नेत्र झांकून स्तब्ध जाले आणि मुखांतून अक्षरें आलीं कीं, संभाजी दगा पावेल राजारामच बळावून पुन्हा राज्य रक्षील. मोरोपंडित निराजी रावजी रामचंद्र नीलकंठ संताजी घोरपडे धनाजी जाधव पुन्हा राज्यवृद्धीस कारण होतील पुढें शिवनामें राजा होईल तो दिल्लीपर्यंत राज्य करील. इतकें बोलून सर्वांकडे पाहिलें. ते समयीं सर्वांस बहुतच कष्ट व दुःख पर्वतप्राय जालें कीं महाराजांमागें आमचें सर्वांचें वांचणें जीविका व्यर्थ होय ऐसा समय प्राप्त जाला. यानंतर महाराजांनीं आज्ञा केली कीं हा मृत्युलोक मोठे मोठे अवतारादिक गेले होणार अवश्यानें व उत्तरकाल तसें होतच असतें. तुम्ही सर्व पराक्रमी आहां कळेल तसे प्रयत्न करून राज्य व धर्म रक्षावा एकविचार सर्वांनीं चालावें म्हणून सांगून सर्वांचें समाधान केलें आणि बाहेर जवळ बसावें अशी आज्ञा केली आणि आपण श्रीगंगोदक

---

१ जिवापाड, प्राणापरतीं. २ नायक नाहीं अशी स्थिति, बेबंदशाही. ३ हैदराबाद. ४ समजून. ५ घेऊं (अशा शब्दांतील अनुस्वाराबद्दल पूर्वी क्वचित् प्रसंगीं 'न' लिहीत असत). ६ (आरबी शब्द 'वासिता' = माध्यम) कडून, गुजारतीनें, संभाजीच्यानें.

घेऊन स्नान केलें प्रायश्चित्तविधि केला भस्मधारण रुद्राक्ष-तुळसीमाला धारण केलें आणि दर्भासनीं बसले शत गोप्रदानें प्रत्यक्ष करून सहस्र गोप्रदानें द्रव्यद्वारा संकल्प केला आणि श्रीदेवाजीचें नामस्मरण अविस्मरणें करून भगवत्गीता व सहस्रनामें पाठ करविले ब्राह्मणांचे घोष ऐसे होत असतां शके १६०२ रौद्रनाम संवत्सरे चैत्र शुद्ध पौर्णिमा उत्तरायण दोनप्रहरीं देहत्याग करून अवतार समाप्त श्रीराम ऐसें म्हणून केला.

ते समयीं दुश्चिन्हें दिशा धूम्र व नक्षत्रपात भूमिकंप इंद्रधनु रात्रीस ऐसे उत्पात होते जाले शंभुमहादेव येथील तळ्याचें पाणी रक्ताप्रमाणें तीन दिवस जालें. जलचरें फार मेलीं ऐसे अनर्थ जाले.

यावरि सर्व कारभारी कार्याध्यक्ष आबालवृद्धस्त्रीजन मोठा हाहाकार जाला नंतर सर्व प्रधानादिक मिळोन दरवाजे बंद करून बातमी बंदोबस्त होय तों न फुटावी ऐसें करून शिबिका आणून सर्व राजचिन्हें व उपचार करून यथाविधि मंत्राग्नि करविला सहगमन पुतळाबाईसाहेब यांणीं केलें उत्तरक्रिया साबाजी भोसले सिंगणापूरकर यांजपासून राजाराम यांस समीप बसवून करण्यास प्रारंभ केला बहुत दानधर्म महादानादी करते जाले.

या प्रकारें करून महाराज पुण्यश्लोक योगियांसही जे गती असाध्य ते चतुर्विध पुरुषार्थ साधून मोक्षाचे अधिकारी जाले. प्रकरण समाप्त सप्तम जालें. श्रीरस्तु. मंगलानि भवंतु. या प्रकारेंकरून महाराजांनीं प्रतापचरित्र करून वैकुंठवास केला. हे कथा श्रवण मनन पठण केली असतां सर्व विघ्नें दूर होऊन पुण्य व यश प्राप्त होईल. आणि सर्वगुणसंपन्नता प्राप्त होऊन सकल ऐश्वर्यलक्ष्मी तात्काळ प्राप्त होईल.

**मल्हार रामराव चिटणीस**

( सप्तप्रकरणात्मक चरित्र )

**प्रश्न व सूचना**

( १ ) मल्हार रामराव चिटणीस यांचे मतें शिवाजीचें ध्येय काय होतें ? आजकालची स्वराज्याची कल्पना त्या वेळीं होती काय ?

( २ ) लेखकाच्या काळच्या सामाजिक व धार्मिक समजुती आणि चालीरीती यांसंबंधीं या उताऱ्यावरून तुम्हांस काय माहिती मिळते ?

( ३ ) पुढील शब्द व वाक्यरचना लक्षांत घेण्याजोग्या आहेतः—

येविशीं; वाचणें जीविका; ते समयीं दुश्चिन्हें दिशा धूम्र......ऐसे उत्पात होते जाले सहगमन पुतळाबाईसाहेब यांनीं केलें.

---

# नुकसान झालें पण दोष कोणाचा ?

[ 'बाळमित्र' पुस्तकाचा १ ला भाग सदाशिव काशीनाथ ऊर्फ बापू छत्रे यांनीं सन १८२८ मध्यें छापला. त्याचा २ रा भाग कॅप्टन गेसफर्ड ( Capt. Gaisford ) यांनीं प्रसिद्ध केला. दोन्हीहि भाग मूळ बर्किनकृत फ्रेंच पुस्तकाच्या इंग्रजी तर्जुम्याचे तर्जुमे आहेत. बाळमित्राचे दोन्ही भाग एके काळीं फार लोकप्रिय होते व अद्यापिहि त्यांतील भाषा पुष्कळांना मनोरंजक वाटते. भाषेचा नमुना म्हणून दुसऱ्या भागांतील पुढील उतारा घेतला आहे. ]

एके दिवशीं रामचंद्र विसरभोळेपणानें बागाचा झोंपा[1] न लावितां घरतां गेला असतां तेथें जवळच एक कोंबडी दाणे शोधीत होती ती रामचंद्राचे बागांत गेली, आणि रामचंद्रानें नुकतेंच फुलझाडांस खत घातलें होतें तेथें उत्तम प्रकारचे जीवजंतु मिळतील म्हणून मोठ्या हर्षानें ती जाऊन चोंचेनें व पायांनीं माती उकरूं लागली, व तेथेंच रामचंद्रानें दवण्याचें बीं टाकलें होतें त्या ठिकाणीं तर तिनें फारच उकरून नाश केला.

---

१ झोंपडी, झोंपडीचा दरवाजा, दरवाजा. 'बैल गेला झोंपा केला.'

रामचंद्र परतून बागाकडे आला तेव्हां दरवाजा उघडा आहे, बागांत कोंबडी जशी कांहीं माळीण चमत्कारिक काम करते आहे, हें पाहतांच त्याला अतिशय क्रोध आला, आणि मोठ्या स्वरानें म्हणतो किती नाश केला दुष्टेनें! थांब तुझें आतां काम काढितों. असें म्हणून कोंबडीस जावयास वाट न मिळावी म्हणून बागाचें दार बंद केलें, आणि दगड, धोंडे, ढेंकूळ इत्यादि जें हातीं सांपडलें तें घेऊन तिचे पाठीमागें लागून तिला मारूं लागला.

कोंबडी भयाभीत होऊन तिच्यानें होई तितकें करून इकडे तिकडे पळून भिंतीवरून उडून जाण्याचा यत्न करूं लागली; परंतु तिची उडी भिंतीवर न जातां पुन्हा रामचंद्राचे फुलझाडांवरच ती पडे. असें होतां होतां एके ठिकाणीं गुलाबाची पैन्हेरी[1] केली होती तींत तिचे पाय व पंख गुंतून ती अडकली, तेव्हां रामचंद्रास वाटलें कीं आतां कोंबडी सांपडली, म्हणून तिला धरावयासाठीं गेला, तों पात्रेच्या वाफ्याचे वेरंबे[2] नवेच बांधले होते त्यांवर पाय कसा द्यावा हें रागाचे भिरीरींत ध्यानांत न आणितां पाय देऊन ते त्यानेंच तुडवून टाकिले.

कोंबडी आपला शत्रु आला असें पाहून घाबरी झाली, आणि पुन्हा भिंतीवर उडावयास प्रयत्न करूं लागली, तथापि तिची उडी भिंतीचे माथ्यावर गेली नाहीं; परंतु उडते समयीं पंखांच्या फडाक्यानें जवळचा दवणा मात्र मोडला.

असा नाश झाला तो पाहतांच त्यानें हातांत पावडें घेऊन रागें रागें मोठ्या जोरानें तिच्या आंगावर फेंकलें, परंतु तें तिला न लागतां चक्रासारखें उडून खिडकीवर पडलें, तेणेंकरून त्या खिडकीचीं दोन

---

१ रोपें तयार करण्याची जागा. २ (रोपांभोंवतीं केलेले मातीचे) बांध, उंचवटे.

भिंगें फुटलीं आणि पावडें दगडावर आपटून मोडलें. हें नुकसान होतांच रामचंद्र कुदळ आणावयास धांवला, तों तिकडे कोंबडी अगदीं दमून एके ठिकाणीं कोपऱ्यास जाऊन बसली. कदाचित् तो कुदळ आणता तर त्या बापडीचीं वर्षें भरलीं असतीं.

परंतु इतक्यामध्यें तो गलबला ऐकून गोविंदराव धांवत आला. रामचंद्र आपल्या बापास पाहतांच गलबलून उभा राहिला; पण तोंडावाटे अशीं अक्षरें निघालीं कीं, पहा तात्या, ही कशी द्वाड जात, हिनें माझे बागांत किती खराबी केली ती!

गोविंदरावानें त्याचें बोलण्याची अनास्था केल्यासारखें करून उत्तर दिलें कीं, जर त्वां दार उघडें ठेविलें असतें तर ही खराबी कशानें झाली असती? ती तर कोंबडी, अज्ञानच, तुझा नाश होईल हें ज्ञान तिला आहे कीं काय? असें असतां त्या गरिबावर दांडगाईनें त्वां आपलें सर्व बळ योजिलें, तुला लाज कशी रे वाटली नाहीं? तिच्या आंगीं विचार आहे कीं काय? तुझ्या नुकसानीसाठीं तिनें फुलझाडें उपटलीं असें नाहीं, आपल्या आहाराकरितां मात्र.

ती आपला आहार शोधीत असतां जर तिनें गवताचीं मुळें उकरलीं असतीं तर तुला इतका राग येता? तिचे गांवीं गवत आणि फुलझाडें दोन्ही सारखींच. तूं युक्तीनें काम करतास तर इतका नाश कां होता? पाहतां अंतीं दोष तुजकडेसच. जर तिला हळूच बाहेर हांकून लावलें असतें तर माझ्या खिडकीचा व पावड्याचा नाश झाला नसता; दोन तीन झाडांची काय खराबी झाली असती ती असती.

आतां तिचे वांटची तुलाच शिक्षा करावी हें योग्य. जर आतां ह्या झाडाची एक चांगली छडी काढून जसें तूं कोंबडीचें पारिपत्य करीत होतास तसें मीं तुझें केलें तर कसें? परंतु सर्वांस राग

आटोपायाचें सामर्थ्य आहे, ह्याचे खरेपणाची खात्री तुला करून दाखवितों. जरी मला राग आला आहे तरी मी आतां तुला मारीत नाहीं, परंतु तुझ्या रागामुळें जो माझे खिडकीचा नाश झाला तो मी सोसणार नाहीं. तर इतकेंच करीन, कीं तुझ्या खाऊच्या पैशां-तून खिडकी नीट करावयापुरते काढून घेईन.

असें बापाचें बोलणें ऐकतांच रामचंद्र खजील होऊन तेथून निघून गेला, आणि ते दिवशीं पुनः बापापुढें तोंड दाखविण्याचे त्यास धैर्य राहिलें नाहीं.

दुसरे दिवशीं गोविंदरावानें रामचंद्रास म्हटलें कीं, तुझा संतोष असला तर मजबरोबर बागांत फिरावयास ये. नंतर रामचंद्र बापा-संगतीं बागांत गेला, परंतु आदले दिवशींच्या अन्यायाची जी दिलगिरी त्याचे मनांत होती ती त्यास लपवितां आली नाहीं. बापानें त्याची ती मुद्रा पाहून विस्मयानें विचारलें कीं, मुला तूं असा खिन्न कां दिसतोस? तुला खेद होण्याचें कारण काय?

**रामचंद्र**—मी खिन्न आहें यांत आश्चर्य काय? गेल्या महिन्या-पासून आपले खाऊचे पैसे एक दमडी न खर्चितां म्यां जमा करून ठेविले आणि मनांत योजिलें कीं हे दहा रुपये जमले आहेत ह्यांची बयाला चांगली साडी भाऊबिजेचे दिवशीं घेईन, परंतु आतां अर्धे अधिक रुपये तुमचे खिडकीकडे खर्च होतील मग तें कशानें घडणार?

**गोविंदराव**—बहिणीस भाऊबिजेबद्दल साडी देणार होतास म्हणून तुला आनंद होतो खरा, परंतु अगोदर खिडकीच नीट केली पाहिजे. कां कीं, रागाच्या योगानें नाश फार होत असतो, म्हणून राग आटोपला पाहिजे, ह्यासाठीं ही शिक्षा तुझ्या अनुभवास आली म्हणजे पुनः असा रागास येणार नाहींस.

**रामचंद्र**—तात्या, मी आजपासून बागाचा झोंपा कधीं उघडा ठेवणार नाहीं. जरी कदाचित् मी चुकलों तरी कोंबडीचें पारिपत्य करणार नाहीं.

**गोविंदराव**—काय ? ह्या पृथ्वींत कोंबडीच का एवढी तुझा अपराध करणारी आहे. दुसऱ्या कोणास तुझा नाश करितां येणार नाहीं कीं काय ?

**रामचंद्र**—नाहीं नाहीं, तात्या. एकदां मी पृथ्वीच्या नकाश्याचा पट बसकरावर पसरून बाहेर गेलों, तों इतक्यांत माझी धाकटी बहीण खोलींत आली आणि तिनें दौतींत लेखणी बुचकळून त्या नकाश्यावर बिरखुड्या ओढल्या. आतां त्यांत गुजराथ कोठें, बंगाला कोठें हें कांहींच समजत नाहीं, काय करावें ?

**गोविंदराव**—तर दुसऱ्याकडून आपणास असा अनर्थ न व्हावा, ह्याविषयीं प्रथमच बंदोबस्त राखावा कीं नाहीं ?

**रामचंद्र**—होय तात्या.

**गोविंदराव**—तुला जिवाचा कंटाळा यावा म्हणून मी सांगत नाहीं. पण तुला समजावयासाठीं सांगतों कीं, कोंबडीनें जो तुझा नाश केला त्यापेक्षां अधिक अनर्थकारक गोष्टी ह्या आयुष्यांत तुला पुष्कळ भोगावयास पडतील. जशी कोंबडी तुझा नाश होईल हें मनांत न आणतां किडे वेंचावयास लागली, तसे लोक तुझें हित किंवा अहित हें मनांत न आणितां आपलेंच सुख पाहतील.

**रामचंद्र**—धाकटे बहिणीचे कृत्यावरून पाहतां मला असें वाटतें कीं, बिरखुड्या ओढण्यांत तर तिला सुख थोडेंच झालें असेल, परंतु तिनें तितक्याच सुखासाठीं माझे परम उपयोगी नकाश्याचा नाश केला.

**गोविंदराव**—तुला बाहेर जावयाचें होतें तर अगोदर त्या पटाची घडी करून ठेवावी कीं नाहीं ?

**रामचंद्र**—होय, करून ठेवावयाची होती खरी.

**गोविंदराव**—तर आतां आजपासून सावधपणें असें रहावें कीं लोकांपासून आपला कांहींच नाश न होई. कदाचित् दैवयोगानें झाला तर मूळचा झालेला नाश अधिक होऊं न देतां युक्तीनेंच तेवढा सोसला पाहिजे.

( बाळमित्र, भाग २ )

**प्रश्न व सूचना**

( १ ) कॅ० गेस्फर्डच्या पुस्तकासंबंधीं प्रो० पोतदार आपल्या 'मराठी गद्याचा इंग्रजी अवतार' या पुस्तकांत म्हणतात कीं, " आंतील भाषा पहातां कोणा गेस्फोर्डनें अशी सुंदर मराठी लिहिली असेल हा संभव थोडा वाटतो; व गेस्फोर्डच्या नांवामागें कोणी कसलेला एतद्देशीय लेखक असावा." तुम्हांला या शंकेसंबंधीं काय वाटतें तें सदरहु उताऱ्यांतील भाषेच्या पुराव्यावरून सांगा.

( २ ) धरतां, बागाकडे, नाश न होई, नकाऱ्याचा इत्यादि रूपांकडे लक्ष द्यावें.

( ३ ) या धड्यापासून कोणता बोध घ्यावयाचा हें तुमच्या शब्दांत सांगा. याच भावार्थाची दुसरी एक गोष्ट रचून सांगा.

( ४ ) भाषांतरित भाषा कशी सदोष असते हें या उताऱ्यांतील कांहीं उदाहरणें देऊन सांगा.

( ५ ) उतारा भाषांतरित असतांहि कित्येक ठिकाणची भाषा सुंदर व अस्सल मराठी आहे हें उदाहरणें देऊन दाखवा.

( ६ ) पान २६ वर " जर त्वां दार उघडें ठेविलें असतें " याबद्दल " जर त्वां दार उघडें ठेविलें नसतें " असें वाचावें असें कांहीं लोक म्हणतात. तुम्हांला काय वाटतें ?

---

# शतपत्रांचा इत्यर्थ

[गोपाळराव हरि देशमुख हे 'लोकहितवादी' म्हणून प्रसिद्ध आहेत. (जन्म १८२३; मृत्यु १८९२). यांची बुद्धि फार चौकस होती व सार्वजनिक प्रश्नांची चर्चा करण्याची त्यांना मोठी हौस होती. त्यांचीं मतें परंपराभिमानी लोकांना प्रिय होण्यासारखीं नव्हतीं, तथापि ते निर्भीडपणें पत्रांच्या, निबंधांच्या व पुस्तकांच्या द्वारें तीं प्रसिद्ध करीत असत. यांचीं 'पृथ्वीराज चव्हाण', 'ऐतिहासिक गोष्टी व टिपणें' (दोन भाग), 'राजस्थानचा इतिहास', 'गुजराथचा इतिहास', 'दयानंद यांचें चरित्र', 'स्वाध्याय', 'शतपत्री' ही पुस्तकें प्रसिद्ध आहेत, पण तीं आज दुर्मिळ झालीं आहेत.

विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं निबंधमालेंत त्याचेवर कडक टीका केली आहे व ही टीका तत्कालीन सामान्य समाजाच्या मताची निदर्शक समजण्यास हरकत नाहीं. अशा प्रतिकूल टीकेस भीक न घालतां लोकहितवादींनी समजाचे डोळ्यांत अंजन घालण्याचें काम चालू ठेविलें हे त्यांचे महाराष्ट्रीय समाजावर उपकार आहेत. ते समाजाचे दोष वारंवार कां दाखवीत, व समाजांतील कांहीं चालीरीतींची हास्यास्पदता चवाठ्यावर कां आणीत याचें मर्म 'शतपत्रांतील' 'शतपत्रांचा इत्यर्थ' या शंभराव्या पत्रावरून कळून येईल.]

मी आपले श्रम या पत्रांत संपूर्ण करणार. यास्तव या पत्रशतकाविषयीं कांहीं सुचवितों. आज दोन वर्षे मीं लोकांस त्यांची स्थिति-रीति कशी आहे ती अगदीं भीड न धरितां उघड करून सुचविली. त्यांत एखादें अक्षर अधिकउणें, शुद्धाशुद्ध कोणास वाटलें तर त्यांनीं क्षमा करावी. माझ्या जिवाची पक्की खात्री झाली आहे कीं, जो कोणी या पत्रांचें अवलोकन करील आणि विचार करून पाहील त्यास प्रत्येक शब्द खरा आहे असें वाटेल. 'लोकहितवादी'नें कोणाची मजुरी पत्करली नाहीं. कशाची अपेक्षा, आशा किंवा इच्छा धरली नाहीं, कोणाचे सांगण्यावरून किंवा शिकविण्यावरून कृत्रिम वर्णन केलें नाहीं, लाभावर किंवा द्रव्यावर


लोकहितवादी

नजर देऊन कीर्ति व्हावी या हेतूनें लिहिलें नाहीं. इतके श्रम जे केले ते फक्त लोकांस त्यांची वास्तविक स्थिति कशी आहे ती कळावी, त्यांनीं सुधारावें, त्यांस इहलोकीं सुखवृद्धि व्हावी, परलोकाचें साधन घडावें व आपले बहुत काळापासून दृढ ग्रह झाले आहेत त्यांपैकीं कांहीं अविचारानें व मूर्खपणानें जडलेले आहेत ते कमी व्हावे किंवा नाहींसे व्हावे इतक्याच हेतूनें मीं यथामतीनें व इच्छेनें वेतनावांचून श्रम केले आहेत व जितकें लिहिलें आहे तें अक्षरशः खरें निवडून विचार करून काळजीनें लिहिलें आहे. हें लिखितशतक कोणी बाळबोध अथवा मोडी छापून मुलांस वाचण्यास दिलें तर बहुत फायदा होईल. यास्तव या ग्रंथावर 'लोकहितवादी' आपली सत्ता ठेवीत नाहीं. पाहिजे त्यांनीं हीं छापून प्रगट करावीं. कांहीं दिवसांनीं 'लोकहितवादी' दुसऱ्या शतकास आरंभ करील परंतु ही गोष्ट ईश्वराचे स्वाधीन आहे. मला वारंवार लोकांस इतकेंच सुचवावयाचें कीं, मीं कांहीं व्यर्थ, मिथ्या किंवा असत्य लिहिलें नाहीं. जें लिहिलें तें यथार्थ आहे असें मला तर खचित वाटतें. जे

सारासार विचार करणारे, ज्यांचीं मतें पंडितांसारखीं कुत्सित नसून विस्तीर्ण झालीं आहेत, त्यांस समजेल. माझी सर्व जगास एवढीच विनंति आहे कीं, तुम्ही सर्वजण विचार करण्यास लागा, वाचावयास लागा, नवीन ग्रंथ व वर्तमानपत्र वाचा. तुमचे शेजारीं काय होत आहे याचा विचार करा. इंग्रजांमध्यें किती एक चांगले गुण आहेत ते तुम्हांस प्राप्त व्हावे, म्हणून ईश्वरानें ही तुमची त्यांची संगत घातली आहे हें लक्षांत आणा. सारासार पहा. परंपरा आंधळ्याची माळ लागली म्हणून तीच चालवूं नका. धर्मशील ईश्वरतत्पर व्हा. या गुणावांचून सर्व व्यर्थ आहे. सत्य बोला, दुष्ट वासना सोडा, धर्म-सुधारणा करा, म्हणजे जुनें टाकूं नका परंतु त्याचा अर्थ घ्यावयाचा तो काळ पाहून घ्या व ईश्वरासंबंधीं, जगासंबंधीं ज्ञान सर्व लोकांत वृद्धिंगत करा. आळस सोडा. तुमच्यामध्यें वास्तविक बुद्धिमान् असेल त्यास पुढारी करा. त्याचे अनुमतीनें चाला. सर्व लोकांची जूट असूं द्या. आपसांत फुट नसावी हें ध्यानांत वागवा. विद्या अधिक होऊन तुमचें पाऊल पुढें पडूं द्या. सर्व देशाची काळजी प्रत्येकजणानीं करावी, राज्य कसें चाललें आहे व राजा कोण, त्याची वर्तणूक कशी हें पाहात जा. माहीतगार व्हा. तुमच्या प्राचीन काळच्या विद्या, ग्रंथ, तर्क व कल्पना यांचे शंभरपट व हजारपट आतां चांगल्या विद्या व कल्पना निघाल्या आहेत त्या सर्व पहा. पैसा खाऊं नका. प्रपंच संसार भलाईनें करा. आपले शत्रूस देखील वाईट इच्छूं नका. शरीरानें व मनानें देखील पाप करूं नका. प्राणि-मात्रावर दया करा. अपराध क्षमा होतील तितके करा, परंतु क्षमा न करण्याचा प्रसंग येईल तेथें क्षमा करूं नका. एकमेकांवर प्रीति करा. नित्य उठून ईश्वराचें भजन व प्रातःकाळीं चिंतन करीत जा व त्याजजवळ क्षमा मागा. आपले हातून पापें व अपराध बहुत घडतात

त्यांची क्षमा भगवंताशिवाय करणार कोणी समर्थ नाहीं. ढोंग सोंग करूं नका. लबाडी सर्वदा ईश्वरास दिसते यास्तव ती कदापि करूं नका. कोणतेंहि पाप करूं नका. तें फार वाईट. इहलोकीं सुख वाटेल परंतु त्याचा झाडा द्यावा लागेल. मरावयाचें आहे हें नित्य मनांत आणा. तुम्ही आपले मुलांची काळजी करून त्यास शहाणे करा व सर्व लोकांची काळजी करा. नित्य कांहीं तरी सर्व देशाचें कल्याण केल्याशिवाय एक दिवस जाऊं देऊं नका. मुख्य ईश्वरभजन करण्याचा मार्गच आहे कीं कोणास दुःख देऊं नये व लोकाचें हित करावें. स्वदेशाचें हित इच्छावें म्हणजे परदेशाची हानि इच्छावी असें नाहीं. परंतु सांप्रत आपले लोक फार वाईट अवस्थेंत आहेत, सबब फार खबरदारी ठेवावी कीं या लोकांचें कल्याण कसें होईल. तुम्ही आपल्यास योग्य करा. अब्रु वाढवा. पैका मिळाला तर अब्रु वाढते असें नाहीं. अब्रु खरेपणा व निर्मळपणा यांपासून उत्पन्न होते. विद्या केली तर त्याप्रमाणें वागणूक पाहिजे नाहीं तर विद्या व्यर्थ आहे. विद्येचें सार्थक रोजगार नव्हे; ज्यास विद्येचा अर्थ ठाऊक नाहीं ते तसें म्हणतात; परंतु फक्त पोटच भरणारी ती विद्या नव्हे. ती मजुरी आहे. विद्या म्हणजे ज्ञान, जेणेंकरून मनुष्य निर्मळ होतो, विचारी होतो. उनाड जे लोक आहेत ते विद्येचें तात्पर्य द्रव्य मिळविण्याचें असें समजतात, परंतु विद्येपासून द्रव्यालाभही होतो व दुसरे अनेक लाभ होतात. याप्रमाणें तात्पर्य मीं निरूपण केलें. याप्रमाणें सर्वांनीं चालावें. असें होण्यास माझे श्रम कांहीं उपयोगी पडले असें दृष्टोत्पत्तीस आल्यास माझे श्रम परिहार होतील. माझें मागणें सर्व लोकांस आहे, कीं मीं जें लिहिलें आहे त्याचा विचार करून पहा. तुमच्या चांगल्यावांचून त्या लिहिण्याचा हेतु नाहीं. तुमचें कल्याण

व्हावें म्हणून मी झटतों, व तुमच्या चुका वगैरे मी उघड करून दाखविण्यांत तुम्हांस रागरोष येईल, हें मीं मनांत आणलें नाहीं. कारण कीं माझी उत्कंठा तुमच्या सुधारणेकडे फार आहे. माझें अंतःकरण सर्व तिकडे आहे. यास्तव मीं जें लिहिलें आहे त्याचा तुम्हीं विचार करावा. कारण कीं, ज्यानें तुमची सेवा एकनिष्ठेनें व निष्कपटपणानें केली त्याजवर तुमची इतराजी नसावी. किंबहुना तो काय बोलतो हें तरी मनन करावें. अस्तु. तुमची आमची गांठ आज दोन वर्षें सतत होती याचा मोठा आनंद सर्वकाळ वाटेल. सर्वांनीं कृपालोभ असो द्यावा, हे विनंति.

लोकहितवादी

( शतपत्रांचा इत्यर्थ )

### प्रश्न व सूचना

( १ ) लोकांचे दोष दाखविले असतां अप्रियता पदरीं येण्याचा बराच संभव असतो. ही अप्रियता पदरीं येणार नाहीं अशा रीतीनें दोष दाखविणें शक्य आहे काय ? असल्यास दोष दाखविणारानें काय केलें पाहिजे ?

( २ ) विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं आपल्या निबंधमालेंत 'लोकहितवादी' या लेखमालेंत गोपाळ हरि देशमुख यांचेसंबंधीं टीका केली आहे ती जिज्ञासूंनीं वाचावी.

( ३ ) भाषेवरून पुष्कळ वेळां लेखकाची आस्था दिसून येते असें म्हणतात. वरील उताऱ्यांतील भाषेमध्यें लेखकाची आस्था दर्शविणारे असे कांहीं विशेष तुम्हांला दिसतात काय ?

( ४ ) यथार्थ, प्राणिमात्र, रोजगार, खबरदार, उत्कंठा या शब्दांसंबंधीं व्याकरणविषयक टीपा द्या.

# ज्यास कोणत्याहि गोष्टीची ददात नाहीं त्याची ददात

[ सदर उतारा कृष्णशास्त्री चिपळूणकर यांच्या भाषांतरित 'रासेलस'मधील आहे. रासेलस हा हबसाण (ॲबिसीनिया) देशच्या एका मोठ्या प्रतापी बादशहाचा चौथा पुत्र. तो, त्याची बहिण निकाया व इम्लाक हे सुखाच्या शोधार्थ जगांत हिंडताहेत अशी डॉ. जॉन्सननें कल्पना केली आहे, व जागोजाग त्यांना काय काय अनुभव आले हें त्यानें आपल्या कादंबरींत दाखविलें आहे.

रासेलसला 'आनंदगुहा' नांवाच्या एका मोठ्या गुहेंत जगापासून तो अलिप्त राहील अशा रीतीनें कोंडून ठेविलें होतें. ही गुहा मोठी अफाट असून तेथील जमीन पिकाऊ असल्यामुळें तेथें राहणाऱ्या लोकांच्या निर्वाहाचे सर्व पदार्थ तेथल्या तेथेंच पिकत. ऐषआरामाचे व उपयोगाचे जिन्नस वर्षांतून एक वेळ बादशहा आपल्या मुलांस भेटावयास येई तेव्हां घेऊन येत असे. या स्थळीं राहणाऱ्यांस दिसण्यांत सुख व निर्घोरपणा हीं इतकीं आहेतशीं दिसत, कीं जे नवीन तेथें येत त्यांस अशी स्थिति सदोदित असावी अशी इच्छा होई. जो तेथें एकदां राहण्यास जाई त्याला पुनः बाहेर येऊं देत नसत. राजपुत्राला दिसण्यांत तरी कोणत्या गोष्टीची ददात नसतांना त्याला सुख कां होत नव्हतें हें पुढील उताऱ्यांत सांगितलें आहे. ]

राजपुत्रांच्या शिक्षकांपैकीं एक शिक्षक रासेलसाच्या मागून त्यास न कळत रानांत गेला होता म्हणून मागील भागांत सांगितलें होतें. त्या शिक्षकास असें वाटलें कीं, या राजपुत्राची वृत्ति बिघडण्याचें कारण आपणांस कळलें; तर आतां उपदेश करून ह्यास बेतावर आणावें. अशा उद्देशानें तो शिक्षक त्याशीं संभाषण करण्याचा प्रसंग आणण्यास झटूं लागला. परंतु त्याची बुद्धि सर्व नाहींशी झाली असें राजपुत्रास वाटून त्या वृद्ध मनुष्याशीं संभाषण करण्यास तो खुषी नव्हता. तो आपल्याशीं म्हणे कीं, "हा म्हातारा

असा माझ्या पिच्छास कां बरें लागला आहे? ज्या गोष्टी याजपासून मीं पूर्वीं ऐकिल्या, त्यांचा विसर हा मला पडूं देत नाहीं काय? त्या गोष्टी नवीन असल्यामुळें त्या ऐकून पूर्वीं मला आनंद होत असे खरा; पण आतां तसा पुनः होण्यास त्या विसरल्याशिवाय दुसरा उपाय नाहीं." नंतर तो नित्याप्रमाणें रानांत फिरावयास गेला; आणि एकांतस्थळीं बसून स्वस्थ मन करून रोजच्याप्रमाणें विचार करण्यास आरंभ करतो इतक्यांत शेजारीं त्याचा जुना गुरु उभा राहिलेला त्याच्या दृष्टीस पडला. त्यास पाहिल्याबरोबर प्रथमतः त्याच्या मनांत असें आलें कीं, ह्याशीं कांहीं न बोलतां तसेंच निघून जावें. तथापि तो पूर्वीं त्यास मोठा मान देत असे, यास्तव त्याची त्याजवर ममता होती; या कारणास्तव त्याचें मन त्याच्यानें दुखवेना. मग त्यानें हाक मारून आपल्या शेजारीं त्यास बसावयास जागा दिली.

हें पाहून म्हाताऱ्यास उत्तेजन आलें आणि तो त्यास म्हणतो, "हे राजपुत्रा, अलीकडे थोड्या दिवसांत तुझ्या चित्तांत स्वस्थता वाटत नाहींशी झाली आहे हें पाहून मला फार दुःख होतें. राजवाड्यांत चैन चालली असतां ती सोडून तूं रानांत एकांतीं येऊन बसतोस याचें कारण काय?" राजपुत्रानें उत्तर केलें, "चैनीपासून माझे मनास पूर्वींप्रमाणें आनंद होत नाहीं म्हणून मी ती सोडून जातों. आतां मी एकांतीं येऊन बसतों याचें कारण हेंच कीं, आपली चिंताग्रस्त व दुःखित मुद्रा दाखवून दुसऱ्यांच्या आनंदाचा विरस करणें मला नीट वाटत नाहीं.

तें भाषण ऐकून तो वृद्ध पंडित म्हणाला, "ह्या आनंदगुहेंत दुःखित म्हणून मी तुलाच पहिल्यानें पाहतों; आजपर्यंत दुःखी मनुष्य येथें कधींच पाहिलें नाहीं. मला असें वाटतें, तुला दुःख

वाटण्याचें कारण या जागीं कांहीं नाहीं; व विचार करशील तर तुझ्याही मनाची अशीच खात्री होईल. पहा, हबशी देशाच्या बादशहास प्राप्त होण्यासारखीं जीं जीं सुखें आहेत तीं सर्व येथें तुला अनुकूल आहेत. या जागीं कोणत्याही प्रकारचा घोर बाळगण्याची तुला गरज नाहीं. नानाप्रकारचीं दुःखें सोसून जे जे उत्तम पदार्थ मनुष्यें मिळवितात, ते सर्व तुम्हां राजपुत्रांच्या सुखाकरितां येथें आयतेच सिद्ध आहेत. तेव्हां केवढें बरें तुमचें दैव! तुला येथें कोणतें उणें आहे? आणि तुला जर कोणताही उणेपणा नाहीं तर मग तूं दुःखी कसा?"

राजपुत्रानें उत्तर केलें, "मला कोणताही उणेपणा नाहीं किंवा कोणता उणेपणा आहे हें मला कळत नाहीं हेंच माझें दुःखाचें कारण होय. कारण, अमक्या गोष्टीची मला न्यूनता आहे असें जर मला समजतें, तर मला त्या गोष्टीविषयीं स्पष्ट इच्छा होती; सूर्योदय झाल्यापासून तों संध्याकाळपर्यंत सर्व वेळ मला त्रासदायक लांबचलांब जसा वाटतो तसा न वाटता; किंवा हल्लीं उठलें आणि झोंप येईनाशी झाली म्हणजे जीवनाचा कंटाळा विसरविणारी झोंप तरी मला पुष्कळ कां येत नाहीं असा जो खेद होतो तो न होता. कोंकरें व करडें एकमेकांच्या पाठीस लागतांना दृष्टीस पडलीं म्हणजे मला असें वाटतें कीं, ज्यांत गुंतून राहीन असा मला कांहीं उद्योग सुचता तर किती सुखी होतों? परंतु ज्या ज्या पदार्थांची मला गरज आहे, ते सर्व श्रम केल्यावांचून मला अनुकूल असल्यामुळें सर्व दिवस व सर्व तास मला अगदीं एकसारखे भासतात. विशेष म्हणून इतकाच दिसतो कीं, पहिल्यापेक्षां दुसरा अधिक कंटाळवाणा वाटतो. गुरुजीबाबा, आपण बहुत पाहिलें आहे; तर आपणास माझी हीच विनंति आहे कीं, मी जेव्हां लहान होतों त्या वेळीं मला

जग नवें वाटत असे व प्रत्येक क्षणीं अपूर्व नवा पदार्थ पाहण्यांत येऊन दिवस लहान वाटत. तर आतांही तसें लहान वाटण्याची कांहीं युक्ति असेल तर सांगा. मी सुखांचा मनस्वी उपभोग घेऊन विटलों. आतां जीविषयीं मला इच्छा वाटेल अशी एखादी वस्तु तुम्हांस ठाऊक असेल तर सांगा."

म्हाताऱ्यास दुःखाचें हें अपूर्व कारण पाहून मोठा अचंबा वाटला. त्यावर उत्तर काय करावें हें त्यास सुचेना. परंतु निरुत्तर राहणें नीट न वाटून तो म्हणाला, "बाबा, जगांतील दुःखें जर तुला माहीत असतीं तर तुला तुझ्या सुखांचा वास्तविक थोरपणा कळता."

राजपुत्र म्हणाला, "हां-हां, मला इच्छिण्यासारखी गोष्ट तुम्ही आतां बोललां खरी. जगांतील दुःखें पाहण्याविषयीं मला फार उत्कंठा वाटते; कां तर, तुमच्या बोलण्यावरून तीं दुःखें पाहिल्या-वांचून मला आपल्या स्थितीची गोडी व थोरपणा हीं बरोबर कळणें नाहीं."

कृष्णशास्त्री चिपळूणकर
(रासेलस)

### प्रश्न व सूचना

(१) रासेलसला सर्व प्रकारचीं सुखें उपलब्ध असतां त्याला समाधान कां नव्हतें हें तुम्ही आपल्या शब्दांत सांगा.

(२) कोणत्याहि गोष्टीची हौस नसणें म्हणजेच जिवंतपणचें मरण असें एकानें म्हटलें आहे याचा अर्थ काय? या मरणाचा प्रसंग येऊं नये म्हणून विद्यार्थिदशेपासूनच काय खबरदारी घेतली पाहिजे?

(३) डॉ. जॉनसन यांनीं इंग्रजींत लिहिलेलें 'रासेलस' जिज्ञासूंनीं घेऊन या उताऱ्यांतील कोणतेंहि दोन परिच्छेद मुळाशीं ताडून पाहावे व या भाषांतराचे गुणावगुण ठरवावे.

(४) रान, पिच्छा, अनुकूल या शब्दांची व्युत्पत्ति सांगा.

---

# विभाग २

## टीकाकाराचे अंगीं अवश्य असलेले गुण

[ विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं लिहिलेल्या 'निबंधमालें'तून पुढील उतारा घेतला असून तो भाषादृष्टीनें तर सुंदर आहेच, शिवाय हल्लींच्यासारख्या टीका-प्रधान युगांत मननीयहि आहे. ]

आतां ग्रंथांवर टीका करणाराचे अंगीं अवश्य गुण कोणकोणते हवेत तें सांगतों. प्रथमतः अर्थातच मूळ ग्रंथाचें ज्ञान. हें असल्या-



विष्णुशास्त्री चिपळूणकर

शिवाय टीकाकार एरवीं केवढाहि विद्वान असला तरी तें व्यर्थ होय हें उघड आहे. ही गोष्ट वास्तविक पाहतां अगदीं स्पष्ट होय; कारण ज्या मनुष्यास एखाद्या वस्तूचें पूर्ण ज्ञान नाहीं, किंबहुना मुळींच नाहीं, त्यानें त्याविषयीं आपलें मत सांगणें हें मुळींच शोभत नाहीं हें अगदीं उघड आहे. पण मनुष्याच्या मनाचा असा कांहीं चमत्कार आहे कीं, स्वतःच्या अज्ञानाची केवळ कल्पनाहि त्यास सहन होत नसते. आपणास अमुक अमुक विषय अगदीं कळत

नाहीं व यास्तव त्यावर मत देण्यास आपण सर्वथा अयोग्य, अशी मनाची पक्की खात्री फारच थोड्या सुज्ञ लोकांची झाली असते. बाकी कोणास कोणत्याहि विषयाविषयीं पुसा; बहुतकरून उत्तर नाहीं असें व्हावयाचेंच नाहीं. ज्या त्यास बहुधा असें वाटत असतें कीं मला जितकें ज्ञान आहे त्यापेक्षां अधिक दुसऱ्यास काय असावयाचें आहे? व माझीं जीं मतें आहेत त्यांत चुकीचा संभव असेल तरी कसा? तर असा मूर्खपणाचा दुरभिमान बहुतेक लोकांच्या मनास जडला असल्यामुळें हव्या त्या गोष्टीवर हवें तसें मत झोकून न देणारे फार थोडे. फार तर काय, पण जो विषय त्यांस अगोदर असलाच तर फारच थोडा अवगत असण्याचा संभव, त्यावरहि बरें-वाईट म्हणण्यास मागें पुढें बिलकुल न पहाणारे शेंकडों गृहस्थ सांपडतात. बेकननें कोठेंसें एक मोठें मार्मिक वचन लिहिलें आहे कीं, असे कित्येकजण आढळतात कीं ज्यांस आपणास माहीत काय नाहीं तेंच माहीत नसतें! असो; तर ग्रंथांवर टीका करण्यास निघालेले गृहस्थ अशा प्रतीचे कामाचे नाहींत. आपण ज्याचे गुणदोष लोकांस दाखविणार तो ग्रंथ खरोखर आपणांस पुरतेपणीं समजला आहे असा निश्चय झाल्यावरच टीका करणारानें त्या कामास हात घालावा. नाहीं तर तो अर्धामुर्धा समजून तितक्यावरूनच जर गुणदोषविवेचनास आरंभ केला तर तें त्या कर्त्याच्या उपहासास मात्र कारण होईल; व लोकांत सत्याचा प्रसार होणें एकीकडेच राहून मूर्खपणाचीं मतें मात्र चोहोंकडे माजतील.

दुसरा गुण सत्यप्रीति. हाहि गुण वरच्यासारखाच टीकाकर्त्याच्या अंगीं अवश्य असला पाहिजे. याची योग्यता तर वरच्याहूनहि अधिक आहे; पण त्याच मानानें तो जगांत फारच विरळा आढळतो. दुसऱ्याच्या ग्रंथावर जी टीका करावयाची ती केवळ सत्यास अनु-

सरूनच करावयाची, व ती करण्यांत सत्याचा उदय व असत्याचा ऱ्हास करणें एवढाच काय तो हेतु, हा प्रकार फारच थोडा सांपडेल. एरवीं टीका करणारांचे सामान्यतः उद्देश पाहिले तर द्वेषबुद्धीनें, मत्सरानें किंवा उगीच गमतीखातर दुसऱ्याची निंदा करावी, त्याची फजिती उडवावी, त्याची कीर्ति दूषित करावी, इतकाच असतो. किंवा इतकेंहि नसलें तरी निदान आपलें नांव लोकांपुढें यावें, आपली विद्वत्ता प्रदर्शित व्हावी, इतका तरी असतो. आतां हें खरें कीं, वरील दुष्ट मनोवृत्तींच्या प्रेरणेनेंच कोणी एखाद्या ग्रंथावर चर्चा केली असूनहि जर तींत असत्याचा लेशहि नसला, तर ती केवळ दोषास पात्र होत नाहीं; तरी वरील वृत्तींचें अवलंबन सर्वथा अश्लाघ्यच होय. सुविचाराचे योगानें ज्यांचें मन थोर झालें असतें ते त्यांस आपल्या निर्मळ अंतःकरणांत कधीं थारा देत नसतात. असो; तर जो कोणी एखाद्या ग्रंथकाराचे गुणदोष जगास प्रगट करण्याकरितां हातीं लेखणी धरील त्यानें अगोदर सत्यास स्मरावें आणि त्यास धरूनच मी सगळा मजकूर लिहीन असा अगोदर निश्चय करावा. असें करणें केवळ परमार्थ बुद्धीस्तवच त्यास योग्य आहे असें नव्हे तर त्यानें निवळ स्वार्थ पाहिला तरी सुद्धां वरीलच मार्ग श्रेयस्कर होय हें त्याच्या लक्षांत येईल; कारण जरी त्यानें आपल्या विद्वत्तेच्या व कीर्तीच्या भरावर चढून जाऊन खोटींच मतें लोकांच्या मनांत भरवून देऊन त्यांस कांहीं वेळ फसविलें व त्याबद्दल तात्कालिक कृतार्थता मानली, तरी कधीं ना कधीं तरी त्याची लबाडी बाहेर पडेलच पडेल हें त्यानें खूप समजून ठेवावें. याविषयीं ह्यूम, जॉन्सन, मेकॉले हीं सर्व प्रसिद्ध उदाहरणें आहेत. पहिल्यानें आपल्या इंग्लंडचे इतिहासांत पुष्कळ खोटा मजकूर लिहिला असल्या-

---

१ अस्तुत्य, निंद्य.

मुळें त्याची पत आतां बहुतेक अगदीं बुडाल्यासारखीच आहे; व दुसरे दोघेहि आपल्या हेकटपणाच्या लहरींत अनेक प्रसंगीं पुष्कळच भरकटले असल्यामुळें त्यांचीं मतें ग्रहण करणें तीं लोक फार जपून करतात! असो. तर सत्यरूप दैवत असें कडक व जाज्वल्य आहे. त्याच्या क्षोभापुढें मोठमोठ्या प्रचंड ग्रंथकारांचाहि चुराडा होऊन जातो! मग छोटेखानी लुटपुट्या ग्रंथकारांचा खुर्दा तर कोणीकडच्या कोणीकडे उधळून जात असेल कोण जाणे! असो; याप्रमाणें वर जी सत्यानुसरणाविषयीं आम्हीं सूचना केली ती केवळ स्वार्थ-दृष्टयाहि यथार्थ होय. ग्रंथांविषयीं जो यथार्थ विवरण करील, म्हणजे गुण असतील तेवढे गुण व दोष असतील तेवढे दोष जो यथास्थित दाखवून देईल, त्याचीच टीका चिरकाल जगास मान्य होऊन राहील.

तिसरा गुण शांतस्वभाव. हाहि टीका करणारांच्या अंगीं अवश्य पाहिजे असून वरच्यासारखाच क्वचित् आढळतो. याचें कारण वरील कलमांतच आलें आहे. तें अर्थातच हें कीं, टीकाकर्त्यांची प्रवृत्ति मुळींच वर सांगितलेल्या द्वेषमत्सरादिकांनींच प्रायः होत असल्यामुळें वरील गुणास जागाच राहात नाहीं. क्रोधास वश होऊन जेथें चित्ताचा क्षोभ झाला तेथें शांतता कशी रहावी? असो; पण या क्षोभाचाहि उद्गार बाहेर पडण्यास मनास कांहींशी तरी शांति असावी लागते. ती मुळींच नसून चित्तास अतिशय क्षोभच जर केवळ झाला असला, तर मनाचे व्यापारहि नीट चालण्यास कठीण पडेल. म्हणजे जसा मनुष्य अतिशयच रागावला असला तर त्याचा कंठ दाटून येऊन शब्दहि पुरता तोंडावाटे निघेनासा होतो, त्याचप्रमाणें मनुष्य रागानें अगदीं देहभान विसरून गेला म्हणजे त्याची बुद्धीहि गोंधळून जाते. काय बोलायाचें किंवा लिहायाचें तें त्यास एरवीं जेवढें सुचेल

तेवढेंहि त्या हातघाईच्या वेळीं न सुचून तो अगदीं बेफाम होऊन जातो, व वेड्यासारखें भलभलतेंच बरळूं सुद्धां लागतो— असें कीं तोच मनुष्य पुढें कांहीं दिवसांनीं आपला वेडेपणा पाहून विस्मय पावेल. असो; तर मनाच्या शांततेची इतकी आवश्यकता आहे, कीं रागाचें बोलणें किंवा लिहिणें संगतवार होण्यास सुद्धां तीवांचून चालत नाहीं. मग हजारों वाचकांस मान्य होईशी ग्रंथरचना करायाची असल्यास तर तिचें अगत्य केवढें आहे हें काय सांगावें ! कां कीं, ग्रंथ रचायचा म्हणजे सगळा विषय अगोदर साद्यंत मनांत आणून त्याची यथास्थित मांडणी करावयाची असते; व वाक्यरचना वगैरे जितकी उत्कृष्ट होईल तितकी साधावी लागते. तेव्हां हें सर्व क्षोभ पावलेल्या मनुष्यापेक्षां शांत, स्थिर मनाच्या मनुष्यास जास्त साधेल हें उघड आहे. हें एक झालें. दुसरें असें कीं, एखाद्या ग्रंथावर वगैरे जो अभिप्राय देणें तो शांत, गंभीर व सभ्य अशा रीतीनें दिला असतां त्याचें कांहीं निराळेंच वजन पडतें, आणि त्यानें जें काम होतें तें रागाच्या सपाट्यांत उगीच पुष्कळ गोंगाट केला, वेड्यावांकड्या शिव्या हांसडल्या, अशानें अगदींच होत नाहीं. या दुसऱ्या प्रकारानें टीका करणारावरून मात्र लोकांचें मन उडतें, व त्याचा हलकटपणा व पोरकटपणा जगांत प्रगट होतो. शिवाय वरील शिव्यांनीं त्याच्या पक्षास बळकटी यायची ती तर एकीकडे राहून त्याची दुर्बलता मात्र लोकांस भासूं लागते. कारण लोक पक्कें समजतात कीं, ज्या अर्थीं यानें शिव्यांचा एवढा भडिमार केला आहे त्या अर्थीं याजपाशीं प्रमाणें तितपतच असतील. खेरीज ग्रंथकाराच्या थोरपणाला म्हटलें म्हणजे शिमग्याचा झगडा जागविणें हें अगदींच अप्रशस्त. रस्त्यांतील भांडणारांत तोंडाच्या जोरावर जसा कज्जाचा निकाल होतो, म्हणजे जो मोठ्यानें ओरडत असेल त्याचाच

पक्ष खरा असें भोंवतालच्या तमासगिरांस वाटतें, तसा प्रकार ग्रंथांत करूं पहाणें यासारखें निंद्य व हास्यास्पद कांहीं नाहीं. असें जो करतो त्यास आपला बोज कळत नाहीं हें एक दिसतें, आणि शिवाय हातीं घेतलेलें टीका करण्याचें कामहि त्यास बिलकुल कळत नाहीं हें दुसरें स्पष्ट होतें. कारण ज्याजवळ सबळ प्रमाणें आहेत तो शब्दपांडित्याचा किंवा शिव्यांचा भडिमार करण्याच्या भरीस कधीं पडणार नाहीं. जीं ठोक प्रमाणें त्यास माहीत असतील तीं दाखवून तो खुशाल बिनधोक बसेल. आपल्या प्रतिपक्ष्यांच्या शिव्यांचीहि तो काडीइतकीहि पर्वा करणार नाहीं, कारण त्यांचा पोकळपणा त्यास धडधडीत दिसून येईल; व जे सुज्ञ आहेत ते यानें कधीं फसले जाणार नाहींत हेंहि तो पक्कें समजेल. असो, तर याप्रमाणें मनाची शांतता ही टीकाकर्त्यास अत्यंत आवश्यक असून तिच्या योगानें त्याच्या लेखास कांहीं विलक्षण थोरवी व भव्यपणा हीं येतात, कीं ज्याप्रमाणें दोहों पक्षांच्या वकीलांच्या कोट्या व एकतर्फी उत्तरें प्रत्युत्तरें सगळीं ऐकून घेतल्यावर न्यायाधीश आपल्या उंच आसनावरून निःपक्षपातपणाचा चोख निवाडा अगदीं स्वस्थ अंतःकरणानें बोलून जातो त्याचप्रमाणें. सारांश, टीकाकर्त्याचा अभिप्राय वकीलाप्रमाणें एकतर्फी कधीं नसावा, तर न्यायाधीशाच्या निर्णयाप्रमाणें केवळ सत्याच्या तर्फेचाच असावा.

चवथा गुण सहृदयता. सहृदयता म्हणजे ज्यावर टीका करावयाची त्यांत हृदयाचा पूर्ण अभिनिवेश[१] होण्याची योग्यता. ही योग्यता अर्थातच सर्व मनुष्यांच्या ठायीं असत नाहीं. अथवा असली तरी सारख्या प्रमाणानें असत नाहीं. जगांत जें एवढें मतवैचित्र्य दृष्टीस

१ तादात्म्य, समरसता.

पडतें त्यास कारण वरील होय. प्रत्येक मनुष्याची जन्मसिद्ध प्रकृतीच निराळी पडल्यामुळें व पुढें ज्या ज्या अवस्था त्यास प्राप्त होतात त्याहि सर्वांच्या सारख्या नसल्यामुळें, मनुष्यांमनुष्यांमध्यें रुचिभिन्नत्व उत्पन्न होणें हें साहजिकच आहे. पण त्यांतूनहि कित्येक मनुष्यांच्या ठायीं वरील सहृदयता गुण इतरांच्याहून जास्त आढळतो. म्हणजे दुसऱ्याच्या मनोवृत्तीशीं आपली मनोवृत्ति मिळविणें हें त्यांस सहज करतां येतें. हा गुण असणें हें मनाच्या किंवा हृदयाच्या विशालत्वाचें चिन्ह होय, आणि त्याचा अभाव हा अर्थातच त्याच्या उलट गुणाचें म्हणजे वरील दोहोंच्या संकुचितत्वाचें दर्शक होय. तर जो एखाद्या ग्रंथावर टीका करण्याचें मनांत आणील त्यानें अगोदर आपल्याशीं हें पहावें कीं, याशीं सहृदयत्व पावण्याची माझी योग्यता आहे, कीं नाहीं; नाहीं तर काय प्रकार होईल तो उघडच आहे. समजा कीं, जयदेवाच्या 'गीतगोविंद' काव्यावर किंवा मराठीशाहींत रामजोशासारखे सुरस लावण्या करणारे जे कित्येक कवि झाले त्यांच्या कवनांवर टीका करण्यास शुकाचार्यासारख्या परमहंसांनीं[1] हातांत लेखणी घेतली, किंवा वृद्धत्वानें अगर सृष्टीच्या चुकीनें मदनव्यापारशून्य असणाऱ्या मनुष्यानें तें काम पत्करलें, तर टीका किती उत्तम तऱ्हेची होईल याचें अनुमान सहज करतां येईल! तसेंच धर्मप्रतिपादक किंवा वेदान्तविषयक ग्रंथावर एखाद्या रंगेल विनोदी मनुष्यानें जर टीका करण्यास आरंभिलें, तर तें त्यास किती साधेल! बिशप बटलर नांवाच्या एका धर्माध्यक्षानें इंग्रजी भाषेंत एक मोठा विख्यात ग्रंथ वरील विषयावर रचलेला आहे. त्याविषयीं कित्येकांनीं असें मत प्रदर्शित केलें आहे कीं, तो ग्रंथ पाहिल्याबरोबर आमचें डोकें दुखूं लागे. याप्रमाणेंच मिलसाहेबांचें

---

१ श्रेष्ठ पदवीला पोंचलेला योगी.

शेक्स्पियरविषयीं मत, आमच्या कालिदासाविषयीं मत, जॉनसनचें कित्येक इंग्रजी कवींविषयीं व इतिहासाविषयीं; मेकॉलेचें हिंदूंच्या विद्यादिकांविषयीं; या सर्वांची योग्यता किती धरावयाची हें आमच्या वाचकांस तेव्हांच कळेल. एलिझाबेथ राणीचे खजीनदार लॉर्ड बर्ले म्हणून कोणी होते त्यांस स्पेन्सरच्या सर्व प्रसिद्ध काव्यांबद्दल राणीनें त्यास कांहीं इनाम करून दिलें या गोष्टीचें मोठें आश्चर्य वाटलें; त्या प्रसंगीं त्यांचा असा उद्गार निघाला, 'अहो, हें काय वेड आहे, नुसतें एक यःकश्चित् गाणें केल्याबद्दल एवढें इनाम!' दुसऱ्या एका प्रसंगीं असें झालें कीं, कोणा काव्याची कोणीं फार फार प्रशंसा केली असतां एका तत्त्वज्ञाचा उद्गार निघाला, 'अंः यांत काय आहे? या काव्याच्या योगानें बाजारांत दाणे स्वस्त झाले कीं काय हें मला सांगा!' असो; तर याप्रमाणें ज्यांत आपणाला गम्य[1] नाहीं त्यांत वेडेपणानें शिरलें म्हणजे अशीं विचित्र मतें उत्पन्न होतात. यास्तव एखाद्या ग्रंथावर लेखणी उचलण्यापूर्वी टीकाकारानें याचा अगोदर नीट सुमार पहावा कीं, मी हें काम हातीं घेणार खरें, पण याशीं सहृदयता पावण्याची माझी योग्यता आहे काय? नसली तर आंधळ्यानें तसबिरीची परीक्षा करूं गेल्यासारखें त्याचें मत वेडगळ ठरेल. या ठिकाणीं कोणास असा भ्रम उत्पन्न होईल कीं, मनुष्याची विद्वत्ता मोठी असल्यावर त्यास हवें त्यावर मत देण्यास काय हरकत आहे? पण या भ्रमाचें वरील जॉनसन्, मिल्ल वगैरेंच्या उदाहरणांवरूनच पूर्ण निरसन होतें; आणि त्याविषयीं अधिक उपपादन केलेलें पहाणें असल्यास, प्रस्तुत मालेचा तिसरा व चवथा अंक पहावा. असो; तर एकंदरींत या सहृदयता गुणाची नुसत्या विद्वत्तेहून फारच

१ ज्यांत गति होत नाहीं, जें आपणांस समजत नाहीं.

अधिक योग्यता आहे व म्हणूनच एखाद्या ग्रंथावरील अभिप्राय जरी मोठी विद्वत्ता खर्चून लिहिला असला, तरी वरील गुणाच्या अभावीं वरील मत केवळ कवडीचा माल होय.

विष्णुशास्त्री चिपळूणकर
( निबंधमाला )

**प्रश्न व सूचना**

( १ ) विद्वत्ता व सहृदयता यांतील भेद उदाहरणें देऊन स्पष्ट करा.

( २ ) "सत्यरूप दैवत असें कडक व जाज्वल्य आहे." या व यापुढील दोन तीन वाक्यें वाचून जो आनंद होतो तो कां होतो याचें विवेचन करा.

( ३ ) विष्णुशास्त्री बहुश्रुत होते हें या उताऱ्यावरून सप्रमाण दाखवा.

( ४ ) कृतार्थ, व्यर्थ, परमार्थ या शब्दांचे विग्रह करून अर्थ सांगा.

( ५ ) टीकाकाराचे अंगीं आवश्यक म्हणून सांगितलेल्या गुणांपैकीं स्वतः विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचे अंगीं कोणते गुण होते हें 'लोकहितवादी'वरील त्यांचा निबंध वाचून ठरविण्याचा जिज्ञासूंनीं प्रयत्न करावा.

# स्त्रीपुरुषांना एकच शिक्षण द्यावें, व तेंही एकत्र द्यावें

[ गोपाळ गणेश आगरकर यांचे काळीं स्त्रियांना दुय्यम शिक्षण द्यावें किंवा नाहीं हा वादाचा प्रश्न होता. तो प्रश्न आतां सुटल्यासारखा आहे; म्हणजे स्त्रियांना दुय्यम शिक्षण थोडेंबहुत दिलेंच पाहिजे असें आतां निश्चित ठरलें **आहे.** पण हें शिक्षण किती द्यावें, कोणत्या प्रकारचें द्यावें, तसेंच स्त्रियांना व पुरुषांना एकच व एकत्र शिक्षण द्यावें किंवा काय हे अजूनहि वादाचे प्रश्न राहिले आहेत. पैकीं शेवटच्या दोन प्रश्नांसंबंधीं आगरकरांचें मत काय होतें हें सध्यांहि माहीत असणें जरूर आहे व तें खालील उताऱ्यावरून दिसून येण्यासारखें आहे. ]

स्त्रियांस शिक्षण देण्याचा विचार निघाल्यापासून प्रत्येक देशांत



गो. ग. आगरकर

त्यांस कोणत्या प्रकारचें शिक्षण द्यावें याबद्दल चर्चा सुरू झाली आहे. लिहिणें, वाचणें, व हिशेब करणें या तीन गोष्टी साऱ्या मुलांप्रमाणें साऱ्या मुलींस शिकविण्यास कांहीं हरकत नाहीं असें सामान्य मत आहे; पण येथून पुढें मतभेदास आरंभ होतो व वरिष्ठ शिक्षणाच्या संबंधानें त्याचा कळस होतो. प्राथमिक शिक्षण आटपलें म्हणजे मुलींना घरीं ठेवून घेऊन प्रपंचव्यवस्था शिकवावी असें कित्येकांचें मत आहे. तसें नच करावयाचें असेल आणि त्यांना शाळेंत पाठवाव्या असा आग्रहच असेल तर निदान ज्या शाळेंत शिवणकाम, गायन, पाकसिद्धि, गृहव्यवस्था, रेशमाचीं, लोकरीचीं किंवा अशाच प्रकारच्या

कसल्या तरी धाग्याचीं वस्त्रें विणण्याचें काम; वेत, गवत वगैरे तंत्वात्मक द्रव्यांनीं होणारीं—करंड्या वगैरे नक्षीचीं व साधीं कामें; लहान मुलांचें संगोपन व रोगचिकित्सा; स्त्रियांचे रोग व त्यांवर औषधोपचार इत्यादि विषय ज्या शाळांत शिकवितात अशांतच त्यांस पाठवाव्या. भूगोल. इतिहास, गणित, पदार्थविज्ञान, ज्योतिष वगैरे मेंदूचा खराबा करणारे विषय त्यांच्यापुढें कधींही आणूं नयेत. त्यांत त्याचा व जगाचा मुळींच फायदा नाहीं. कोणतेंही शिक्षण देतांना ज्याला तें द्यावयाचें त्याच्या मानसिक व शारीरिक शक्ति जात्या कशा आहेत याचा विचार केला पाहिजे. इतकेंच नाहीं तर त्या व्यक्तीस आपलें आयुष्य कोणत्या स्थितींत घालवावें लागणार याचाही विचार केला पाहिजे. पुरुषांच्या विचारशक्तीपेक्षां स्त्रियांची विचारशक्ति स्वाभाविकपणें कमकुवत आहे, व मुलें होण्याचें आणि त्यांना वाढविण्याचें काम विधात्यानें त्यांच्याकडे ठेविलें असल्यामुळें त्यांना पुरुषांशीं स्पर्धा करूं न देतां, त्यांच्या नैसर्गिक क्षीण बुद्धिमत्तेस व त्यांच्या वाट्यास आलेल्या स्वाभाविक कामास योग्य असेंच शिक्षण दिलें पाहिजे. ज्याला जें करतां येणार आहे तेंच त्याला करूं देण्यांत कोणत्याही प्रकारचा अन्याय नाहीं, इतकेंच नाहीं, तर उलट त्याचें हित आहे. बायकांनीं विद्या शिकून बाहेरचीं कामें करावीं, आणि पुरुषांनीं अक्षरशून्य राहून घरचीं कामें करावीं, असा व्युत्क्रम[1] करण्यांत दोघांचेंही नुकसान आहे. पुरुषांच्या सदृढ हातांनीं व पायांनीं बाहेरचे धक्के बुक्के खावे; उन्हाचा, थंडीचा, व वाऱ्याचा त्रास सोसावा. तात्पर्य, बायकांच्या, मुलांच्या व आपल्या चरितार्थाकरितां लागतील तितके मानसिक व शारीरिक कष्ट करून द्रव्य संपादावें हें

---

१ उलटा प्रकार.

जसें त्यांना उचित आहे, त्याप्रमाणेंच कोमलांगी स्त्रियांनीं सुखकर गृहछायेंत राहून पुरुषांनीं कमावून आणिलेल्या जिनसाची व्यवस्था लावावी; थकल्याभागलेल्या पतीस सुग्रास करून घालून त्याचें पादसंवाहन[1] करावें; मुलाबाळांची खस्त खाऊन त्यांस चांगल्या रीतीनें वाढवावें, आणि प्राणप्रियाच्या इच्छेनुरूप अष्ट, दश, किंवा द्वादशपुत्रा सौभाग्यवती म्हणवून घेण्यास एका पायावर उभें असावें यांतच स्त्रियांचें खरें हित व सुख आहे; म्हणजे सध्यां जी रूढ राहाटी आहे तीच उत्तम आहे; तींत फेरफार करणें इष्ट नाहीं, असें पुष्कळांचें मंत आहे. या मतास अनेक डॉक्टर लोकांची संमति पडली असल्यामुळें कित्येकांच्या समजुतीनें त्यास वेदवाक्याची प्रमाणता प्राप्त झाली आहे.

परंतु असला आग्रह काय कामाचा? असल्या एकदेशीयें[2] तत्त्वज्ञानास कोण विचारतो? पाहिजे त्या पुरुषानें पाहिजे ती विद्या संपादावी या मतास तरी साऱ्यांची अनुकूलता कोठें आहे? जी आहे ती तरी त्यास एकाएकीं थोडीच प्राप्त झाली आहे? स्त्रियांना प्राथमिक शिक्षण देण्यास हरकत नाहीं, येवढा रुकार पुरुषांकडून मिळण्यास काय थोडें रण करावें लागलें! सत्ता वापरण्याची अक्कल अंगीं असो वा नसो, ज्यांस ती प्राप्त झाली आहे त्यांस ती सोडूं नये असें वाटतें. अनेक कारणांमुळें स्त्रियांवर पुरुषांचें वर्चस्व स्थापण्यांत आलें आहे, व त्यांना त्याची गोडी समजून चुकली आहे, तेव्हां तें त्यांस आपल्या हातून जाऊं नये असें वाटणें हें अगदीं स्वाभाविक आहे. स्त्रियांच्या संबंधानें पुरुषांस पॅट्रीशिअन्स[3] आणि पुरुषाच्या

---

१ पाय चेपणें. २ एकांगी. ३ रोममधील उच्च वर्गातील लोक.

संबंधानें स्त्रियांस प्लिबिअन्स म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. पण ज्याप्रमाणें जुन्या रोमन लोकांतील हा विलक्षण स्वामिसेवक संबंध हळुहळू लयास गेला, त्याप्रमाणें स्त्रीपुरुषांतील सेव्यसेवक संबंध कालांतरानें नाहींसा होणार आहे. सध्यां पुरुष जीं कामें करतात तीं रोमन पॅट्रीशिअन्स म्हणजे उच्च कुळांतील लोक करीत असत; व सध्यां बायकांस जीं कामें करावीं लागतात तीं प्लिबिअन्स म्हणजे तेथला दास वर्ग करीत असे. रोमन लोकांची प्राथमिक स्थिति सुटत जाऊन ते जसजसे उन्नतावस्थेप्रत जाऊं लागले तसतसा हा स्वामि-सेवक संबंध कमी होत जाऊन अखेरीस बुद्धीनें, अनुभवानें, कर्तब-गारीनें श्रेष्ठ ठरेल त्यांस संस्थानांतील अधिकार त्यांच्या योग्यतेप्रमाणें मिळूं लागले, आणि प्लिबिअन्स व पॅट्रीशिअन्स हा भेद शेवटीं नाहींसा झाला! होतां होतां स्त्रीपुरुषांसही ज्याच्या त्याच्या किंवा जिच्या तिच्या योग्यतेप्रमाणें अधिकार प्राप्त होऊं लागतील. पुरुषांच्या मेंदूपेक्षां स्त्रियांचा मेंदू सरासरीनें कमी वजनाचा आहे, आणि स्त्रीपुरुषांमधील कामाची वाटणी त्यांच्या मेंदूंच्या वजनावर अवलंबून असावी हें योग्य आहे असें जरी मानलें तरी साऱ्या पुरुषांचे हे मेंदू साऱ्या स्त्रियांच्या मेंदूपेक्षां अधिक जड आहेत, असें प्रतिपादण्याचें धाडस अत्यंत अधिकारलोलुप पुरुषास देखील करतां येणार नाहीं. अनेक स्त्रियांचे मेंदू अनेक पुरुषांच्या मेंदूहून जड भरतील यांत संशय नाहीं. तेव्हां मेंदूच्या मुद्द्यावरच स्त्रियांनीं अमुक कामें करावीं आणि पुरुषांनीं अमुक कामें करावीं असा निर्बंध करणें शुद्ध अन्याय व क्रूरपणा आहे. ज्याला जें काम साधेल त्यानें तें करावें अशी प्रत्येकास मोक-ळीक देण्यांत तें करणाराचा अथवा करणारणीचा आणि जगाचा

१ रोममधील खालच्या वर्गांतील लोक ( Plebeians )

फायदा आहे. सध्यां पुष्कळ स्त्रियांच्या बुद्धिमत्तेची विनाकारण नासाडी होत आहे. ज्या कामास जे पुरुष बुद्धिसामर्थ्यानें योग्य नाहींत त्यांच्याकडून तीं कामें होत असल्यामुळें व स्त्रियांस तीं करण्यास परवानगी नसल्यामुळें एकंदरींत तीं कामें व्हावीं तशीं होत नाहींत, व तसें न झाल्यामुळें मनुष्यजातीच्या सुखास चट्टा बसत आहे. हरएक शास्त्रांत, कलेंत व धंद्यांत स्त्रीपुरुषांची चढाओढ लागून ज्याच्या त्याच्या व जिच्या तिच्या योग्यतेनुरूप व्यवस्था लागली पाहिजे. शास्त्राभ्यास किंवा कलाभ्यास करण्यास स्त्रिया असमर्थ असतील तर तशा ठरतील; पण अनुभवानें तसें ठरेपर्यंत त्यांना कोणत्याही प्रकारचा प्रतिबंध करणें हा शुद्ध सुलतानी दांडगेपणा होय. अमेरिकेंत मुलांप्रमाणें मुलींस वरिष्ठ शिक्षण देण्याचा उपक्रम केल्यापासून जे परिणाम घडून आले आहेत त्यांचें अवलोकन केलें असतां असें दिसून येईल कीं, जीं शास्त्रें व ज्या कला केवळ पुरुषांसच सुसाध्य आहेत असें आपणास वाटत होतें, तीं शास्त्रें व त्या कला स्त्रियांसही तितक्याच सुसाध्य आहेत, व शास्त्रकलांच्या अभ्यासामुळें स्त्रियांचें नैसर्गिक चारुत्व कमी होऊन अपत्यसंगोपनाचें काम त्यांच्यानें बरोबर वठेनासें होईल अशी जी आपणांस भीति होती ती केवळ निराधार होती—या दोन गोष्टी उत्तम रीतीनें सिद्ध झाल्या आहेत. अमुक कामें स्त्रियांनीं करावीं आणि अमुक पुरुषांनीं करावीं, असा आपल्या बुद्धींत सध्यां जो आग्रह उत्पन्न होतो त्याचें खरें कारण कामाची वाटणी करण्याचें काम आमच्या हातीं आहे हें होय. ती बायकांच्या हातीं असती तर त्यांनीही अशीच एकदेशीय वाटणी करून आपणांकडे उच्च कामें आणि आम्हांस हलकीं कामें ठेविलीं असतीं! कोणत्याही विद्वान् व विचारी स्त्रीचें मत घ्या. ती कधींहि असें म्हण-

णार नाहीं कीं, स्त्रीपुरुषांत चालत आलेला वाद नाहींसा करण्याचा एकच उपाय आहे तो हा कीं, मुलांना व मुलींना हव्या त्या शाळेंत जाऊन हवें तें ज्ञान पाहिजे तितके संपादूं द्यावें. श्रीमंत सयाजीराव महाराजांस हें मत पसंत पडेल किंवा नाहीं याची आम्हांस बरीच शंका आहे. तथापि त्यांच्या कमिटीनें पुढें आणलेल्या प्रश्नास जें उत्तर देणें आम्हांस बरोबर वाटलें तें आम्हीं दिलें आहे. गायकवाडांच्या विद्याखात्याला रुचावें म्हणून तें दिलेलें नाहीं, तर आमच्या वाचकांच्या वाचण्यांत तें येऊन त्याविषयीं त्यांनीं विचार करावा यासाठीं तें दिलें आहे. असो. आजच्या निबंधाचा उत्तरभाग पुढल्या खेपेवर टाकणें किती अवश्य आहे हें वरील लेखाच्या लांबीवरून उघड होतच आहे, तेव्हां त्याबद्दल जास्त लिहिण्याची गरज नाहीं.

मागल्या अंकांत स्त्रीपुरुषांना एकच शिक्षण देणें कां योग्य आहे हें दाखविलें आहे. आज त्यांना एकाच ठिकाणीं शिकविणें योग्य आहे हें दाखवावयाचें आहे.

गायकवाडी दरबारला व खुद्द महाराजांना हें आमचें मत केवळ हास्यास्पद आहे असें प्रथमदर्शनीं वाटणार आहे. पण श्रीमंत सयाजीरावमहाराजांनीं युरोप खंडांत पुष्कळ दिवस घालविले असल्यामुळें व तेथील अनेक संस्था पाहिल्या असल्यामुळें त्यांना हें मत इतकें विपरीत वाटण्याची गरज नाहीं. युरोपांतील समाजघटना अथवा समाजरहाटी येथील समाजरहाटीहून अगदीं निराळी आहे. आम्ही आपल्या भाषणांत स्त्रियांना अर्धांगी म्हणतों, व धर्म, अर्थ, काम वगैरे गोष्टींत त्यांस सहचारिणीत्व देतों. पण हीं दोन अर्धांगें बहुधा पोकळ धर्माज्ञांपलीकडे कधींही जात नाहींत. बायकांनीं

---

१ या वाक्याचे अर्थाकरितां या उताऱ्यावरील ४ था प्रश्न पहा.

घराबाहेरच्या पंचायतींत पडणें योग्य नाहीं, हें जें विलक्षण मत आम्हां पूर्वेकडील लोकांच्या मनांत हजारों वर्षें खिळून राहिले आहे, त्यामुळें व आणखी कांहीं कारणांमुळें, स्त्रीपुरुषांचा मिश्र समाज आम्हांस अगदीं नापसंत वाटतो. स्त्रीपुरुषांस मोकळेपणीं एकत्र वागूं दिलें असतां समाजावर मोठा दुर्धर प्रसंग गुदरेल असा आमचा पक्का ग्रह होऊन गेला आहे. युरोपांत असा परिणाम घडत नाहीं ही गोष्ट प्रत्यक्ष आमच्यापुढें असून आम्ही इतके घाबरून जातों हें तरी एक आमच्या अविचाराचें निदर्शनच आहे. पण त्यांतल्या-त्यांत ध्यानांत ठेवण्यासारखी एक मौज अशी आहे कीं, ज्या युरोप खंडांत कोणताही ठळक सामाजिक समारंभ किंवा विधि स्त्रियांच्या सान्निध्यावांचून होत नाहीं त्या युरोप खंडांतही स्त्रीपुरुषांस एकत्र शिक्षण द्यावें किंवा नाहीं याविषयीं मोठा मतभेद आहे. घोड्यांच्या शर्यती, चेंडूफळीचे खेळ, बक्षिसें वाटणें, पाये घालणे, इमारती उघडणें, व्याख्यानें देणें, लग्नसमारंभ, प्रेतसंस्कार, मोठ-मोठ्या मेजवान्या, प्रदर्शनें, नाना प्रकारच्या पाटर्या व नाच—या व अशाच प्रकारच्या अनेक युरोपीय समारंभांस व विधींस स्त्रिया न येतील तर त्या लोकांस हे समारंभ व विधि मुळींच नकोसे वाटतील. युरोपियन समाजास जी एका प्रकारची उल्हास वृत्ति प्राप्त झाली आहे ती त्याच्या मिश्रणामुळें प्राप्त झाली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. मिश्रसमाजाचें नीतिसूत्र ढिलें पडतें असें कित्येकांचें म्हणणें आहे. पण ज्यांना मिश्रसमाजाचा प्रत्यक्ष अनुभव नाहीं त्यांचें हें मत आहे येवढें ध्यानांत ठेविलें पाहिजे. गोषाबाहेर किंवा झनान्याबाहेर नीति असण्याचा संभव नाहीं हें बोलणें जितक्या शहाणपणाचें आहे तितक्याच शहाणपणाचें वरील मत आहे. स्त्रीपुरुषांचें पाऊल वांकडें न पडणें यांत समाजाचें मोठें हित आहे

हें आम्हीं कबूल करतों. पण तें हित साधण्यासाठीं बायकांस मागल्या दारीं कोंडून घालण्याची आवश्यकता आहे किंबहुना तसें केल्यानें नीतीचें रक्षण होणारच आहे असें आमच्यानें म्हणवत नाहीं. जी वस्तु दुष्प्राप्य असते तीविषयीं आपल्या मनांत नसतें महत्त्व उत्पन्न होऊन आपण तिच्या प्राप्तीविषयीं फार उत्सुक होतों. तीच हवी तेव्हां मिळण्यासारखी असेल तर तिची तुम्हांस आठवण देखील होणार नाहीं. एखाद्याला जर असें सांगितलें कीं, तुला महिनाभर अमुक ठिकाणीं जाण्याची मनाई केली आहे, तर त्याला त्या ठिकाणीं वर्षोंगणती जाण्याचें कांहीं एक कारण नसून, या मनाईमुळें आपलें स्वातंत्र्य गेलें व पराकाष्ठेचें नुकसान झालें, असें वाटूं लागणार आहे. निःपक्षपात दृष्टीनें विचार करतां कदाचित् असें कबूल करावें लागेल कीं, ज्या लोकांत स्त्रियांना झनान्यांत, पडद्यांत किंवा कोंडून ठेवण्याची चाल आहे त्यांतच युरोपिअन लोकांपेक्षां कमी नीतिमत्ता असण्याचा संभव आहे. क्षणोक्षणीं, हर प्रसंगीं, सर्वत्र ठिकाणीं स्त्रीपुरुषें एकमेकांस भेटूं लागलीं म्हणजे विषयवासनेचा विचार त्यांच्या मनांत फार क्वचित् येण्याचा संभव आहे. चैत्रमासीं हळदीकुंकवास जाणाऱ्या येणाऱ्या बायका, अक्षतीस किंवा पायघड्यांस निघालेल्या बायका, स्टेशनावर गाड्यांतून जाणाऱ्या बायका किंवा शाळेंत येणाऱ्या मोठ्या मुली यांकडे सभ्य म्हणविणारे लोक वांकड्या नजरेनें व निर्लज्ज लोक बेलाशक टक लावून पहातात याचें कारण येवढेंच आहे कीं, या खंडांतील इतर लोकांप्रमाणें आम्हां हिंदु लोकांस घडोघडीं स्त्रियांचा समागम घडत नाहीं. तसें होईल तर आमच्या असभ्यपणाच्या खोडी जातील इतकेंच नाहीं, तर आमच्या भाषणांत आणि वर्तनांत आतांपेक्षां पुष्कळ सभ्यपणा येईल. अत्यंत सहनशील दहापांच लोकांची गोष्ट

सोडून द्या, शेंकडा नव्वद हिंदूंच्या–निदान महाराष्ट्रीयांच्या सामान्य भाषणांत बरीच अश्लीलता असते असें आम्हांस वाटतें. आमच्या समाजांत स्त्रीपुरुषांच्या गांठी पडूं लागतील तर ही अश्लीलता नाहींशी होईल याविषयीं आम्हांस शंका नाहीं. युरोपांत प्रवास करून आलेल्या अनेक लोकांशीं आम्ही यासंबंधानें बोललों आहों व त्या सर्वांचें असें म्हणणें आहे कीं, येथील अत्युच्च वर्गांतील पुरुषांच्या व इतर वर्गांतील पुरुषांच्या व स्त्रियांच्या बोलण्यांत जो अमर्याद विचकटपणा दिसून येतो, त्याचा एकशतांश विचकटपणाही युरोपांतील कनिष्ठ प्रतीच्या लोकांच्या भाषणांत असत नाहीं. तात्पर्य, मिश्रसमाजपद्धति आम्हांस वाटते त्याप्रमाणें स्त्रीपुरुषांच्या नीतिमत्तेस प्रतिकूल नसतां उलट अनुकूल आहे यांत शंका नाहीं. तथापि मनुष्याच्या शरीराप्रमाणें कांहीं अंशीं त्यांच्या समाजाची स्थिति असते. शरीर वाढींत आहे तोंपर्यंत त्याला कसलेंही वळण लावणें कठीण पडत नाहीं. पण एकदां त्याची वाढ खुंटून त्याच्या अंगीं ताठपणा आला म्हणजे त्याला नवीन वळण लावण्याची आशा खुंटली असें समजावें. समाजाची तशीच गत आहे. मुसलमानांप्रमाणें कित्येक लोकांस स्त्रियांना पुरुष-दर्शन देखील होऊं देण्याची भीति वाटते ! आम्हांस मिश्रसमाजा-पासून घोर परिणाम घडतील अशी भीति आहे. स्त्रीपुरुषांस एकत्र शिक्षण दिलें असतां त्याचा चांगला परिणाम घडेलच अशी युरो-पिअन लोकांची खात्री झालेली नाहीं. अमेरिकन लोकांनाही ही शंका बरींच वर्षे होती, पण अलीकडील प्रत्यक्ष अनुभवावरून तिचा परिहार होत चालला आहे. ज्या खेड्यांत मुलांकरितां व मुलींकरितां दोन स्वतंत्र शाळा घालण्याची सोय नाहीं, त्या खेडयांतील लोक लहान मुलींस व मुलांस एकाच शाळेंत धाडण्याबद्दल युरोपांत व

अमेरिकेंत फारशी हरकत घेत नाहींत; व आमचे लोकही बहुधा तसें करणार नाहींत असें वाटतें. आठदहा वर्षांचीं मुलें एकत्र वागूं देण्यास कोणाच्याही मनांत विशेष शंका येत नाहीं व ती येण्याचें कारणही नाहीं; आणि याच वयाचीं मुलें बहुधा प्राथमिक शाळांत असावयाचीं. पण त्यांतही कित्येक दोष काढतात. त्यांचें म्हणणें असें आहे कीं, ज्या अर्थी स्त्रीपुरुषांचा आयुष्यक्रम अगदीं निराळा आहे, त्या अर्थी त्यांना भिन्न शिक्षण भिन्न स्थळींच पहिल्यापासून दिलें पाहिजे. पण या दुराग्रहाच्या मताला अलीकडे कोणी जुमानीनासें झाल्यामुळें तें मंदगतीनें अस्ताचलास जात आहे ! ही प्राथमिक शिक्षणाची हालहवाल झाली. मध्यम व वरिष्ठ शिक्षण संपादणाऱ्या विद्यार्थिनी व विद्यार्थी एका ठिकाणीं असूंच नयेत हें मत युरोप खंडांतील बहुतेक देशांत व युनायटेड स्टेट्सच्याही कांहीं भागांत कायम आहे. एकंदरीनें विचार करतां या मताची रचना अनुभवावर न करतां तर्कावर लोक करतात असें आम्हांस वाटतें. तरुण स्त्रिया, तरुण पुरुष यांस एका वर्गांत बसवून त्यांना एकाच शिक्षकाकडून व्याख्यानें देवविण्याचा अनुभव प्रथम अमेरिकेनें घेऊन पाहिला, व तो वाटला होता त्याहून अधिक फलप्रद दिसून आला. एकत्र शिक्षणाचे शत्रु बहुधा पुढील तीन मुद्द्यांवर भांडतातः—१ ला—स्त्रीपुरुषांत नैसर्गिक मोठा भेद आहे तेव्हां त्यांस एकत्र शिक्षण दिल्यानें त्या भेदानुरूप त्या शिक्षणांत जो फरक करणें जरूर आहे तो कधींही करतां येणार नाहीं. २ रा—मुलांच्या दांडग्या वर्तनाचा मुलींच्या मर्यादशील वर्तनावर मात्र दुष्परिणाम होतो. मुलींच्या सहवासानें मुलांस कांहीं फायदा होत नाहीं. ३ रा—अल्पवयांत मुलगे व मुली वारंवार एकत्र येऊं

लागतील तर त्यांच्या विषयवासना लौकरच जागृत होऊन त्याचे दु:खकारक परिणाम त्यांच्या वर्तनावर घडूं लागतील. वयांत आलेल्या मुली व मुलगे एकाच वर्गात बसत असून जर त्या वर्गाची व्यवस्था नीट रीतीनें ठेवण्यांत येत नसेल तर कदाचित् वरच्यासारखे परिणाम क्वचित् प्रसंगीं घडून येण्याचा संभव आहे. पण उत्तम व्यवस्था असली कीं, फारच चांगले परिणाम घडून येतात असें विस्तृत अनुभवावरून सिद्ध झालें आहे. जे या पद्धतीचे अनुभवावरून मोठे कट्टे भक्त बनले आहेत ते असें म्हणतात कीं, (१) मुलांस व मुलींस एके ठिकाणीं शिकविल्यानें मुलांना धाक लावणें फार सोपें जातें. मुलांचा हट्टीपणा, उद्धटपणा व दांडगे-पणा हा मुलींच्या सान्निध्यामुळें बराच कमी होतो. (२) मुलगे आणि मुली यांस एके ठिकाणीं पढवावयाचें असलें म्हणजे उभय-तांस समजेल अशा शिक्षणपद्धतीचा अंगिकार करणें अवश्य होऊन खुद्द मुलांकरितां शिक्षणाच्या ज्या विलक्षण पद्धति अस्ति-त्वांत आल्या आहेत त्यांची नि:सत्त्वता आणि एकदेशीयता व्यक्त होते. मुलगे आणि मुली नेहमीं एकत्र वागल्यानें त्यांच्या विषयवासनेवर अपायकारक परिणाम न घडतां उलट त्या शांत व गंभीर होतात, आणि उभयतांच्या मैत्रीचा पाया कोणत्याही बाह्यांगावर न घालतां अंतरंगाची चांगली परीक्षा करून त्यावर तो घालण्याचा त्यांचा कल होतो.

**गो० ग० आगरकर**

(सुधारकांतील निबंध– भाग १ ला.)

### प्रश्न व सूचना

( १ ) आगरकरांच्या भाषाशैलीचे विशेष सांगा. वर्तमानपत्राकरितां म्हणून घाईघाईनें लिहावें लागल्यामुळें त्यांच्या लेखनपद्धतीवर कांहीं परिणाम झाले असल्यास सांगा.

( २ ) स्त्री-पुरुषांना एकत्र शिक्षण दिल्यानें फायदे कोणते होतील? तोटे होण्याची भीति आहे काय? हे तोटे टाळण्यासाठीं कांहीं उपाययोजना सुचवूं शकाल काय?

( ३ ) [ अ ] खालील शब्दांवर व्याकरणदृष्ट्या टीपा द्या:— घडोघडीं, तत्वात्मक, कमकुवत, अक्षरशून्य, अधिकारलोलुप.

[ आ ] खालील शब्दांची व्युत्पत्ति द्या:— कल्होळ, सैल, विपरीत.

[ इ ] या उताऱ्यांतील एकादी सुंदर उपमा शोधून काढा.

( ४ ) पान ५३ वरील "कोणत्याही विद्वान् व विचारी स्त्रीचें मत घ्या... पाहिजे तितकें संपादूं द्यावें." या वाक्यांचा सुसंगत अर्थ लागतो काय? 'ती म्हणणार नाहीं' या वाक्याचे पुढें पूर्णविराम देऊन व पुढील 'कीं' गाळून अर्थ चांगला लागेल काय?

---

## विष्णुशास्त्र्यांच्या पूर्वींचे महाराष्ट्रांतील पुढारी

[ कै० विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या श्राद्धानिमित्त १८ मार्च १९०१ रोजीं पुणें येथें सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यांत भरलेल्या सभेपुढें बाळ गंगाधर टिळक यांनीं जो निबंध वाचला त्यांतून पुढील उतारा घेतला आहे. यांत विष्णुशास्त्र्यांच्या पूर्वींच्या ३० ४० वर्षांतील महाराष्ट्रांतील पुढाऱ्यांची मनोरचना व त्यांची परिस्थिति कशी होती हें टिळकांनीं मोठ्या मार्मिकतेनें दाखविलें आहे. ]

सन १८१८ सालीं इंग्रजांचा अंमल महाराष्ट्रांत बसल्यावर पेशवाईत दक्षिणेकरितां जी रक्कम खर्च होत होती ती तशीच इंग्रज सरकारनें चालू ठेविली. पण पुढें दक्षिणेचे ब्राह्मण कमी कमी होत जाऊन जसजशी दक्षिणा-फंडाची रक्कम शिल्लक पडूं लागली, तसतसा या फंडाचा विनियोग विश्रामबाग-संस्कृत-कॉलेज काढण्या-कडे लवकरच करण्यांत आला. या कॉलेजांत सन १८३७ सालापर्यंत केवळ संस्कृतच शिकवीत असत. पण पुढें त्याच्या अभ्यासक्रमांत इंग्रजीचा समावेश होऊन २० वर्षांनीं म्हणजे १८५७ सालीं त्याचेंच 'डेक्कन कॉलेज' बनलें. युनिव्हर्सिटीचा कायदा सन १८५७ सालीं पास झालेला आहे व त्या कायद्याप्रमाणें डेक्कन कॉलेज हें सन १८६० सालीं नव्या युनिव्हर्सिटींत सामील करण्यांत आलें. सन १८६० पासून १८७४ पर्यंत या कॉलेजांतून बी. ए. किंवा एम्. ए. झालेल्यांची संख्या पन्नास साठांच्या पलीकडे जाईल असें वाटत नाहीं. तथापि, सन १८३६ सालीं सुरू झालेल्या इंग्रजी शिक्षणाचे पंचवीस तीस वर्षांत समाजावर जे परिणाम झाले ते इतके महत्त्वाचे आहेत कीं, त्यांची कल्पना डेक्कन कॉलेजांतील ग्रॅज्युएट्सच्या संख्येनें किंवा एक दोन व्यक्तींच्या चरित्रांवरून नीटपणें लक्षांत येणें अशक्य आहे.



बा. गं. टिळक

हरएक समाजांत समाजाचे आधारस्तंभ म्हणजे त्यांतील विद्वान्, विचारी आणि संभावित गृहस्थ होत. कोणत्याही समाजांत पुढारीपणा प्राप्त होण्यास विद्वत्तेची नेहमींच अपेक्षा असते असें नाहीं. मान-मान्यता, संपत्ति, चांगलें कुलवर्तन आणि साधारण समजूतदारपणा व व्यवहारचातुर्य इतके गुण कोणाच्या अंगीं असले म्हणजे, तो अंगीं हिंमत असल्यास आपापल्या वर्गांत पुढारीपणा घेऊं शकतो. पुणें शहरांत ब्राह्मणी राज्य असल्यामुळें अशा प्रकारचे पुरुष पेशवाई-अखेर प्रायः जुन्या सरदार मंडळींतच दृष्टीस पडत असत व कांहीं वर्षेपर्यंत नव्या सरकारनेंहि त्यांचा तशा प्रकारें बोज ठेविला होता. पण पुढें लवकरच या पुढाऱ्यांचीं नखें व दांत काढून घेतल्यानें 'पिंजऱ्यामध्यें वाघ सांपडे बायकामुलें मारिती खडे' अशी त्यांची स्थिति झाली. नवीन राज्यपद्धतींत या जुन्या सरदारमंडळीस देण्या-सारखें कांहीं काम नव्हतें असें नाहीं पण 'यथा राजा तथा प्रजा' या न्यायानें नवीन तऱ्हेच्या इंग्रजी शिक्षणानें तयार झालेली मंडळीच हातीं धरणें राज्यकर्त्यांस अधिक सोइस्कर वाटून ती तयार करण्याचे कारखाने ऊर्फ शाळा काढण्यास त्यांनीं सुरुवात केली. इंग्रजी राज्या-पासून आम्हांस जे पुष्कळ लाभ झाले आहेत त्यांतच शिक्षणाची गणना प्रमुखत्वानें करण्याचा प्रघात आहे. पण जरा विचार केला असतां आपणांस असें आढळून येईल कीं, हें पाश्चिमात्य शिक्षण अगदीं एक आंगी असून त्या शिक्षणाचा परिणामही तसाच झाला; धर्म व नीति यांच्याबद्दल इंग्रजी धर्तीवर काढलेल्या शाळांतून चकार-शब्दही काढावयाचा नाहीं अशी धर्मौदासीन्याची आमच्या सरकारनें शपथ घेतल्यामुळें पहिल्यापासून रीत पडली होती; यामुळें इंग्रजी शाळांतून पहिल्यापहिल्यानें जी मंडळी बाहेर पडली त्यांच्या मनाची स्थिति एक प्रकारें फारच भयंकर किंवा शोचनीय झालेली होती.

स्वधर्माचें किंवा त्यांतील नीतितत्त्वाचें शिक्षण बिलकुल नाहीं आणि परधर्माचेंही नाहीं, समाजाच्या परंपरागत बंधनांबद्दल आदर असावयाचा तोही नाहींसा झालेला, आणि दोन चार बुकें झाल्याबरोबर बऱ्याच मोठ्या पगाराची जागा त्या वेळीं मिळत असल्यानें अधिकारमदाचाही बराच अंमल यांच्या मनावर बसलेला होता. युरोपांतील किंवा विलायतेंतील शाळांतून अशाच तऱ्हेचें शिक्षण मिळतें; पण स्वदेशप्रीति, स्वधर्मनिष्ठा, समाजाबद्दल आदर व प्रेम, सदाचरणाची गोडी वगैरे चांचल्यदोष घालविणाऱ्या अनेक गुणांच्या साहाय्यानें तें शिक्षण मनुष्यास बेहोष करीत नाहीं. आमच्याकडे या सर्व बंधनांचा अभाव असल्यामुळें त्याच शिक्षणापासून स्वल्प ज्ञानानें संतुष्ट, बेपर्वा, स्वहितापलीकडे लक्ष न देणारे आणि स्वतःसच विद्वान् मानून इतर सर्व प्राचीन मतांचा उपहास करणारे असे नवे म्होरपे या कारखान्यांतून प्रथमतः तयार झाले. परंतु याहीपेक्षां विशेष दुर्दैवाची गोष्ट म्हटली म्हणजे या लोकांचा सरकारांतून त्या वेळीं जो मान होत असे तो होय. राज्यकारभाराच्या नवीन पद्धतीस इंग्रजी जाणणाऱ्या माणसांची त्या वेळीं जरूर होती, यामुळें या अर्ध्याकच्च्या विद्वानास मोठ्या नोकऱ्या मिळून अधिकारामुळें त्यांस समाजांत एक प्रकारचा मोठेपणा प्राप्त झाला. तात्पर्य, अव्वल पेशवाईत कुलशील, पराक्रम, सदाचरण, संपत्ति वगैरे गुणांनीं ज्यांच्या पूर्वजांनीं लोकनायकत्व संपादन केलें होतें त्यांचे वंशज लवकरच भिकेस लागून त्यांचें स्थान समाजाच्या खालच्या वर्गांतील अर्धवट इंग्रजी शिकलेल्या या मंडळीस प्राप्त झालें. राज्यक्रांतीमुळें समाजाच्या पुढाऱ्यांत ही जी क्रांति झाली ती सामाजिक दृष्ट्या फार महत्त्वाची आहे. सन १८३७ पासून सन १८७४ पर्यंत म्हणजे सुमारें ३७ वर्षांत या नवीन पुढाऱ्यांच्या दोन किंवा तीन पिढ्या महाराष्ट्रांत झाल्या असें

दिसून येतें. अगदीं पहिली पिढी म्हणजे कै. गोपाळराव देशमुख यांच्या समकालीन किंवा पूर्वींच्या मंडळीची होय. त्यानंतरची पिढी म्हणजे, कै. कृष्णशास्त्री चिपळूणकर व केरूनाना छत्रे यांच्या वेळच्या मंडळीची; आणि तिसरी पिढी कै. कुंटे व रानडे यांच्या वेळची होय. कुंटे व रानडे या दोघांचाही अभ्यास पुण्यास झाला नव्हता; तथापि, त्यांनीं आपल्या आयुष्याचीं बरींच वर्षें येथें घालविलीं असल्यामुळें तत्कालीन पिढीचा उल्लेख त्यांच्याच नांवानें केला आहे. या तिन्ही पिढ्यांपूर्वीं विश्रामबागपाठशाळेंतील कै. मोरशास्त्री साठे, त्र्यंबकशास्त्री शाळिग्राम वगैरे मंडळीकडे पुण्यांतील समाजाचें कांहीं वर्षें पुढारीपण होतें. पण ही मंडळी इंग्रजी शिकली नसल्यामुळें त्यांच्या कालाचा सध्यां विचार करण्याची जरूरी नाहीं. वर ज्या तीन पिढ्या सांगितल्या आहेत त्यांच्याच संबंधींचा विचार कर्तव्य आहे. पण तत्पूर्वीं एवढें सांगितलें पाहिजे कीं त्यासंबंधानें मी जें कांहीं सांगणार आहें तें कोणाही विशेष व्यक्तीसंबंधानें नसून त्या त्या पिढीचें वर्णन आहे.

वर सांगितलेल्या तीन पिढ्यांपैकीं पहिल्या पिढींतील लोकांस शाळेमध्यें जीं दहा पांच इंग्रजी पुस्तकें शिकवीत असत त्यांपलीकडे विद्येचा विशेषसा संस्कार झालेला आढळून येत नाहीं. त्यांच्यापैकीं कै. गोपाळराव हरि यांनींच काय तो थोडाबहुत विद्याव्यासंग शेवटपर्यंत कायम ठेविला होता. पण बाकी बहुतेक चुटपुटत्या ज्ञानाचेच अधिकारी होते. इंग्रजी राज्यांत या मंडळीस नवीन मिळालेल्या अधिकारानें हे बेपर्वा झालेले होते हें वर सांगितलेंच आहे. पण याखेरीज यांच्या अद्वातद्वा विचार-आचाराचा समाजावर व विशेषें-करून पुढारी कुटुंबांच्या गृहस्थितीवर फारच वाईट परिणाम झालेला होता. सौम्य पण शिस्तवार गृहशिक्षणाचा व गृहस्थितीचा

लहानपणीं मुलांच्या मनावर किती परिणाम होत असतो हें मीं येथें सांगावयास पाहिजे असें नाहीं; किंबहुना ज्या देशांतील पुढारी कुटुंबाची गृहव्यवस्था बिघडलेली असते त्यांत चांगले पुरुष निपजणें कठीण आहे असें म्हटलें तरी चालेल. अशा दृष्टीनें पाहिलें म्हणजे इंग्रजी शिक्षणपद्धतीचा आमच्या समाजावर पहिला वाईट परिणाम म्हटला म्हणजे, त्यामुळें झालेली आमच्या पुढाऱ्यांच्या मनाची अव्यवस्थित वृत्ति, आणि सदर वृत्तीच्या योगें बिघडलेली गृहव्यवस्था हा होय. पहिल्या पिढींतील लोकांस लहानपणीं तरी एक प्रकारचें जुन्या तऱ्हेचें गृहशिक्षण मिळालेलें होतें. पण दुसऱ्या व तिसऱ्या पिढींत त्याचाही लोप झालेला होता. या दुसऱ्या पिढींतील एका गृहस्थाचें व माझें कांहीं वर्षांपूर्वीं भाषण झालें होतें, तेव्हां त्यानें मला असा प्रश्न विचारला होता कीं, का हो, आम्ही आतां स्नानसंध्या करीत नाहीं खरे, पण आमच्या लहानपणीं आम्हांस कांहीं एक प्रकारचा जुना आळा असल्यामुळें, आम्ही त्या वेळीं मेहनत करून आज कांहीं तरी उदयास आलों; पण आमच्या मुलांनीं एव्हांपासून सर्व निर्बंध सोडून दिले, तर त्यांची पुढें काय वाट होणार? हा प्रश्न मोठा मार्मिक होता. परंतु गृहशिक्षणाचें व गृहव्यवस्थेचें नुसतें महत्त्व कळून उपयोग काय? ज्या वेळीं ही गोष्ट त्या गृहस्थास कळली तेव्हां तो बहुतेक उतारवयांत आला होता व पुढें लवकरच त्याचा अंत झाला. कै० कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं मृत्युसमयीं काढलेले उद्गार विष्णुशास्त्री यांच्या चरित्रांत दिलेलेच आहेत. या बृहस्पतितुल्य विद्वानाच्या बुद्धिमत्तेबद्दल कोणाचाही पूज्यभाव असणें स्वाभाविक आहे; पण खाजगी वर्तनाच्या दृष्टीनें पाहतां यांजबद्दल तीच बुद्धि कोणाहि निःपक्षपाती मनुष्याच्या अंतःकरणांत उद्भवेल

असें मला वाटत नाहीं. इतर विद्वानांची स्थिति बहुतेक अशाच प्रकारची होती. मद्यपान, वेश्यागमन, वगैरे दुर्गुण बहुतेक संभावित गणले जात असत व मला तर असें आठवतें आहे कीं, त्या वेळेच्या खाजगी शाळेच्या एका मास्तरास सकाळची शाळा असतां शाळेंतील विद्यार्थी त्याच्या अंगवस्त्राच्या घरांतून कित्येकदां बोलावून आणीत असत! अशा प्रकारच्या बिघडलेल्या वातावरणांत धर्मनिष्ठा, नीतिधैर्य किंवा सदाचरण यांचें बीजारोपण नवीन पिढीच्या मनांत कितपत होणें शक्य आहे याचा विचार करण्याचें काम मी आपणांकडेच सोंपवितों. मुंबईत एका पुढाऱ्याचें व माझें सुमारें वीस वर्षांपूर्वी या विषयावर बोलणें झालें होतें. तेव्हां त्यांनीं जे शब्द उच्चारले त्यांची अद्याप मला आठवण आहे. ते म्हणाले कीं, "They have made vice fashionable in Poona". खरोखरच त्या वेळची पुण्याची स्थिति तशी होती.

विद्या, नीतिमत्ता, धर्मनिष्ठा, व्यवस्थित आचरण आणि गृहस्थिति यांचा एकमेकांशीं जो नित्य संबंध असावा लागतो, व जो असल्याखेरीज राष्ट्रांतील विद्वान् लोक पुढारीपणा घेऊन जोरानें राष्ट्राचा उत्कर्ष करण्यास पात्र होत नाहींत, तो संबंधच इंग्रजी शिक्षणानें पहिल्यानें तोडून टाकला ही मोठ्या दुःखाची गोष्ट होय. नीतिदृष्ट्या याचा काय परिणाम झाला हें वर सांगितलेंच आहे; पण याखेरीज इतर बाबतींतही अशा प्रकारच्या एकपक्षी शिक्षणापासून दुसरे अनेक वाईट परिणाम झाले. पाश्चिमात्य इंग्रजी विद्येनें दिपून जाऊन पहिल्या पिढीचे डोळे फिरले, आणि आपल्या देशांतील सर्व कांहीं गोष्टी त्यांस वाईट दिसूं लागल्या असें म्हणण्याचा परिपाठ आहे. पण यांतील खरें बीज काय हें पाहिलें असतां मीं सांगितलेल्या गोष्टीकडेच वळावें लागेल. आपण अशी कल्पना करूं कीं, कोणत्या

एकाद्या नवीन राष्ट्रांतील लोकांस आमच्या संस्कृतांतील न्याय, गणित, आणि काव्यें एवढ्यांचेंच शिक्षण दिलें व वेदान्त किंवा धर्मशास्त्र वगैरे विषयांवरील ग्रंथ त्यांच्या नजरेसही पडूं दिले नाहींत, तर अशा प्रकारच्या शाळेंत तयार झालेल्या विद्यार्थ्यांच्या मनाची स्थिति काय होईल? इंग्रजी शिक्षणाची गोष्ट अशाच प्रकारची आहे. त्यांतून पेशवाईच्या अखेर आमच्या समाजांत एक प्रकारची शिथिलता येऊन त्याच दुर्गुणांचा बराच प्रसार झालेला होता. ही स्थिति आणि त्यावर दृष्टोत्पत्तीस येणारी नवीन राज्यकर्त्यांची व्यवस्था व टापटीप यांनीं चांगले लोकही दिपावून जाण्याचा संभव होता. मग ज्यांचें शिक्षण वर सांगितलेल्याप्रमाणें अगदीं एक अंगीं होतें, त्यांची गोष्ट तर बोलावयास नकोच. आमच्या समाजांत अमुक उणें आहे, तमुक उणें आहे हेच काय ते रात्रंदिवस त्यांचे विचार चालावयाचे; त्यांतून मिशनरी लोकांनींही हिंदुधर्म व समाजव्यवस्था यांजवर हल्ला करण्यास सुरुवात केलेली होती. पहिल्या पहिल्या कांहीं विद्वानांनीं या मिशनरी लोकांस उत्तरें देण्याचा प्रयत्न केला ही गोष्ट खरी आहे. पण नुसत्या तार्किक वादानें मिशनरी लोकांशीं भांडून आमच्या समाजाचें व्हावें तसें रक्षण होत नाहीं ही गोष्ट त्या वेळच्या पुढाऱ्यांस अगदींच कळली नव्हती असें नाहीं. परंतु त्यांनीं त्यासाठीं जे उपाय योजले ते मात्र उपहासास्पद होते. ख्रिस्ती धर्माचा प्रतिकार करावयाचा असल्यास तो त्याच धर्मांतील बाह्योपांगें घेऊन त्यास एकेश्वरी किंवा प्रार्थनासमाज असें नांव देऊन नवीन पंथ काढल्यानें होईल हीच काय ती त्या वेळच्या पुढाऱ्यांची प्रमुख कल्पना होती; व ही कल्पना तडीस नेण्यास आपण योग्य व लायक आहों असेंही त्यांस वाटत असे; परंतु लौकिक दृष्ट्या आणि तात्त्विक दृष्ट्याही हा समज चुकीचा होता. नवीन धर्मपंथ स्थापणाराच्या अंगीं कोणत्या

प्रकारचे गुण असावे लागतात याची शिकलेल्या पहिल्या दोन पिढीच्या लोकांस बिलकुल कल्पना नव्हती. इंग्रजी दहापांच बुकांचें अध्ययन झालें, मोठी नोकरी मिळाली किंवा अधिकार प्राप्त झाला म्हणजे तो मनुष्य सामाजिक किंवा धार्मिक बाबतींत पुढाकार घेण्यास नेहमींच योग्य असतो असें नाहीं हें तत्त्व आमच्या मंडळीस पहिल्या कित्येक वर्षे बिलकुल समजलें नव्हतें. त्यामुळें असा परिणाम झाला कीं, इंग्रजी शिकलेल्या पहिल्या दोन पिढींतील मंडळी समाजास ज्या दिशेनें ओढण्याचा प्रयत्न करूं लागली त्याच्या उलट समाजाची प्रतिक्रियाच सुरू होऊन दोघांचा बेबनाव सुरू झाला. कोणत्याही समाजाचा ज्यास पुढाकार घ्यावयाचा असेल, त्यानें आपल्या एकनिष्ठपणानें, नीतिमत्तेनें, स्वार्थत्यागानें व समाजाबद्दलच्या खऱ्या कळकळीनें समाजाचा विश्वास पहिल्यानें संपादन केला पाहिजे. पण हे गुण वर सांगितलेल्या इंग्रजी शिकलेल्या नव्या पिढींतील लोकांचे अंगांत दिसून येत नव्हते. त्यांच्यापैकीं कांहीं मंडळी विद्वान् होती खरी, पण समाजाचे पुढारी होण्यास विद्वत्तेपेक्षां सदाचरण, धर्मनिष्ठा आणि स्वार्थत्याग यांची अधिक जरूर लागत असते ही गोष्ट या पिढींतील विद्वान् मंडळी अगदींच विसरली होती असें म्हटलें तरी चालेल. त्यांस असें वाटे कीं, आम्हीं नवीन विद्या संपादन केली, सरकारांत आमचा मान झाला, तरी अद्याप आमचे लोक ऐकत नाहींत हें काय? दुसऱ्या पक्षीं— आणि हा पक्ष अगदींच अडाणी होता असें नाहीं—लोकांस असें वाटे कीं, पाश्चिमात्य शिक्षणाचा थोडाबहुत लाभ झाल्यानें मनुष्य कांहीं सर्वज्ञ होतो असें नाहीं. त्यांतून या नवीन पिढीचे अद्वातद्वा आचारविचार, आहार, मतें वगैरे लोकांच्या नेहमीं नजरेस पडत असल्यामुळें त्यांच्याबद्दल लोकांची चांगली बुद्धि राहिलेली नव्हती. हजारों वर्षें चालत

आलेली समाजव्यवस्था व रचना आपण चुटकीसरशीं उडवून देऊं असें मानणारा किंवा म्हणणारा मनुष्य उपहासास पात्र झाल्यास त्याचा दोष लोकांकडे देणें चुकीचें होय. परंतु पाश्चिमात्य शिक्षणाच्या पहिल्या मदानें धुंद झालेल्या मंडळींच्या नजरेस ही विसंगतता आली नाहीं, व स्वदेशकल्याण करण्याची मोठी हांव धरून कोणी धर्माच्या तर कोणी सामाजिक सुधारणेच्या मागें लागले. हिंदु राष्ट्राचें इंग्रजांच्या अमलापासून हित होत आहे कीं अहित होत आहे, लोकांच्या उपजीविकेचीं साधनें उत्तरोत्तर कमी होत आहेत कीं वाढत आहेत, संघशक्तीनें काम करण्याची संवय त्यांस लागण्याचा कितपत संभव आहे, मनुष्याच्या अंगची बुद्धि, कर्तबगारी किंवा हुषारी दाखविण्यास नवीन राज्यव्यवस्थेंत अवकाश आहे कीं नाहीं इत्यादि ज्या गोष्टींचा सन १८७५ नंतर महाराष्ट्रांत खल होऊं लागला त्याजकडे तत्पूर्वींच्या दोन तीन पिढ्यांनीं फारसें लक्ष दिलेलें दिसत नाहीं. यांचा भर काय तो धार्मिक आणि सामाजिक सुधारणेवर होता. आणि या दोन्ही बाबतींत पुढारीपणा घेण्यास ज्या गुणांची आवश्यकता असते त्यांचा बहुतेकांच्या अंगीं पूर्ण अभाव होता. परंतु ही नवीन शिकलेली मंडळी अधिकारारूढ असल्यामुळें समाजांतील इतर लोकांस यांचे स्वेच्छाचार ऐकून किंवा पाहूनच स्वस्थ बसावें लागे. समाजास यांचे आचार व विचार बिलकुल ग्राह्य नव्हते इतकेंच नव्हे, तर समाजास कोणत्याहि प्रकारचें व्यवस्थित रूप देण्यास जे पुढाऱ्याचे अंगीं गुण पाहिजेत ते यांच्यांत नाहींत अशी समाजाची खात्री झालेली होती. सारांश, उतावळ्या नवऱ्याप्रमाणें बाशिंग बांधून आपलें व आपल्याबरोबर समाजाचेंही आपण काढलेल्या नवीन संस्था व व्यवस्था यांशीं लग्न लावून देण्यास ही मंडळी जरी तयार झाली होती, तरी यांच्या

अद्वातद्वा आचरणानें आणि अव्यवस्थित गृहस्थितीनें समाजाचा यांच्यावर पूर्वी कांहीं विश्वास असल्यास तो अगदीं उडून गेलेला होता, व यांचें पुढारीपण यांच्या परिवाराखेरीज समाजांतील इतर लोक कबूल करण्यास तयार नव्हते.

बा० गं० टिळक
( केसरींतील निबंध )

### प्रश्न व सूचना

( १ ) आगरकर व टिळक यांच्या भाषाशैलींची तुलना करा. ( केळकरकृत टिळक-चरित्र पहा. )

( २ ) वरील उताऱ्यांत इंग्रजी शिक्षणामुळें झालेल्या कांहीं वाईट परिणामांचें दिग्दर्शन केलें आहे. मग या शिक्षणास विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं 'वाघिणीचें दूध' असें कां म्हटलें ?

( ३ ) [ अ ] टिळकांचे मतें पुढाऱ्यांच्या अंगीं श्रीमंती, विद्वत्व व अधिकार यांशिवाय आणखी दुसरे कोणते गुण आवश्यक असावयास पाहिजेत ?

[ आ ] आगरकर कसे, कितपत व कोणत्या अर्थानें समाजाचे पुढारी होऊं शकले ?

( ४ ) पुढील शब्दांची व्युत्पत्ति द्याः —चकारशब्द, बेहोष, अद्वातद्वा.

( ५ ) 'उतावळ्या नवऱ्याप्रमाणें बाशिंग बांधून मंडळी जरी तयार झाली होती,' या वाक्यांत टिळकांनीं म्हण जशीच्या तशी न देतां तिचें रूपांतर करून आपला अर्थ सुंदर रीतीनें व्यक्त करण्याचे कामीं तिचा उपयोग करून घेतला आहे; अशा प्रकारें दुसऱ्या म्हणींचा उपयोग केलेला या पुस्तकांत अनेक ठिकाणीं आढळेल. अशीं कांहीं ठिकाणें फुरसतीअंतीं शोधून काढा.

---

# माझे कांहीं स्वभाव-दोष

[सदरहू उतारा प्रो० धोंडो केशव कर्वे यांच्या 'आत्मवृत्त' या सुंदर पुस्तकांतील आहे. प्रो० कर्वे यांचे अंगचे गुण सर्वश्रुतच आहेत. परंतु आपले अंगीं दोष काय आहेत, हें शोधून काढण्याचा प्रयत्न करणें व ते लोकांपुढें मांडणें हा त्यांचा विशेष गुण होय. त्यांनीं दाखविलेले आपले दोष खरोखरच दोष आहेत, का गुणस्वरूप आहेत हा प्रश्न आलाहिदा.]



प्रो० धों. के. कर्वे.

दुसऱ्याला नाखूष करणें माझ्या अगदीं जिवावर येतें. ह्या माझ्या स्वभावामुळें माझ्या मुलांवर सुद्धां कधीं माझा दाब नसतो. तीं लहानपणापासूनच माझ्याजवळ अगदीं सलगीनें व निर्भीडपणें वागूं लागतात. अण्णा आपणांवर रागावतील अशी भीतीच त्यांना वाटत नाहीं. मोठ्या दोन मुलांना एकदोन वेळां तरी शिक्षेचे प्रसंग आले; पण धाकट्या दोन मुलांना शिक्षा केल्याचें मला स्मरत नाहीं. जीं दुसरीं मुलें अभ्यासासाठीं मजकडे होतीं, त्यांना रागाचे शब्द बोलण्याचे प्रसंग सुद्धां फार थोडे आले असतील. इतका गोडपणा

जगांत चालावयाचा नाहीं; परंतु तो माझ्या अंगीं खिळल्यामुळें इसापनीतींतील लांकडाच्या ओंड्याच्या राजाप्रमाणें माझी स्थिति होते.

या दोषांमुळें दुसऱ्याचे अपराध पोटांत घालण्याकडे माझ्या मनाची प्रवृत्ति फार होते व अपराध्याला योग्य शासन मजकडून होत नाहीं. यामुळें शिस्त राखण्याच्या कामीं माझ्या हातून ढिलाई होते. एकदोन वेळां न्यू इंग्लिश स्कुलांत सुपरिंटेंडेंटचें व असिस्टंट सुपरिंटेंडेंटचें काम मजकडे आलें होतें. त्या वेळीं मुलें माझ्या या स्वभावाचा फायदा घेत. दरमहाची फी बारा तारखेच्या आंत दिली पाहिजे, उशीर झाल्यास एक पैशाप्रमाणें दंड द्यावा असा नियम असे. कांहीं तरी सबबी सांगून दंड माफ करून घेण्यासाठीं मुलें मजकडे येत व कधीं कधीं त्यांना नाखूष करण्याऐवजीं मीच त्यांच्या दंडाचे पैसे त्यांच्याजवळ देऊन त्यांना परत पाठवीत असें.

या स्वभावदोषामुळें अधिकार चालविण्याच्या कामाला मी अगदीं निरुपयोगी आहें. एका विशेष परिचयाच्या लाइफ-मेंबर मित्रांनीं विनोदानें माझें नांव "गोब्राह्मण" ठेविलें होतें. या विनोदाच्या लहानशा नांवांत माझें स्वभाववर्णन बरेंचसें उतरलें आहे. एकदां एका पदवीधर शिक्षकांना लेडी सुपरिंटेंडेंट यांनीं खालच्या इयत्तांवर काम दिलें. यामुळें आपला अपमान झाला अशी समजूत करून घेऊन ते ताठ्यानें वर्ग शिकविण्याला गेले नाहींत. ही गोष्ट मजकडे आली तेव्हां मी त्यांना बोलाविलें व तुमच्या 'वर्तनाबद्दल मी तुम्हांला बोलणार आहें, याबद्दल मला क्षमा करा', असें म्हणून त्यांना प्रथम साष्टांग नमस्कार घातला व नंतर 'तुम्हीं केलें हें बरें केलें नाहीं' वगैरे त्यांना सांगितलें. हा सर्व प्रकार लेडी सुपरिंटेंडेंट यांच्या समक्ष घडला. आणखी एक-

दोन प्रसंगीं आश्रमांतील शिक्षकांशीं मीं असलेंच वर्तन केलें. त्या प्रसंगीं तिसरें कोणी मनुष्य हजर नव्हतें, एवढेंच काय तें.

या दोषांचेंच एक भिन्न स्वरूप पुढील उदाहरणांत आहे. एकदां आश्रमांतील[1] एका विद्यार्थिनीच्या हातून बराच मोठा अपराध घडला. अमुक एक गोष्ट तूं करूं नको असें बजावून सांगितलें असतांहि तिनें ती केली होती. ही मुलगी अतिशय तापट व प्रसंगीं भलतेंच कांहीं करील अशा स्वभावाची होती. शिवाय ती पोरकी होती. हिला आतां काय शिक्षा करावी हा मला मोठा विचार पडला व हिला बोलूं लागल्यावर माझा राग अनावर होईल कीं काय ही मला भीति पडली. मीं तिला एकटीलाच बोलावून आणलें व तिची कानउघाडणी करून तिनें केलेल्या चुकीचा प्रसंगीं केवढा घातुक परिणाम झाला असता हेंहि तिच्या नजरेला आणून दिलें. कांहीं वळ माझी शांतवृत्ति राहिली; पण नंतर राग येऊं लागला. तथापि हिला कडक शिक्षा केली तर ती आततायीपणानें भलतेंच कांहीं करील हा विचार मनांतून गेला नाहीं. सौम्य शिक्षेनें कार्यभाग होण्यासारखा नव्हता. 'या अपराधाला तुला कडक शासन पाहिजे, परंतु तें करण्याला मला धैर्य होत नाहीं. यासाठीं तें मीं स्वतःलाच करून घेतों' असें म्हणून खूप जोरानें मीं आपल्याच श्रीमुखांत फडकाविली व 'पुनः असें करूं नको', एवढें सांगून तिला परत पाठविलें. यानंतर मी तिच्याशीं मायेनें वागलों व पुढें तिनें अपराधहि केला नाहीं. ती आतां आश्रम सोडून गेली असून सुस्थितींत आहे.

या मनाच्या दुर्बलतेमुळेंच माझ्या अंगीं उत्पन्न झालेला मोठा दोष म्हणजे हाताखालच्या व बरोबरीच्या मनुष्यांशीं योग्य

---

१ अनाथ-बालिकाश्रम, हिंगणें.

रीतीनें वागतां न येणें हा होय. आश्रम, विद्यालय[1] व मठ[2] यांच्या परस्पर संबंधांत जी अनर्थपरंपरा उत्पन्न झाली तिचें मुख्य कारण माझ्या अंगचा हा दोष होय. या माझ्या स्वभावदोषाचे परिणाम कांहींना भोंवलेच आहेत; व यापुढेंहि ते कितीकांना भोंवतील हें सांगतां येत नाहीं. जोंपर्यंत सर्व एकमार्गी होतें, तोंपर्यंत सगळें ठीक चाललें. पण भिन्न मतांचीं व परस्परांशीं पटत नाहीं अशीं अनेक मनुष्यें एकत्र जमल्यानंतर कलीला सुरुवात झाली. ती लोकांच्या नजरेला अलीकडे आली एवढेंच. तिचें बीज बरेंच जुनें आहे. तें मनुष्यस्वभावाशीं खिळलेलेंच आहे व चार मनुष्यें एकत्र झालीं कीं, त्याचा प्रादुर्भाव व्हावयाचाच. कर्त्या माणसांचें खरें शहाणपण या बीजाला अंकुर फुटूं लागल्याबरोबर जेथच्या तेथें त्याचा मोड करण्यांत आहे. हें माझ्या अंगीं अगदींच नसल्यामुळें सर्व अनिष्ट प्रकार घडून आले. जेव्हां मीं उत्साहानें या गोष्टी हातीं घेतल्या, त्या वेळीं मला हे दूरवरचे परिणाम दिसले नाहींत. एकट्या मनुष्याशीं प्रसंग असल्यास आपण माघार घेऊन प्रकरण निकालाला लावतां येतें; परंतु परस्परांविषयीं ज्यांची मनें शुद्ध नाहींत अशा अनेक व्यक्तींशीं प्रसंग आला म्हणजे मी गोंधळून जातों, व मला कांहीं सुचत नाहीं. अशा वेळीं मी कात्रींत सांपडल्यासारखा होतों, व त्यामुळें मला व इतरांना फार ताप होतो. मला ताप होतो त्याबद्दल वाईट वाटत नाहीं. कारण, माझ्या स्वभावदोषाचा परिणाम मला भोगलाच पाहिजे. परंतु इतरांना ताप होतो त्याबद्दल फार वाईट वाटतें.

आणखी एक दोष— किंवा त्याला दोष म्हणण्यापेक्षां गुणाचा अभाव म्हणणें अधिक बरें— माझ्या अंगीं आहे. आपल्याबद्दल

१ महिलाविद्यालय. २ निष्काम-कर्ममठ.

कोणाचा गैरसमज झालेला असला तर योग्य वेळ साधून आपली बाजू युक्तिप्रयुक्तीनें त्यांजपुढें मांडून तो दूर करण्याचें चातुर्य मजमध्यें नसल्यामुळें अशा प्रसंगीं मला काळावर भिस्त ठेवूनच स्वस्थ बसावें लागतें; व केव्हां गैरसमज अधिकच पसरत जातात. एकदां माझ्या दोघां मित्रांनीं निष्काम-कर्म-मठाच्या उद्योगापासून मला परावृत्त करण्यासाठीं सद्बुद्धीनें माझी कानउघाडणी करण्याचा यत्न केला. माझ्यासंबंधानें त्यांचें मन इतरांच्या तोंडच्या तिखटमीठ लावलेल्या गोष्टी ऐकून बरेंच कलुषित झालें असावें असें मला वाटत होतें. तेव्हां यांची समजूत पाडणें आपल्या हातून होणार नाहीं हें जाणून मी या भानगडींत न पडतां या कामांत जें मीं पुढें पाऊल टाकलें आहे तें मागें घेण्याची माझी इच्छा नाहीं, इतकेंच सांगून मी मोकळा झालों. आपली खरी बाजूहि नीटपणें पुढें मांडतां न आल्यामुळें कित्येक थोर गृहस्थांचा मजबद्दल गैरसमज व्हावा व तो वर्षानुवर्षें कायम रहावा असेंहि क्वचित् घडतें.

जेथें आपलें समर्थन करण्यासाठीं दुसऱ्याचा दोष अगर कमीपणा दाखविल्यावांचून गत्यंतर नसतें तेथें आपणच कमीपणा पत्करून स्वस्थ बसणें मला बरें वाटतें. हें मी थोर मनानें करतों असें नव्हे. दुसऱ्याचा दोष दाखवावयाचा म्हणजे तो सिद्ध केला पाहिजे व तें करणें सोपें नसतें; यासाठीं आपली बाजू लंगडी आहे असें पत्करणेंच माझ्यासारख्या स्वभावाच्या मनुष्याला सोईचें होतें. यामुळें देखील कित्येक वेळां गैरसमज तसेच राहतात.

आश्रमाच्या कमिटीच्या सभांच्या वेळीं अंतःकलहासंबंधाचा कांहीं विषय निघाला तर 'मी आतां वेडा झालों आहें' एवढेंच सांगून मी मोकळा होत असें. या मंडळीची समजूत घालणें माझ्या आटोक्याबाहेर असल्यामुळें मला या मार्गाचा अवलंब करावा लागे.

माझा स्वभाव मूळचा रागीट आहे; पण प्रयत्नांनीं राग आंतल्या आंत दाबून टाकण्याला मी शिकलों आहें. तथापि कधीं कधीं तो बाहेर पडतो; व अशा प्रसंगीं दुसऱ्याला लागण्यासारखे शब्द माझ्या तोंडून निघतात, पण असे प्रसंग थोडे येतात.

एखादी गोष्ट मला बरी वाटली व ती मीं हातीं घेतली म्हणजे दुसऱ्यांच्या बऱ्यावाईट म्हणण्याकडे लक्ष न देतां होतां होईल तों तीपासून माघार घ्यावयाची नाहीं असा माझा स्वभाव असल्यामुळें कधीं त्याला हट्टीपणाचें स्वरूप येतें.

या दोषांवर पांघरूण घालणारा एक लहानसा गुण माझ्या अंगीं आहे, एवढीच त्यांतल्यात्यांत समाधानाची गोष्ट आहे. एखाद्या तत्त्वाचा प्रश्न अगर महत्त्वाची बाब नसली म्हणजे आपलें म्हणणें मागें घेऊन क्षमा मागण्याला अगर तडजोड करण्याला मी नेहमीं तयार असतों; त्याचप्रमाणें विशेष महत्त्वाच्या कामीं मत-भेद झाल्यास चिकाटीनें आपल्या विचाराप्रमाणें वागून निगरगट्ट बनून प्राप्त स्थितीला तोंड देण्यालाहि मी तयार असतों.

धों० के० कर्वे
(आत्मवृत्त)

### प्रश्न व सूचना

(१) प्रो० कर्वे यांनीं दाखविलेले सर्वच दोष खरोखरीच दोष आहेत काय?

(२) पहिल्या परिच्छेदामध्यें लांकडाच्या ओंडक्याच्या राजाचा जो उल्लेख आला आहे तो इसापनीतींतील कोणत्या गोष्टीला उद्देशून आहे? गोष्टहि थोडक्यांत सांगा.

(३) आपला भावार्थ व्यक्त करण्याकरितां इसापनीतींतील वगैरे गोष्टींचा केलेला उपयोग अनुकरणीय आहे.

( ४ ) खालील शब्द व वाक्प्रचार यांचा अर्थ तुम्हांला चांगला समजला आहे असें दर्शविणारीं स्वतंत्र वाक्यें बनवा व त्यांचा अर्थहि सांगाः—आततायी, एकमार्गी, कात्रींत सांपडणें, युक्तिप्रयुक्ति, तडजोड, कालावर भिस्त ठेवणें.

( ५ ) हा व मागील उतारा यांच्या आधारें ( व इतर पुस्तकांच्या आणि स्वानुभवाच्या आधारें ) एका आदर्शभूत पुढाऱ्याचें एक काल्पनिक शब्दचित्र काढा.

---

# मराठी भाषा आणि तिच्यावर इतर भाषांचा परिणाम

[ सदरहू उतारा अनंत आत्माराम मोरमकर ( ४०२ ठाकूरद्वार मुंबई ), यांनीं चिंतामणराव वैद्य यांचें 'निबंध आणि भाषणें' या नांवाचें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे त्यांतून घेतला आहे. यावरून मराठी भाषेवर निरनिराळ्या भाषांचा काय परिणाम झाला आहे हें दिसून येतें व अनुषंगानें चिंतामणराव वैद्य यांचें विद्वत्व आणि बहुश्रुतत्व हीं दिसून येतात. ]

महाराष्ट्रीय लोकांची विद्याभिरुचि व भाषाप्राविण्य हीं पहिल्यापासून प्रसिद्ध आहेत. राजशेखरानें महाराष्ट्राला "सरस्वतिजन्मभू" असें म्हटलें आहे. महाराष्ट्रांत त्या काळीं चांगले ग्रंथ झाले असावेत असें दिसतें. परंतु यानंतरचे काळांत कांहीं ग्रंथ झाले आहेत असा दाखला आपल्यास मिळत नाहीं. पैठण ही जोंपर्यंत राजधानी होती तोंपर्यंत भाषेस राजाश्रय होता हें साहजिक आहे. पुढें तेथून राजधानी पूर्वेकडे तेलंगण देशांत गेल्यामुळें जनभाषेला राजकीय पाठिंबा राहिला नाहीं. इ. स. ८०० च्या सुमारास दौलताबाद येथें राज्याची गादी आल्यापासून तो पुन्हा मिळूं लागला.

या वेळेपासून इ. स. १२०० पर्यंत चारपांचशें वर्षें भाषेला राजाश्रयाचा पाठिंबा मिळाल्यामुळें, मराठीचें हल्लींचें स्वरूप दिसत आहे त्यासारखी प्रचारांत आली, व राजाश्रयानें म्हणा किंवा लोकांच्या साहजिकच स्फूर्तीनें म्हणा, मराठींत ग्रंथ होऊं लागले. त्यांचें शेवटचें उच्चतम स्वरूप म्हटलें म्हणजे ज्ञानेश्वराचे ग्रंथ होत.

श्रीमच्छंकराचार्य हे इसवी सनाच्या आठव्या किंवा नवव्या शतकांत झाले. तेव्हांपासून वेदान्तमताला विशेष जोर आला, आणि जैन व बौद्ध मत मागें पडलें. हीं दोन्ही मतें महाराष्ट्रांत बरींच प्रबळ होतीं. जनसमूहाला मराठी भाषेंत वेदान्तमत समजावून देण्याची फार जरूरी पडली व यामुळेंच मराठींत ग्रंथ विशेषत: होऊं लागले. यामुळें मराठीवर ज्या भाषेचा पहिला परिणाम घडला, ती भाषा म्हटली म्हणजे संस्कृत होय. वेदान्त विषय कठीण असल्यामुळें संस्कृतांतले शब्द जसेच्या तसेच मराठींत घ्यावे लागले. असे शब्द बाहेरून घ्यावे लागतात किंवा घेण्याकडे मनुष्याची साहजिक प्रवृत्ति होते, हें हल्लीं मुंबईत बोलत असलेल्या भाषेवरून सहज कळून येण्यासारखें आहे. " मीं अप्लिकेशन केली, परंतु ती रिजेक्ट झाली " या वाक्यांत सर्वनामें, क्रियापदें व प्रत्यय मराठी आहेत, पण दोन इंग्रजी शब्द जसेच्या तसेच घेतले गेले आहेत. असाच प्रकार संस्कृताचा झाला ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. मराठी भाषा प्रत्यय वगैरेसुद्धां संस्कृतावरूनच निघाली आहे, पण ती अपभ्रंशावरून आली आहे, तेव्हां तीं स्वरूपें व ते शब्द निव्वळ मराठी होत. यानंतर प्रथम देवगिरी राजांचे कारकीर्दींत मराठी ग्रंथ होऊं लागले त्या वेळेस संस्कृत शब्द जसेच्या तसेच घेतले ते शुद्ध संस्कृत होत. उदाहरणार्थ, " घोडा " हा शब्द " घोटक " या संस्कृत शब्दावरून निघाला

आहे; तो निव्वळ मराठी आहे; आणि "अश्व" हा शब्द संस्कृतांतून घेतला आहे; तो निव्वळ संस्कृत आहे. हा भेद संस्कृत शब्द मराठींत निराळ्या रीतीनें लिहावे असें प्रतिपादन करणाऱ्यांच्या लक्षांत आला नव्हता असें म्हटलें पाहिजे.

संस्कृत शब्दांचा भरणा आंत घेतल्यानें मराठी भाषेला मोठा जोर आला हें निर्विवाद आहे. परक्या भाषेचा परिणाम दुसऱ्या भाषेवर होतो तो दोन तऱ्हांनीं होतो; एक, शब्द भरण्यानें होतो; दुसरा, एका भाषेंतील वाङ्मयानें दुसऱ्या भाषेच्या वाङ्मयावरहि परिणाम होतो. संस्कृत भाषेचा जो मराठीवर पगडा बसला, तो वेदान्त मतें मराठींत सांगण्याची जरूरी पडली म्हणून बसला हें पूर्वीं सांगितलेंच आहे. ही मोठी सुदैवाची गोष्ट आहे, कीं यामुळें संस्कृतांतील इतर गद्यपद्यात्मक वाङ्मयाचा त्या वेळच्या मराठीवर पगडा बसला नाहीं. जें संस्कृत वाङ्मय हल्लीं उत्तम म्हणून कॉलेजांतून शिकविलें जातें त्यांत माझ्या मतें दोन मोठे दोष आहेत:—एक श्लेषाकडे संस्कृत कवींची ओढ; व दुसरा, त्यांची अश्लील शृंगाराकडे धांव. ह्या गोष्टी इतक्या फाजील स्थितीला पुढें पुढें पोंचल्या कीं, त्यांपासून संस्कृत वाङ्मयाला बराच हीनपणा आला. कालिदास-भवभूतीनेंहि वर्णिलेला शृंगार ग्राम्य आहे असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. इतर कवींची तर गोष्टच बोलूं नका.

यासंबंधानें महाभारत व रामायण हे ग्रंथ फार प्रशंसनीय आहेत. रामायणांत या दोषांनीं व्याप्त अशी एकच ओळ आहे; तीहि प्रक्षिप्त असावी असें वाटतें. समग्र महाभारतांत हा दोष कोठेंच आढळावयाचा नाहीं. असो. आनंदाची गोष्ट ही कीं, मयूरादि कवींच्या काव्याची किंवा रत्नावल्यादि नाटकांची मराठी-

वर छाया मुळींच पडली नाहीं व अश्लील शृंगाराला प्रथम तरी थारा मिळाला नाहीं हें माझ्या मतें फार चांगलें झालें.

या पहिल्या काळांतील अत्युत्तम ग्रंथ "ज्ञानेश्वरी" होय. या ग्रंथाचे अर्थगांभीर्य, दृष्टान्तचातुर्य व कल्पनाप्रागल्भ्य हे गुण प्रसिद्धच आहेत. पण भाषेच्या दृष्टीनेंही हा ग्रंथ उत्तम व उदात्त आहे. या ग्रंथानंतर लौकरच महाराष्ट्र राज्य लयाला गेलें. व इ. स. १३०० पासून १६०० पर्यंत निदान ३००–३५० वर्षें मुसलमानीचा अंमल महाराष्ट्रांत होता. या काळांत ग्रंथरचनेस साहजिकच धक्का बसला. भाषेची वाढ एका रीतीनें खुंटली; तत्रापि दुसऱ्या एका बाजूनें महाराष्ट्र-भाषेस मदत मिळाली. राज्यव्यवहार व राज्यपद्धति सर्वच मुसलमानी असल्यामुळें राजकीय व्यवहाराचे सर्व मुसलमानी शब्द मराठींत घुसले. ते इतके कीं, मध्यंतरीं स्वराज्यस्थापना होऊन हल्लीं इंग्रजी राज्य झालें आहे तत्रापि ते शब्द गेले नाहींत, किंबहुना ते आपलेच आहेत असे भासतात. उदाहरणार्थ काळीच्या[1] संबंधाचे सर्व शब्द फारशी आहेत. मामलेदार, सुभे, सरसुभे, तालुका, जिल्हा, कचेरी, शिरस्तेदार, सबनीस, फडणीस, पोतदार, साहेब वगैरे जमाखर्चासंबंधानेंहि सर्व शब्द फारशी आहेत हें आश्चर्यकारक आहे. कारण, मुसलमानींत जमाखर्च ठेवणारे बहुधा दक्षिणी ब्राह्मण होते. जमाखर्च, कीर्द, खत, गोषवारा, ताळेबंद, बद्दलमुशाहिरा, खेरीजमुशाहिरा, अमानत, तसलमत, इजाफतें[2], मुसाफतें[3], बेरीज, बाकी, रुपये, आणे वगैरे शब्द मुसलमानी आहेत. जमीन शब्द

१ काळी माती, शेती. २ इजाफत जमा (कर्जफेड, देणग्यांची विक्री, यांमुळें किंवा इतर प्रकारें उत्पन्नांत पडलेली भर). ३ मुसाफत खर्च (देणगी वगैरेकरितां केलेला खर्च).

मुसलमानी आहे; जमिनीची मोजणी मुसलमानांच्या पूर्वीं कशी करीत होते व मुख्य माप काय होतें याचा पत्ता समग्र भारतांत मला लागला नाहीं. एका श्लोकाच्या टीकेंत "निवर्तन" हा शब्द आढळला. तो बिघ्याच्या ऐवजीं असावा असें वाटतें. "भूमेर्दश निवर्तनानि कर्षति" असा प्रयोग दृष्टीस पडला आहे. असो. बिघा शब्द मुसलमानी आहे असें वाटतें. त्याचप्रमाणें न्यायाकडील सर्व शब्द मुसलमानी आहेत. मुनसफ, नाझर, कारकून, फिर्याद, दावा, कैफियत, पुरशिस[2], जबानी, अर्ज, दर, मुद्दल, फैसला[3], हुकूमनामा इत्यादि शब्द मुसलमानी आहेत. वादी, प्रतिवादी, साक्षिदार हे संस्कृत शब्द कसे राहिले आहेत याचें आश्चर्य वाटतें. साक्षि एवढ्यानेंच काम होत असून साक्षिदार हें मुसलमानी प्रत्ययान्त रूप कसें प्रचारांत आलें हेंहि आश्चर्यजनक आहे. गवाह (साक्षि) गवाहि (साक्ष्य) हे फारशी शब्द कांहीं लोकांच्या तोंडांत आढळतात. कर्जखत, सही दस्तुरखुर्द[4] वगैरे शब्द फारशी आहेत इतकेंच नव्हे, तर बेशर्मी हा शब्द परंपरेनें कर्जखत, पावती वगैरे लिहिणारांना असा चिकटला आहे कीं, तो लिहिल्याशिवाय त्यांची लेखणी पुढें चालत नाहीं! पण बेशमी याचा अर्थ काय आहे ही पृच्छा त्यांना कधीं सुचत नाहीं. "कर्जखत बेशमी धोंडो रामचंद्र", "पावती बेशमी रामा बाळू" वगैरे लिहिलेलें पाहून प्रथम प्रथम मला वाटे कीं, बेशमी हें बेशर्मी याचें रूप असावें! मागाहून उर्दू भाषेचा अभ्यास होऊन उर्दू खतें पाहण्याचा प्रसंग आला तेव्हां कळलें कीं,

---

१ जमिनीचीं दहा 'निवर्तनें' नांगरठीखालीं आणतो. २ विचारणा, विचारपूस. ३ निवाडा, निकाल. ४ सही दस्तुर खुद्द = सही स्वतःचे हातची असे. (दस्तुर = पर्वानगी; कबुली सही.) (पटवर्धन-कोश.)

बेशमी हा 'ब इस्म' (नांवाचा) या शब्दाचा मराठी अपभ्रंश आहे. असो. बेशमीसारखें रोषन[१] होय, हे अर्जे-दास्त[२] वगैरे मुसलमानी शब्द लिहिण्याचें अर्जी लिहिणारांच्या अगदीं अंगवळणीं पडलें आहे. मुसलमानी राज्यपद्धति बरीच सुधारली होती यांत शंका नाहीं. त्यामुळें हल्लींच्या राज्यपद्धतींतही उपयोगी पडतील असे त्या भाषें-तले पुष्कळ शब्द आपल्यांत शिल्लक आहेत. या राजकीय शब्दांचें मराठींतील अस्तित्व स्वतंत्रताप्रिय शिवाजीमहाराजांस सहन न होऊन त्यांनीं एक 'राजव्यवहारकोश' तयार करविला, व प्रत्येक मुसलमानी शब्दाबद्दल संस्कृत शब्द योजून तो वापरण्याविषयीं त्यांनीं हुकूम केला. त्यांचे हयातींत हा नियम चालला असेल पण त्यांच्यानंतर त्यांचें धोरण सर्वच बाबतींत बिघडलें. त्याप्रमाणें याही बाबतींत कायम न राहतां 'राजव्यवहारकोश' आतां पुस्तकालयांत मात्र दृष्टीस पडतो! त्याचा अंमल झाला नाहीं.

राजकीय शब्दांशिवाय इतर बारीकसारीक मुसलमानी शब्द मराठींत शिरले आहेत. हा केवळ सहवासाचा गुण होय. अव्ययां-तही असे शब्द सांपडतात हें आश्चर्य आहे; व, हल्लीं, फक्त, बिलकुल हीं अव्ययें मुसलमानी आहेत. कांहीं ठिकाणीं तर या शब्दांना आपण मराठी स्वतंत्र अर्थ दिला आहे. उदाहरणार्थ, 'बिलकुल' हा शब्द फारशींत अस्तिपक्षीं व नास्तिपक्षीं योजला जातो; पण मराठींत 'तो बिलकुल शाहणा आहे', 'मला बिलकुल पसंत आहे' अशा प्रयोगीं वापरीत नाहींत. तर 'तो बिलकुल वेडा आहे', 'मला बिलकुल पसंत नाहीं' अशाच प्रसंगीं 'बिलकुल' शब्द उपयोगांत येतो. 'अवलाद[३]' याचा अर्थ मुसलमानींत संतति

---

१ श्रुत होय, २ अर्झ-दाश्त, विज्ञाप्तिपत्रिका, विनंति. ३ वलद (पुत्र)चें अनेकवचन, प्रजा, कुळी.

एवढाच असून मराठींत या शब्दाला गौण अर्थ प्राप्त झाला आहे. सारांश, मराठी भाषेनें कांहीं कांहीं मुसलमानी शब्द आपले केले आहेत, हें मुसलमानांची चारपांचशें वर्षें सत्ता येथें होती हें लक्षांत आणिलें असतां आश्चर्यकारक नाहीं.

फारशी वाङ्मयाचा मराठी भाषेवर परिणाम घडल्याचें मुळींच दिसत नाहीं, हें साहजिकच आहे. कारण फारशी भाषा त्या वेळेस लोक कामापुरतेच शिकत होते व फारशी राज्यकर्त्यांनीं इंग्रजी राज्यकर्त्यांप्रमाणें फारशी भाषा शिकविण्याचा आग्रह धरला नाहीं किंवा सार्वत्रिक प्रयत्नही केला नाहीं. नाहीं म्हणावयास मुसलमानी संपल्यावर व स्वराज्यस्थापना झाल्यावर ऐतिहासिक गद्य ग्रंथ व पद्यें लिहिण्याचा सांप्रदाय सुरू झाला. त्यांचीं फारशी नांवें आपल्यांत प्रसिद्धच आहेत. 'बखरी'[1] या फारशी इतिहासाच्या अनुकरणानें झाल्या असें मला वाटतें. तसेंच पोवाडे[2] करणारे 'शाहीर' हेही फारशी वाङ्मयाच्या परिणामानें झाले असें वाटतें. एरव्हीं या लोकांस 'शाहीर' ही फारशी संज्ञा मिळाली नसती. 'शाहीर' हा फारशी शब्द केवळ कविवाचक असून मराठींत तो विशिष्ट कवींचा वाचक झाला आहे. 'मोरोपंत शाहीर होता' असें मराठींत कोणी म्हणणार नाहींत.

मुसलमानांच्या राजनीतीमुळें धर्माच्या बाबतींत हिंदु लोकांत विशेषतः महाराष्ट्रांत फारच धामधूम व खळबळ उडाली; व त्यामुळें महाराष्ट्रांत स्वराज्यस्थापना झाली. या वेळेस एकनाथ, तुकाराम, रामदास इत्यादि साधुकवि मराठींत झाले, व एकनाथांनीं ज्ञानेश्वरीचें पुनरुज्जीवन केलें; या कवींच्या काव्यांत मुसलमानी शब्द

---

१ आरबी 'खबर' पासून. २ संस्कृत 'प्रवाद'पासून.

फार थोडे सांपडतात हें आपल्यास लक्षांत ठेविलें पाहिजे. कदाचित् मुसलमानी शब्द त्यांनीं मुद्दाम वगळले असतील; किंवा फारशी शब्द फक्त राजकीय व्यवहारांतच उपयोगांत येत असत, एकंदर भाषेंत आले नव्हते, असें म्हणावें लागतें. या कवींच्या लेखांतूनहि कोठें कोठें फारशी शब्द आढळतात हें कबूल केलें पाहिजे, व तें दुर्निवारच होतें यांत संशय नाहीं.

स्वराज्यस्थापना झाल्यानंतर मराठी भाषेस पुन्हा जोर आला. या वेळेस ग्रंथकारांनीं संस्कृताची पुन्हा मदत घेतली हें साहजिकच आहे. ज्ञानेश्वरांनीं मराठींत संस्कृत शब्द वापरले त्यापेक्षां मोरोपंतांनीं जास्ती वापरले आहेत. तसेंच शब्दचित्रकाव्यें करण्याकडे मोरोपंतांचें लक्ष गेलें हेंही संस्कृत वाङ्मयाच्याच परिणामाचें फळ होय; मराठींत सर्व प्रकारचीं संस्कृत वृत्तें घेऊन वामनांनीं प्रथम पद्यरचना केली. तोंपर्यंत मराठी वृत्तेंच वापरीत होते ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे; यमकाला संस्कृतांत प्राधान्य नसून मराठींत आहे. हा विशेष मराठीचाच आहे असें दिसतें. एकंदर मराठी कवि साधु असल्याकारणानें संस्कृत शृंगारिक काव्यांचा व काव्यरचनेचा मराठीवर या वेळींही पगडा बसला नाहीं, व मराठींत नाटकें व कादंबऱ्या झाल्या नाहींत. याप्रमाणें या वेळींही मराठीची वाढ प्रशंसनीय झाली. पहिल्या स्वराज्याचा ग्रंथमुकुटमणि जसा 'ज्ञानेश्वरी' होय, तसा या दुसऱ्या स्वतंत्रतेच्या काळांतील ग्रंथरचनेचें शिखर म्हटलें म्हणजे मोरोपंतांचें 'महाभारत' होय. या दोहोंची तुलना करण्याचा माझा हेतु नाहीं; तथापि जोरदार मराठींतलि हीं दोन्ही अत्युत्तम रत्नें आहेत, हें निर्विवाद होय.

हल्लीं इंग्रजांचें राज्य महाराष्ट्रांत आहे, तेव्हां इंग्रजी भाषेचा मराठीवर परिणाम होणें स्वाभाविकच आहे. शब्दासंबंधानें पाहिलें

तर ज्या गोष्टी अगदीं नव्या आहेत, त्यांचीं नांवें इंग्रजींतून प्रथम जशींच्या तशींच मराठींत आली, हें युक्तच आहे. बुक, तिकिट, स्टांप कोर्ट, कलेक्टर वगैरे शब्द इंग्रजींतून जसेच्या तसेच मराठींत आले आहेत व ते प्रत्येक मनुष्यास समजण्यासारखें आहेत. कांहीं कांहीं पदार्थांना इकडील नांवें असतील, पण तीं नांवें असून ते पदार्थ निराळ्या स्वरूपानें हल्लीं आले असल्यानें, इंग्रजी शब्दांना कांहीं विशिष्ट अर्थ प्राप्त होतो. जसें, बुक म्हणजे बांधलेलें पुस्तक; व पोथी म्हणजे सुटें पुस्तक, ज्याप्रमाणें पूर्वीं सर्वच पुस्तकें असत त्या प्रकारचें. क्रियापदें नवीन उत्पन्न होत नाहींत. कारण नवीन क्रिया नवीन पदार्थांप्रमाणें अस्तित्वांत येऊं शकत नाहींत. तथापि हल्लीं संयुक्त क्रियापदांऐवजीं इंग्रजी क्रियापदांच्या धर्तीवर एकाच क्रियापदाचा प्रयोग करण्याचा प्रघात रा० हरि नारायण आपटे यांनीं सुरू केला आहे. 'त्यानें उत्तर केलें' याऐवजीं इंग्रजी प्रयोगाप्रमाणें 'तो उत्तरला' असा प्रयोग घालण्याचा त्यांनीं परिपाठ सुरू केला आहे! सारांश इंग्रजी भाषेचा मराठीवर बराच परिणाम होणार आहे; व तो केवळ नामांचा नसून इतर शब्दांचा व वाक्यरचनेचाही होणार आहे असें बारकाईनें पाहणारांच्या तेव्हांच लक्षांत येणार आहे.

याहीपेक्षां इंग्रजी वाङ्मयाचा मराठीवर परिणाम फार जबरदस्त व विशेष हितावह होणार आहे असें अनुमान दिसतें. इंग्रजी वाङ्मय अत्यंत विस्तृत असून फार उदात्त आहे, इतकेंच नव्हे तर तें निरनिराळ्या दिशेचें आहे. विशेषतः इंग्रजी गद्य-वाङ्मय फार जोरदार व विशेष किंमतीचें आहे. मराठींत हा वेळपावेतों बखरींशिवाय गद्यरचना नव्हती असें म्हटलें असतां चालेल. गद्यग्रंथ इंग्रजी राज्य झाल्यापासून मराठींत चांगले होऊं लागले आहेत हें

निर्विवाद आहे. निबंधग्रंथांत कै० विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या ग्रंथांस पहिला मान दिला पाहिजे. भाषा जोरदार असून इंग्रजींत ज्यास Rhetoric म्हणतात त्याचा उपयोग ज्यांत केला आहे व दृष्टांतांचा भरपूर ओघ ज्यांत विषयसिद्धीकडे उपयोगांत आणला आहे अशी रीति विष्णुशास्त्री यांनींच प्रथम लोकांपुढें ठेविली. कादंबऱ्या प्रथम अगदीं वाईट व अश्लील किंवा अनुदात्त शृंगारानें भरलेल्या निघाल्या; पण अलीकडे आपटे यांच्या कादंबऱ्या नांवाजण्यासारख्या झाल्या आहेत. 'पानिपतचा मुकाबला' ही कादंबरी ऐतिहासिक असून स्कॉटच्या धरतीवर लिहिली आहे. कांहीं अप्रयोजक शृंगारपर वर्णनें व कांहीं फाजील वाढलेलीं अप्रस्तुत स्थळें काढून ही कादंबरी तीनचतुर्थांश ठेविली तर ती उत्तम होईल अशी माझी समजूत आहे. मनुष्यस्थिति व वस्तुस्थिति यांचीं अगदीं बारीक बारीक गोष्टींपर्यंतचीं हुबेहूब चित्रें डोळ्यांपुढें उभीं राहतील अशीं वर्णनें या कादंबरींत बरींच आहेत. इतिहासावरचे ग्रंथ वाङ्मयांत घेण्यासारखे अद्याप झाले नाहींत, तथापि ते लौकरच होतील अशी उमेद आहे. इंग्रजींत ज्यास Humour म्हणतात, त्या रसाचे ग्रंथ आपल्यांत अद्याप होणें आहेत. सुश्लिष्ट शब्दरचना करण्याचें सामर्थ्य ईश्वरदत्त असतें. अशा परमेश्वरानें दिलेल्या म्हणा किंवा निसर्गप्राप्त म्हणा शक्तीचे ग्रंथकारक मराठी भाषेंत इंग्रजी वाङ्मयाचे अनुकरणानें पुढें उत्पन्न होतील यांत तिलप्राय शंका नाहीं. महाराष्ट्रभूमि म्हणजे सरस्वतीजन्मभू आहे, हें पूर्वकाळापासून प्रसिद्धच आहे. त्याप्रमाणें यापुढेंही मराठी भाषेच्या वाङ्मयांत उत्तम गद्य व पद्य ग्रंथ उत्पन्न होण्याची चांगली आशा आहे. येथें आणखी एक गोष्ट सांगण्यासारखी आहे. इंग्रजींत जीस Style असें म्हणतात, ती अद्याप आपल्यांत विशिष्ट

व निरनिराळ्या तऱ्हेची उत्पन्न झालेली नाहीं. संस्कृतांत यास रीति म्हणतात. संस्कृतांत दोन रीति परिगणित आहेत—एक वैदर्भी व दुसरी गौडी. वैदर्भी रीति म्हणजे लहान लहान गोड शब्द वापरून जोरदार भाषा लिहिली असते ती; व कठीण लांब लांब समासयुक्त भाषा ही गौडी रीति होय. प्रत्येकाची Style अथवा रीति निराळी असते हें सर्वांस ठाऊकच आहे. जसें प्रत्येकाचें चालणें निराळें असतें, जसें प्रत्येकाचें लिहिणें म्हणजे अक्षराचें वळण निराळें असतें, तशी प्रत्येकाची भाषाशैली निराळी असते; परंतु तिला Style म्हणतां येणार नाहीं. कारण, Style म्हणजे भाषाशैली कांहीं विशिष्ट जोरदार प्रकारची असली पाहिजे. माझी खात्री आहे कीं, जेव्हां चांगले चांगले ग्रंथकार मराठींत होतील, तेव्हां येथेंही भाषाशैलीचें वैचित्र्य रमणीय दिसूं लागेल. विदर्भ म्हणजे महाराष्ट्राचाच एक भाग आहे. तेव्हां संस्कृतांत नांवाजलेल्या वैदर्भी रीतिचें श्रेय महाराष्ट्रालाच आहे, महाराष्ट्रांतील बुद्धिवान् लोक, इंग्रजी वाङ्मयाच्या अनुकरणानें म्हणा किंवा स्वतंत्र तऱ्हेनें म्हणा, मराठी भाषेंत निरानिराळ्या रीतींत गद्यग्रंथांची चांगली भर घालतील अशी उमेद आहे. मराठी कवितेलाही इंग्रजी वाङ्मयामुळें निराळी दिशा लागली आहे. महाभारत, रामायण इत्यादि पूर्वग्रंथांला धरूनच यापूर्वी कविस्फूर्ति असे, ती आतां स्वतंत्र विषयांवर लुब्ध होऊं लागली आहे. याप्रमाणें मराठी भाषेवर व वाङ्मयावर इंग्रजी भाषेचा व वाङ्मयाचा चांगला परिणाम होत आहे हें अभिनंदनीय होय.

चिं० वि० वैद्य

*( निबंध आाणि भाषणें )*

### प्रश्न व सूचना

( १ ) मराठी भाषेंत आरबी-फारसीवरून व इंग्रजीवरून आलेले (आणि वरील उताऱ्यांत न दिलेले) असे दहा-दहा शब्द सांगा.

( २ ) उर्दू व इंग्रजी वाङ्मयावरून मराठींत आलेले कांहीं वाङ्मयप्रकार सांगा

( ३ ) शाहिरी-वाङ्मय म्हणजे काय ? पूर्वींचे शाहीर व अलीकडे स्वतःस 'शाहीर' म्हणवून घेणारे कवि यांमध्यें तुम्हांला काय फरक दिसतो ?

( ४ ) मागील तीन पानांवर आलेले संस्कृत, संस्कृततोत्पन्न, आरबी, फारसी, व इंग्रजीपासून आलेले शब्द शोधून काढा. कानडींतूनहि आपण कांहीं शब्द घेतले असल्यास तीन सांगा.

---

## पळसाला पानें तीनच

[ सदरहू उतारा रामचंद्र विनायक टिकेकर ऊर्फ 'धनुर्धारी' यांनीं लिहिलेल्या 'वांईकर भटजी' या कादंबरींतील आहे. ह्या कादंबरीचें वीज जरी गोल्डस्मिथ्-च्या व्हिकर ऑफ् वेक्फील्ड् या सुप्रसिद्ध कादंबरींत आढळल्यासारखें असलें तथापि ती भाषांतरित म्हणण्यापेक्षां स्वतंत्रच म्हणणें अधिक योग्य होईल, इतकें त्यांत लेखकाचें मार्मिकत्व, स्वतंत्र विचारशीलत्व, भाषावैशिष्ट्य व तत्कालीन महाराष्ट्रीय परिस्थितीशीं तादात्म्य इत्यादि गुण दिसून येतात. ]

वांई सोडून येतांना एका प्रकारें मनोवृत्ति क्षुब्ध झाल्या होत्या त्या हळुहळू शांत होत चालल्या. पुणें शहर जवळ येऊं लागलें तसें आम्हां सर्वांच्या मनाला पुनः 'मनचे मांडे' खाण्यास मिळूं लागले असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्या शहराचें वैभव, तेथील लोकांची बडेजाव, आमच्या बाळयाच्या अभ्यासाच्या सोई— त्या जणों काय यथाप्रकारें जमून येऊन त्याचा अभ्यासदेखील पुरा झाला,

मोठी चाकरी लागेल तेव्हां पुढें आपण काय करूं, वगैरे विचारांची उडालेली घनचक्कर, इत्यादिकांखालीं मी चूर होऊन गेलों. माझ्या स्त्रीच्या तोंडाकडे पाहून मात्र तिला एक प्रकारची काळजी असावी असा भास होई. शेजारींपाजारीं कोणी बायका मिळतात किंवा नाहीं, आपल्या यजमानाच्या घरच्या बायका कशा आहेत, आतां जातांच इतकीं धुणीं धुवावयाचीं तेव्हां पाण्याची वगैरे सोय कशी काय जमते, मुलांबाळांस भूक लागली तर आपलें काम आटोपे-पर्यंत त्यांस खाऊं घालण्याची वगैरे सोय कशी होईल, आपलीं भांडींकुंडीं नीट व्यवस्थेनें लावण्यास जागा कशी मिळेल— इत्यादि एक का दोन— शेंकडों प्रकारच्या विवंचना तिच्या मनांत घुटमळत असत. मुलें तर काय विचारावयाचीं? तीं सदा आनंदी! नवीन-पणा, मग तो कसाही कां असेना, पाहिला कीं त्यांच्या आनंदास व उत्सुकतेस भरतें हें यावयाचेंच. मोरोबा मात्र, काय कीं, या वेळीं जरा सचिंत बसले होते. इतक्यांत तिनें प्रश्न केला, 'काय हो भावोजी, बाजीरावाचें आतां नाहीं ना पुण्यास राज्य! बरें चांगलें मेल्याचें तळपट झालें तें!' मोरोबा म्हणाले, 'छेः वहिनी, हें काय आपण म्हणावें? अहो, तो ब्राह्मण प्रभु ना? केवढा दान-शूर! केवढा पट्टीचा विद्वान् ब्राह्मण! काय सांगूं अप्पा! ब्राह्मणांचा तर बिचारा केवळ अन्नदाता! पंक्तींत स्वतः आग्रह किती म्हणून करावा? काय त्याच्या एकेक गोष्टी आठवायच्या आहेत! गेलें बिचारें ब्राह्मणांचें राज्य, ईश्वराची मर्जी! पण वहिनी, तुम्हांला हो कां आतां त्याची आठवण झाली, मध्येंचशी?' ती म्हणाली, 'तो मोठा चांडाळ होता. वाईत आला तर पांचशें बायकांनीं विहिरींत जीव दिला म्हणून मीं ऐकलें आहे; आणि असल्याच्या

गांवीं आपण आतां चाललों म्हणून आठवण झाली. पण नाहीं ना आतां त्याचं कोणी पुण्यांत? त्याला झालीं आतां पुष्कळ वर्षं. आमच्या सासूबाई सांगत होत्या पुण्याच्या बायकांच्या आणि बाजीरावाच्या गोष्टी, म्हणून काय तें मला ठाऊक. अलीकडे मात्र नाहीं ऐकिल्या.'

इतक्यांत आमचा बाळ्या म्हणाला, 'वा: ! आतां ग कोठला आई बाजीराव! इ. स. १८१८ म्हणजे शके १७३९ सांत ब्रह्मावर्ती बाजीराव निघून गेले. त्यानंतर नानासाहेबानें बंड केलें, आणि तो कोठें आहे त्याचा पत्ता देखील नाहीं म्हणतात. बाबा, स्नानसंध्या करण्यास बाजीराव ब्रह्मावर्ताला हो कां गेले? पुण्यास, नाशकास आणि नाहीं तर आमच्या वांईस नसती का ती त्यांस करितां आली?' हा त्याचा प्रश्न ऐकून मला मोठी मौज वाटली. हा कालचा पोर आणि आजोबासारख्या गोष्टी सांगतो कशा, आणि त्या त्याला कळल्या कोठून ! मला मोठा अचंबा वाटून मी त्याला प्रश्न करणार तोंच तो पुन: म्हणाला, 'मोरूकाका बाजीराव बल्लाळ ऊर्फ पहिला बाजीराव हा मोठा शूर, देखणा आणि शहाणा होता नाहीं हो? तो असता तर सोनपतपानपतच्या लढाईत इतके बाजारबुणगे मारले गेले नसते. दुराण्याचाच त्यानें पराभव करून सोडिला असता.' हें त्याचें बोलणें ऐकून तर मला वाटलें, कीं हा मुलगा खरोखर बालबृहस्पति आहे. ॐ म्हणणाऱ्या अवतारी पुरुषासारखाच माझा बाळ्या आहे असें देखील मला वाटूं लागलें. कारण कधीं सोनपतपानपतची लढाई झाली, आणि कोणीं थोरल्या बाजीरावास पाहिलें ! पण तें कांहीं नाहीं, हा आपला टीचभर पोर 'तो देखणा, शूर, शहाणा होता' म्हणून त्याच्या खाणाखुणा देखील सांगतो असें मीं मोरोबाशीं म्हटलें, त्यावर त्यानें उत्तर

दिलें, 'अप्पा, यांत कांहीं आश्चर्य नाहीं. शाळेंतून या साऱ्या गोष्टी आतां शिकवूं लागले आहेत. पेशवे, सातारकर, दिल्लीचे बाद्-शहा हें सर्व आतां पोरांना पाठ येतें. माझा भाचा पांडू हा परवां सगळ्या पृथ्वीचेंच वर्णन माझ्यापुढें पाठ म्हणून दाखवीत होता. नऊ खंड पृथ्वीचीं त्यांनीं आतां चार खंडें केलीं आहेत, आणि काय म्हणे तांबडा समुद्र, पीत समुद्र, काळा समुद्र, मृत समुद्र, अट-लांटिक महासागर आणि माती आणि दगड; तें काय तें अप्पा आतां विचारूं नका.' इतकें म्हणतात तोंच पर्वतीचें शिखर दिसूं लागलें. तें पहातांच सर्व मुलांनीं, हो! हो! पुणें आलें! पुणें! असें बोलून गोंगाट माजविला, तेव्हां माझी दृष्टि तिकडे गेली. शहर खोलींत असल्यामुळें चांगलें दिसावें तसें दिसेना. देवळें, शिखरें, उंच माड्या, झाडेंझुडपें स्पष्ट दिसूं लागलीं. तेव्हां मी चटकन् मागल्या बाजूनें खालीं उतरलों. माझ्या मागोमाग मोरोबा-ही उतरले. तें पाहून पोरेंही आम्ही उतरतों म्हणूं लागलीं. त्यांस दटावून आम्हीं बसविलें. पुनः मार्गक्रमण सुरू झालें, आणि आम्ही रास्त्यांच्या पेठेंत गोविंदराव नेन्यांच्या घरीं उतरलों. त्यांची आमची ओळख पुष्कळ, घरोबाही विशेष आणि त्यांतून ते तर आमचे यजमान. त्यांस पूर्वीं आम्ही येणार असें पत्र घातलें होतेंच.

आम्ही गेलों त्या वेळीं १०-१२ घटका दिवस आला होता. त्या वेळीं गोविंदराव जेवावयास बसले होते. मीं म्हटलें, 'मोरोबा, आज हें लौकरसें जेवण चाललें आहे?' त्याला मोरोबांनीं उत्तर दिलें, 'दस घंट्याला कचेरी आहे ना?' यथाविधि स्नानसंध्या करून सावकाशपणें कचेरीस येतां यावें म्हणून वाटतें ही सोय सरकारनें केली आहे?' असें मीं म्हटलें, त्यास 'होय, होय तर?' एवढेंच म्हणून मोरोबा आंत स्वयंपाकघरांत गोविंदरावांस भेटण्याकरितां

गेले तों गोविंदरावही आंचवण्यासाठीं बाहेर आले. त्यांची आमची दृष्टादृष्ट झाली, नमस्कार चमत्कार घडले. मग लगेच ते आंत जाऊन 'अग, आज पाहुणे आले आहेत, आपले उपाध्येबुवा त्रिंबकभटजी वांईकर येणार म्हणून मी म्हणत होतों ते आले.' असें आपल्या बायकोशीं बोलले. त्या बिचारीलाही आम्ही आलों म्हणून आनंद झाल्यासारखें दिसलें. किंचित् हास्यमुद्रेनें, सलज्ज आंतूनच डोकावून तिनें पाहिलें, त्या वेळीं पाहुण्यांत बायका-मनुष्यें पाहतांच तर तिला विशेष आनंद झाला, 'या अशा आंत. लावतील पुरुष सामानसुमान. मुलं भुकेलीं असतील तर मी म्हणतें त्यांना जेऊं द्या आधीं मग आपण सारीं मागाहून बसूं. काय या तुमच्या मुलीचं नांव? आणि ही सून का? बरं आहे!' इत्यादि प्रकार चालले त्यांच्यांत. आम्हांस अमुक एक ठिकाणीं सामान उतरावा वगैरे सांगितलें आणि आपले बंधु गोपाळराव यांस, 'गोपाळा, पाहुण्यांचीं बरदास्त चांगली ठेव हो, सामानसुमान नीट व्यवस्थेशीर अडगवून जेवणखाण करा तोंवर मीही साहेबाला विचारून आज लौकरच येतों,' असें म्हणून गोविंदराव कचेरीस निघून गेले. आमचे ते यजमानच, तेव्हां घरोबा हा असावयाचाच. बायकामुलांची ओळख नव्हती पण बायकांतला स्नेह म्हणजे काय विचारावयाचा आहे? तो तेव्हांच जमून येतो; आणि पोरांस तर ओळख नको आणि देख नको. असो; त्या दिवशीं तर सर्व यथास्थित झालें, कशाची कांहीं अडचण पडली नाहीं. पांच एक घटका दिवस असतांना गोविंदराव घरीं आले. तेव्हां त्यांचीं आमचीं पुष्कळ बोलणीं झालीं, कां आलों, उद्देश कोणता, पुढें कसें काय करावयाचें इत्यादि सर्व खुलासे त्यांनीं कळवून घेतले. माझें करणें गोविंदरावांस फार पसंत पडलें. 'अप्पाभटजी तुम्ही ही योजना

तर बुवा फार नामी काढलीत. मुलगाही हुषार दिसतो. तेव्हां तो कांहीं नशीब काढल्यावांचून खचित राहणार नाहीं.' हें गोविंदरावांचें बोलणें ऐकून मीं म्हटलें, 'असें दिसतें तर खरें. वाटेनें शकुन तर कसे म्हणतां नामी झाले आहेत ! मोरोबा, गांवांत येतांच, सवत्स धेनु नाहीं का आपल्यापुढें आली?' यावर गोविंदराव फक्त एवढेंच बोलले, 'वा: ! असें झालें तर एकूण? मग तर ठीक आहे बुवा !' तो शनवारचा दिवस, तेव्हां रात्रौ मला तर जेवावयाचें नव्हतें. गोविंदरावांस दुसरे दिवशीं सुटी होती, तेव्हां बिऱ्हाडाची वगैरे सोय उद्यांच स्वतंत्र करावी असें मीं म्हटलें. त्याला 'कां, इतकी गडबड कां? येथें काय कमी आहे' असें गोविंदरावांनीं उत्तर दिलें. मीं म्हटलें, 'चार-आठ दिवसांची गोष्ट नाहीं, मग उगीच उशीर कां?' हीं असलीं पवित्र्यादाखल भाषणें झाल्यावर दुसऱ्या दिवशीं बिऱ्हाड निराळें करण्याचें मीं नक्की ठरविलें. कारण अशा कामीं ज्याचा त्यानें विचार केला पाहिजे. आपणाकडेच (आपण एकटेच?) असतों तर गोष्ट निराळी होती. पाठीमागें एवढें लटांबर घेऊन पाहुणचार घेत बसणें म्हणजे अपमानकारक गोष्टींचा आपल्याभोंवतीं आपणच गराडा घालून घेणें होय. तेव्हां मीं केला तोच विचार ठीक होता. दुसरे दिवशीं त्याच आळींत एक सोइस्कर घर पाहून घेतलें; आणि तेथें सगळा संसार पाठविला. भाड्याचें घर घेतल्यावर स्वत:च्या घराची किंमत काय असते, याचा फारच सुरेख अनुभव आम्हांला येऊं लागला. स्वग्राम, स्वजन इत्यादिकांत स्वत्व कसें असतें हें आम्हां सर्वांस आतां उदाहरणश: शिकण्याची ही शाळाच म्हटल्यास हरकत नाहीं.

घर वगैरे थाटतांच, मुलांस शाळेंत घालण्याची तजवीज आमच्या गोविंदरावांनीं फारच सुरेख केली. नादार मुलगा शिकावयास घेऊं

असें पाठशाळेवरील साहेबानें सांगितलें; आणि पुढें अभ्यास चांगला करून नंबर वर ठेवील, तर पुस्तकां-कागदांच्या खर्चाकरितां लहानसा पगारहि मिळेल असें गोविंदराव बोलले. मुलगा शाळेंत जाऊं लागला; तेथें तो साहेबांकडे शिवे. विटाळ वगैरे होतो इत्यादि शंका मनांत येत. पण महदाशा डोळ्यांपुढें द्रव्यदर्पण दाखवी तें त्या सर्व शंका आपणच खोडून काढीत असे. कसेंहि होवो आणि कांहींही घडो, मुलाला चार अक्षरें येऊन तो मिळवता झाला म्हणजे पुरे असें आम्हांस वाटे, आणि तसें घडेतोंपर्यंत मीं तर निश्चय केला होता कीं, तिकडे कशाकडे देखील पहावयाचें नाहीं. माझ्या स्त्रीनें रोज एकादी कागाळी मोठ्या कौतुकानें मजपाशीं आणावी. 'पाहिलं? बाळ्या घरीं पिसं घेऊन बसतो. जळ्ळीं मेलीं कसलीं पिसं कोण जाणे! या इंग्रजी शिकण्यांत पिसं तीं कशाला? घडीघडीला बोटाला थुंकी लावून जळ्ळीं तीं पोथीचीं पानं सारीं उष्टीं करतो. कातड्याच्या पुठ्याची पोथी घेऊन बसतो; काल संध्या केली नाहीं; परवां सूत तुडवून जेवायला बसला; सकाळीं उठून गोमांस-गोमांस—इश् जळ्ळं ग बाई तें—म्हणून घोकतो. दारूच म्हण, दगडच म्हण, असलं कसलं हें मेलं शिक्षण? देवाचं नांव नाहीं न् कांहीं नाहीं. परवां रात्रीं दिवाभीताचंच नांव घेऊन मेला घोकत बसला होता', अशा दररोज तिनें किती तरी कागाळ्या सांगाव्या. आणि त्या दुसऱ्याच्या असत्या किंवा त्यापासून कांहीं पैसे मिळविण्याचें साधन होत नाहीं असें जर मला कळतें तर मींच केवढा आकांत केला असता! पण येथें काय दामाजीपंतांच्या नुसत्या आशेचा प्रभाव! असो. या गोष्टी देऊं सोडून. क्लेशमय संसारांत घडी दोन घडीच अत्यल्प सुख होतें तरी त्यासाठीं मोठ-मोठे मी मी म्हणविणारे देखील घुटमळत गुरफटले जातात; तेव्हां या

एवढ्या शुष्क बाबीकरितां पुढील मनोराज्यांतली भली दांडगी इमारत हस्तगत व्हावी म्हणून तिकडे कानाडोळा न करतां नाहक त्या लाभास मुकणें मला तरी निदान बरें वाटेना. म्हणजे काय तर मुकाट्यानें डोळ्यांवर कातडें ओढलें आणि पुढील आशेवर स्वस्थ बसलों. ह्या सर्व बाह्योपाधी, प्रापंचिक त्रास, अन्नाची काळजी, पुढल्या तजविजी, पोराबाळांची तर्तूद वगैरे लचांडें, वांई सोडून पुण्यास आलों म्हणून लवमात्र कमी झालीं नाहींत, उलट जास्तच. 'दुरून डोंगर साजरे, हें मात्र अगदीं खरें ! वांईत असतां मला वाटे काय कीं, पुण्यास गेलों म्हणजे ह्या साऱ्या दगदगी आपोआप जातील; तेथें चारदोन पैसे जास्त मिळतील आणि डोक्यावरलें संसाराचें ओझें अंमळ हलकें होईल, हें माझें मनांतलें राज्य. मी पुण्यास आल्यानंतर कांहीं दिवसांनीं चातुर्मास सुरू झाला. वांईतला प्रकार तेथें नाहीं. नवीनपणामुळें जरा मानप्रतिष्ठा वाढते हें मात्र खरें. रोजचीं आमंत्रणें आणि त्या दक्षिणा वगैरे पाहून मला वाटलें काय कीं बरें झालें आपण पुण्यास आलों तें. एखाद दुसरें पारायण केलें तर चारदोनशें अलबत्यागलबत्यास मिळतात, तेव्हां मला कांहीं तरी जास्त मिळतील असें वाटलें, आणि तसा प्रत्यक्ष अनुभवही आला. उत्पन्न वाढतें म्हणून आनंद मानावा तर इकडे खर्चेही वाढूं लागला. लंकेंत सोन्याच्या विटा मिळतात, एक हजामत केली कीं एक वीट, तेव्हां आपण तिकडेच जावें म्हणून निघालेल्या नापिताची जशी अखेरीस फटफजिती झाली तशीच माझीही झाली म्हणण्यास हरकत नाहीं ! प्राप्तीच्या मानानें खर्चेही वाढला. वाढला तर वाढेना का बिचारा ? मनाला तरी स्वस्थपणा असावयाचा होता, पण नाहीं; आणि तो असणार तरी कसा ? तिनें एखादा जिन्नस घरीं नाहीं म्हटलें, आणि तो आणावयाचा, म्हणजे पैसा

खर्च केल्याशिवाय गत नाहीं. ती म्हणे, 'हें मेलें काय? शेण देखील विकत घ्यायचें, ही कुठली रीत बाई'! भाजी विकत, शेण विकत, सर्पण विकत, दूध विकत, फुलें विकत, घर भाड्याचें असें यच्चयावत् सर्व कांहीं पैशावर, त्यानें मी फार फार जिकीरीस आलों. कारण पैसा. पैसा पुरेल तरी कोठवर? पैशाशीं बसावयाचें आणि पैशाशीं उठावयाचें. तरी बरें. पाहुण्याराहुण्यांनीं नाहीं आपला मोर्चा मजकडे फिरविला. वांईत पैसे मिळवण्याची पंचाईत आणि येथें पैसा पुरविण्याची पंचाईत मिळून दोहोंची बेरीज सारखीच! आणि पुण्यास एक दोन काळज्या जास्त. आम्ही वांईत होतों तेव्हां विलासी म्हणा, श्रीमंती म्हणा, मौल्यवान् निरुपयोगी पदार्थ फारसे पाहण्यांत येत नसत; पण तेंच पुण्यास आल्यानंतर काय होऊं लागलें; तर विलासी व श्रीमंती पदार्थ सर्वांच्या नजरेखालून जाऊं लागले; त्यामुळें ते घ्यावें, ते आपल्याला असावे, अशी त्यांची साहजिक त्यांस इच्छा होऊं लागली. मुलानें घरीं यावें आणि माझ्यापाशीं नाहीं तर तिच्यापाशीं 'आई, मला एक मेज पाहिजे. जळले हे तुमचे भिकार दिवे आम्हांस नकोत, चिमणीच्या दिव्याचा उजेड कसा चक्क पडतो. अंगांतल्या ह्या भिकार बंड्या पाहून पोरें हंसतात, म्हणून मला कोट व ज्याकीट पाहिजे. बूट, विजार असली म्हणजे शाळेंत जाण्याला कसें सडसडीत असतें' इत्यादि टुमणें त्याचें असावयाचें; आणि असलें पदार्थ आपला लेक मागतो याचेंच तिला कौतुक वाटून किंवा त्याच्या इच्छा पुरवाव्या म्हणून कीं काय न कळे, तिनें माझ्या कपाळाशीं 'द्यायचें ना मग बाळ्याला तें घेऊन?' असें म्हणावें. तिला स्वतःला आपलीं लुगडीं जड दणगट वाटत; शेजाऱ्यापाजाऱ्यांचीं पाहून त्यांच्यासारखीं आपण घ्यावीं अशी तिला इच्छा होई. त्यामुळें

होई काय, तर स्वत: तिनें स्पष्ट सांगावयाचें नाहीं, पण दुसऱ्यांनीं कोणीं कांहीं घेतलें म्हणजे तिनें तें मागून आणून मला दाखवावें, व याची किंमत अगदीं थोडी आहे, इत्यादि स्तुति करावी म्हणजे अंतस्थ मतलब फक्त एवढाच, कीं मीं तसलें तिला घेऊन द्यावें. लहान मुलांचीही बहुतेक तीच अवस्था. एखादें खेळणें पाहिलें कीं तें त्यांना हवें असेच. शिवाय तें मागावयाचें म्हणजे रडें, हट्ट वगैरे इलाजांनीं. मुलगी माहेरवाशीण; तिच्या तर हौशी पुरविल्या पाहिजेतच.नाहीं म्हणावयास सुनेचें तेवढें हट्ट किंवा कांहीं एक नव्हतें. चुकलेल्या जनावरासारखी ती सदा बिचारी कावरीबावरी दिसे. पण आम्हीं सर्वांनीं तिला खरोखर अतिशयच ममतेनें वागवावें. यामुळें लौकरच ती 'माणसाळली' म्हणण्यास हरकत नाहीं. पोरापासून थोरापर्यंत रोज सर्वांना कांहीं हवें असावयाचें; पण तें सर्व म्यां पुरवावें कसें हा विचार त्यांच्या स्वप्नांतही नसे. विलासी पदार्थांचें अज्ञान हें वांईस माझ्या फार पथ्यावर पडे; पण येथें तें कांहीं नाहीं. मला केव्हां केव्हां वाटे, हीं बायकापोरें माझ्या पाठीमागें इतका तगादा प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष लावतात, आणि त्यांस जर दररोज नन्नाचा पाढा मीं वाचला तर न जाणों, कदाचित् असंतोष आणि अप्रीति कुटुंबांत उद्भवेल कीं काय ? आणि खरेंच आहे; संसार म्हणजे काय? शरीराला जीव, तसा संसाराला पैसा! पैसा नाहीं तर बायको नवऱ्याला विचारावयाची नाहीं, मुलें बापाला मानावयाचीं नाहींत, शेजारी ढुंकून पहावयाचे नाहींत; इत्यादि गोष्टी सर्वांच्या अनुभवांतल्या! पैसा मिळविण्याकरितां तर रात्रंदिवस वतवत करावयाची, आणि अखेरीस धन दुसऱ्याचीच, अशा शेंकडों गोष्टी मनुष्याला वैताग उत्पन्न करणाऱ्या आहेत,

त्यांचा आश्रय करावा म्हणजे झालें, दुप्पट-तिप्पट त्रास! बरें, पैसा मिळविणाऱ्यांना ज्या अडचणी असतात, तो मिळवितांना जो त्रास पडतो, किंवा त्याचा विनियोग करण्यांत बिचाऱ्यांची जी त्रेधा उडते, त्यांचा एकलक्षांश अनुभव जरी या परावलंबी वर्गास असता तरी पुष्कळ होतें. अशा रीतीनें काळजी सुरू झाली कीं नंतर मग वेदान्त सुचावा, आणि तो सुचूं लागला म्हणजे वैताग, संसाराचा कंटाळा वगैरे येऊन जीवित दुःखमय व क्लेशमय वाटावें आणि पश्चात्ताप सुरू व्हावा, असें हें रहाटगाडगें चालावयाचें. पण आशा ही एक कृत्या सर्वांच्या मागें लागली आहे कीं नाहीं? ती सर्वांस गचांड्या देऊन बाहेर काढते. उद्यां अमुक होईल, परवां असें घडेल, तेरवां तें मिळेल, अशा भाकडकथांचें पुराण तिनें आपल्या मनास सांगितलें कीं, पुनः आम्ही झालों ताजेतवाने! वेदान्त, वैताग, वैराग्य चट सारें जातें कोणीकडल्या कोणीकडे पळून, आणि मग आहेच आपला 'पुनरपि जननं पुनरपि मरणम्' हा क्रम.

म्हणजे सारांश काय, माझ्या मनाला स्वस्थता नाहीं. रात्रंदिवस काळजी, खर्चाची अडचण, नाना तऱ्हेच्या संकटांची भीति, परक्या ठिकाणच्या वस्तीमुळें आजदिनपर्यंत माहीत नसलेल्या अडचणींचा यथेच्छ अनुभव, मुलांच्या अभ्यासाची तर्तूद अखेरपर्यंत कशी निभावते याचा विचार, धाकट्या मुलीच्या लग्नाची विवंचना, अशा एक का दोन म्हणून गोष्टी सांगूं? मनाची काळजी आणि कुटुंबांतलीं संकटें घटकाभर बसून एकाद्या स्नेह्यापाशीं निवेदन केलीं म्हणजे थोडासा विसांवा मिळतो, थोडेंसें मनोरंजन होतें. तो स्नेही हिंमत देतो. दुसऱ्यांचीं संकटें सांगून तो आपलीं त्यांच्यापुढें कांहींच नाहींत असें दाखविण्याचा यत्न करतो. पण तें देखील सुख मला येथें नाहींसें

झालें म्हणावयास हरकत नाहीं. जिव्हाळ्याचा स्नेही म्हणजे दाट परिचयाचा काय तो एक मोरोबा. पुण्यास आल्यानंतर तो आपल्या यजमानांच्या घरीं राहिला. त्याला स्वतःला पोर ना बाळ. यजमानांच्या घरीं चार कामें करावीं आणि आनंदानें त्यांच्या घरीं रहावें हा त्याचा संसार. त्यामुळें त्याला मजकडे फारसें येण्यास फावत नसे. आणि फावलेंच तर त्याच्या यजमानाची स्तुति, त्याचें वैभव, त्याचा स्वभाव यांचीच त्यानें आमच्या घरीं चर्चा करावयाची. त्याचें खाणें अमुक, श्रीमंती असली, स्वभाव असला. अशा गोष्टींनीं होई काय तर आमचा संसार, आमचें जिणें, आमची स्थिति हीं भिकारडीं वाटावीं. त्यांच्यासारखें असावें, वागावें आणि करावें ही इच्छा उत्पन्न व्हावी. एकंदरींत पुनः मनाला अस्वस्थता. मुला-बरोबर त्याचे सोबती केव्हां केव्हां घरीं येत; · त्यांचा पोषाख-पेहेराव पाहून आम्हांला व खुद्द मुलालाही वाटावें कीं, तसा पोषाख असावा खरा. पण आणावा कोठून? श्रीमंताच्या एखाद्दुसऱ्या घराची ओळख किंवा माहिती झाली म्हणजे वाटावें आमच्या बगीला तें स्थळ मिळेल तर बरें होईल. ती कोणा शेजाऱ्यापाजाऱ्यां-च्या घरीं कांहीं कामानिमित्त गेली म्हणजे एखाद्दुसऱ्या पदार्थाचा नवा अभिलाष घेऊन परत येई. मिळून जिकडे तिकडे आशा आणि हव्यास पाठीमागें लागलेले, तृप्ति म्हणून नाहीं; आणि तृप्ति नसली व हव्यास असला म्हणजे मनाची स्थिति काय विचारावयाची आहे? वास्तविक पाहतां श्रीमंती आणि गरिबी यांतील भेद फक्त काय तो मिजाशींत असावयाचा. गरीबालाहि गरजा असतात तशा श्रीमंताला-ही असतात. गरीबाला क्षुधानिवारणार्थ अन्न, शीतनिवारणार्थ वस्त्र पाहिजे. त्याचप्रमाणें श्रीमंतालाहि हवें. गरीबाला मीठभाकरीनें गरज भागवितां येते ती श्रीमंताला साखरतुपानें. त्याला साधें

घडी-धोतर चालतें, तर त्याला उंची, मऊ कपड्यांशिवाय चैन पडत नाहीं, इत्यादि गोष्टी माझ्या मनांत येत, व मी पोरांबाळांत वगैरे सांगत असें पण त्याचा उपयोग काय आणि किती वेळ? राग धरूं नये, लोभ सोडावा, मोहाशीं ओळख नसावी, गर्वाची जान-पछान नको इत्यादि सर्वसंमत व सदा असाध्य गोष्टींचें नित्य प्रातः-स्मरण केलें म्हणून ऐन वेळीं त्याचा कितीसा उपयोग होतो? तशांतलाच हा प्रकार. तृप्तींत सुख आहे, ती ज्याला आहे त्याच्यासारखा भाग्यवान् कोणी नाहीं, तोच खरा श्रीमान्. असल्या शकडों गोष्टी मला स्वतःला माहीत आहेत. त्या आज नाहीं उद्यां, उद्यां नाहीं परवां, परवां नाहीं तेरवां, केव्हां ना केव्हां तरी मनांत ठसतील, आणि तसेंच आचरण घडेल ही माझी आशा आतां अगदीं व्यर्थ झाली. बायकोचे, मुलांचे आणि स्वतः माझे असे तिजोरी हव्यास पाठीमागें लागल्यावर फक्त एकट्याच्या विचारांचें कितीसें प्राबल्य राहणार आहे? तेव्हां अशा तऱ्हेनें मी मोठ्या फिकीरींत पडलों व जिवाला माझ्या चैन पडेना. मन सदासर्वदा अस्वस्थ होऊं लागलें, व त्यामुळें तर संसाराचा परा-काष्ठेचा तिट्कारा आला. खरोखर गरीबीसारखें अन्य दुर्भाग्य नाहीं. पैसा जगांत फार चमत्कार करतो. जवान मर्द पुरुष असला तरी पैशापुढें दीन गाय होतो. सारांश; संसारयंत्राचें मुख्य मळसूत्र पैसा. सुखाचा जनिता आणि दुःखाची माता पैसा. तसेंच मानापमानाचें मुख्य बीज, अब्रू-इभ्रतीचें आधिदैवत, इष्टमित्रांचें प्रेम, गणगोताचा लळा, आणखी प्रत्यक्ष ईश्वराची कृपा देखील या पैशांत! आणि त्यानें तर मला अगदीं दुस्मान लेखिलें म्हटल्यास हरकत नाहीं. तेव्हां मला सुख तरी कोठून आणि कसें मिळावें? या विवंचनेमुळें मी अगदीं बेजार झालों. नको हा जन्म आणि

नको हा संसार असें झालें. वांईहून पुण्यास येण्याला निघालों तेव्हां माझी समजूत काय, कीं हा त्रास पुण्याला नसेल; तेथें चार पैसे मिळतील, आणि पाठीमागची ददात तरी चार दिवस चुकेल; पण नाहीं. 'कुठें जाशील दैवा, तर तुझ्यापुढें उभा' अशी गत झाली. ईश्वरनामस्मरण करीत कांहीं काळ सुखानें जाईल म्हणावें तर तेंही नाहीं. सकाळीं दहा घटका दिवसास मुलाला शिकावयाला जाण्याची गडबड. पूजानैवेद्य तरी करून दिला पाहिजे? त्याला सांगावें तर त्याला फुरसत कशी व्हावी? रात्रंदिवस घोकण्याखालीं बिचारा जेरीस येई. तेव्हां काय होईल ती आपल्या एकट्याच्या जिवाचीच त्रेधा होवो असा विचार केल्याशिवाय चालत नसे. असा मी सारखा गांजून गेलों. गांजून गेलों म्हणून करावयाचें काय? लौकिक, माया, मनलज्ज्जा आणि या सर्वांवर आशा आणि लोभ यांनीं माझ्या मनास पुन:पुन: घुटमळण्यास लावावें. माझ्या काळजीची किंवा अशा या कुतरओढीची माझ्या स्त्रीला आतां कांहींच क्षिति वाटेनाशी झाली. वांईत तिला थोडी तरी माझ्या प्रपंचाची काळजी होती, पण पुण्यास आल्यावर कांहीं नाहीं. म्हणजे ती घरीं नासधूस करीत असे असें नाहीं. पण तिचा अवाढव्य हव्यास, दुसऱ्यासारखें आपण कां वागूं नये हा हेका, आतां आपल्या मुलांबाळांच्या तब्येती संभाळण्यांत किती अर्थ आहे याची मनसोक्त कल्पना, इत्यादिकांमुळें ती खरोखर भांबावून गेली असेंच मला वाटे. मुलांना माझ्या स्थितीची कल्पना नाहीं, तिला माझ्या स्थितीकडे पाहण्यास फुरसत किंवा गरज नाहीं, आणि ईश्वराचें मजकडे लक्ष जाईना, व यजमान, मित्र यांच्यांत पोकळ-पणा येत चालला; तेव्हां आतां पुढें काय गत होईल म्हणून मी पुष्कळ वेळां मोठ्या विचारांत पडे. पण उपयोग कांहीं नाहीं.

ती घडी गेली कीं, पुनः आशा हात धुऊन पाठीस लागे. हा सारा पसारा अगदीं खरा असें वाटे, आणि त्याच्याकरितां भारवाहका-सारखे श्रम करण्याखेरीज जणों अन्य गत्यंतरच नाहीं अशी समजूत होई. अशा प्रकारची कालक्रमणा मी पुण्यास आल्यापासून चालली, त्यामुळें मला वाटे कीं, मी मोठा पापी म्हणून माझी अशी अवस्था झाली. गेल्या जन्मीं कांहीं पातक केलें त्यांचीं फळें मी आतां दोन्ही हातांनीं गोळा करीत आहे; तेव्हां आतां तरी कांहीं साधन करावें, अशा घोटाळ्यांत इतःपर तरी पडूं नये, ईश्वराचें पूजन, भजन, स्मरण यांत काळ जाईल तर तें कांहीं वायां जाणार नाहीं; झाली ती गोष्ट झाली; पण पुढें तरी हे हाल नकोत; आईबापांनीं चार अक्षरें शिकविलीं आहेत त्यांचा तरी उपयोग निरपेक्ष करून घ्यावा. पण या विचारांना तरी कोठें गचांडी मिळल्याशिवाय राहावयाची आहे ? स्वार्थ साधून परमार्थ, प्रपंच साधून ईश्वर-प्राप्ति इत्यादि विचार वारंवार आहेतच पुढें दत्त म्हणून उभे. या कचाट्यांत मी सांपडलों आहे त्यांतून केव्हां पार पडेन तो खरा असें मला वाटलें. एकंदरींत 'कोंकणांतून देशावर गेला तरी पळसाला पानें तीनच' ही म्हण अक्षरशः खरी. एक दिलें तर दुसरें नाहीं, दुसरें दिलें तर तिसरें नाहीं, अशी ईश्वराची प्रतिज्ञाच, तेथें काय करणार ? असें म्हणून समाधान मानून घ्यावें झालें, हाच मीं शेवटचा उपाय योजिला.

### प्रश्न व सूचना

( १ ) या उताऱ्यांतील विनोदप्रसंग हुडकून काढून त्यांतील विनोद केवळ शाब्दिक कोटीवर किंवा अतिशयोक्तीवर अवलंबून आहे कीं काय हें पहा.

( २ ) पुण्यास आल्यावर वांईकर भटजींना कोणत्या अडचणी व कोणत्या चिंता उत्पन्न झाल्या ?

(३) एकानें म्हटलें आहे कीं " वांईकर भटजीला स्वतःच्याच मनाचें उत्तम निरीक्षण व परीक्षण करतां येतें असें नव्हे तर इतरांच्या मनाचीहि त्याला पूर्ण जाणीव होती, व हेंच त्याच्या दुःखाचें व सुखाचें कारण." वरील विधान कितपत यथार्थ आहे तें उदाहरणें देऊन सांगा.

(४) [अ] पट्टीचा ब्राह्मण, पवित्र्यादाखल बोलणीं, दामाजीपंत, कुतर-ओढ यांचें स्पष्टीकरण करा.

[आ] व्युत्पत्ति सांगाः—दृष्टादृष्ट, यच्चयावत्, पंचाईत.

[इ] म्हणींचा व अवतरणांचा उपयोग करून धनुर्धारी यांनीं भाषा कशी सजविली आहे तें सांगा.

(५) 'आशा ही एक सर्वांच्या मागें लागलेली कृत्या आहे' यावर एक लहानसा निबंध लिहा. आशा ही कठोर 'कृत्या' नसून ती एक सदय देवता आहे असेंहि म्हणतां येणार नाहीं काय?

# विभाग ३



## अखेर

[ पुढील करुणरसपूर्ण उतारा 'पण लक्षांत कोण घेतो, या प्रसिद्ध कादंबरींतून घेतला आहे. त्यांत हरिभाऊंची यथार्थ व भावनोद्दीपक वर्णनशक्ति दिसून येते. तसेंच त्यांचें सहृदयत्व व मनाचा कोमलपणा हेहि गुण या उताऱ्यांत उत्तम रीतीनें दिसून येतात. ]

"काय होतं आहे? कुठें दुखतं आहे?" मीं घाबरून उठत उठत विचारलें. त्याबरोबर किंचित् हंसून, "अरे पण इतकं घाबरायला काय झालं? एवढंसं दुखतं म्हटलं तर इतकी घाबरतेस, अन् मग एखादं मोठं दुखणं झालं तर काय करशील!"

"नको ग बाई मोठं दुखणं यायला अन् असलं बोलूंय पण नये."



ह. ना. आपटे.

"कां बरं? बोलण्यानं काय केलं आहे? कांहीं बोलण्यानं येतं का काय लागलीच? अन् नाहीं बोललं, म्हणून तरी रहातं का काय आल्यावांचून?"

"पण हें काय असं बोलायचं?" मीं किंचित् त्रासून म्हटलें. "मला आधीं दुखतं आहे कुठें तें सांगावयाचं पाहूं?"

"या इथें दुखतं आहे, काय उसण भरली आहे कीं काय झालं आहे कांहीं समजत नाहीं. उसण भरली म्हणावं तर बरगडींत

दुखतंयसं वाटत नाहीं. इथं या........" पुढचा शब्द पुरता निघतो न निघतो तोंच " तेलबिल चोळून रोडच्यानं शेकूं? का फलाणीच्या पिळयानं ऊन पाण्यानं शेकूं" असें मीं विचारलें.

" वेडी तर नाहींस ना? इतक्या रात्रीं कशाला आतां जायला पाहिजे तिकडे; आणखी साऱ्यांना कळून कांहीं बोआ दुखणं असं मोठं आहे? तुम्ही बायका कीं नाहीं अतिशय घाबऱ्या. एवढंसं कांहीं झालं कीं लागलीच त्याचं हें करून सोडायचं. उगीच आपली मला झोंप येईना, म्हणून तुला उठवलं...."

"पण त्याचा वेळींच बंदोबस्त केला तर कांहीं वाईट आहे का?"

" वेडगळ कुठली! अग, बंदोबस्त कसला करतेस? आतां घटकाभऱ्यानं कांहीं त्याचं व्हायचं नाहीं," यावर मीं कांहींच बोललें नाहीं. थोडा वेळ तसाच न बोलतां गेला. परंतु तितक्या वेळांत तीन वेळां या कुशीवरून त्या कुशीवर, त्या कुशीवरून या कुशीवर व्हायचें, तें पाहून माझ्यानें राहवेनाच. मी पटकन् उठलें आणखी "हें असं कांहीं उपयोगाचं नाहीं. कुठें दुखतं आहे तें मला सांगायचं. मघांपासून मीं तीनदां पाहिलं; कितीदां इकडून तिकडे व्हायचं तें. कुठं दुखतं पाहूं?" असें म्हटलें.

त्याबरोबर किंचित् त्रासल्यासारखें करून म्हणावयाचें, " काय करूं? कांहीं चैन पडत नाहीं. दुखतंय तर एवढंसंसं, पण तेवढ्यानंच चैन पडत नाहींसं झालं आहे."

"उसण जर भरली असली तर होईल तसं. मी आणतें तेल अं." इतकें म्हणून मी उठलेंच, आणखी सैंपाकघरांत जाऊन चुलींत विस्तव होता त्यांत लांकडें घालून थोडीशी फुंकूं लागलें. विस्तव पेटतो आहे तों एक विटकरीचा टोला आंत घातला, पाणी

थोडेंसें वर ठेवलें, आणखी तेलाची बाटली घेऊन पुन्हा जों परत जातें तों "मला अतिशय फिरल्यासारखं होतं...." असे कांहीं शब्द उच्चारलेले माझ्या कानीं पडले; आणखी एकदम ओकल्या-सारखें केलें तों ओकारी तांबडीलाल, आणखी ओकण्यासाठीं उठून बसायचें होतें तें एकदम खालीं पडायचें !

तें पहाण्याबरोबर माझ्या सर्वांगाचा थरकांप उडाला आणखी हातपाय लटलटां कांपायला लागून हातांतील दिवली पटकन् खालीं पडून विझली, व तोंडानें 'दादा'! अशी एकदम आरोळी गेली. इतक्यांत कांहीं कण्हत उच्चारलेले असे पुढील शब्द माझ्या कानीं पडले:– "काय हें असं वेड्यासारखं" पण कसचें काय आणि कसचें काय? माझ्या तोंडचें पाणी पळून काळीज चर्र झालें होतें. तथापि पहिला वेग जाण्याबरोबर मी भानावर आल्यासारखी झालें; आणखी जवळ जाऊन कांपऱ्या आवाजानेंच म्हटलें, "हें काय झालं हें? दादाला हांका मारूं का? नानासाहेबांना बोलावूं का?" परंतु हातानें नको अशी खूण करून 'ऊं हूं!' एवढेंच म्हणायचें. मला कुठला धीर! अशी रक्ताची गुळणी येऊन कांहींचें कांहींच झालेलें मीं यापूर्वी दोघांतिघांचें ऐकलें होतें; त्या गोष्टी माझ्या डोळ्यांसमोर एकदम उभ्या राहिल्या आणि मला दुसरें तिसरें कांहींच सुचेना. मी एकदम उठलें, व तडक जाऊन दादाला बोलावून आणलें. तो गाढ झोंपेंत होता. माझें सांगणें ऐकल्या-बरोबर त्याच्या देखील पोटांत धस्स झालें; परंतु मला आपला वरवर म्हणतो, "मग, अशी घाबरतेस काय ग? असं होतं कोणाकोणाला कधीं कधीं." परंतु मला कसला धीर? त्यानें येऊन पाहिलें आणि जवळ जाऊन "काय झालं हो एकाएकीं?" म्हणून विचारलें. परंतु नीटसें उत्तर आलें नाहीं. त्याबरोबर

"दम धरा; मीं नानासाहेबांना आणि विष्णुपंतांना बोलावून आणतों" असें म्हणून त्यानें त्या दोघांस उठवून आणलें. त्यांनीं तो प्रकार पहाण्याबरोबर तोंडानें "अं: त्यांत काय, घाबरण्याजोगं असं कांहीं नाहीं. रघुनाथराव, जरासे पलीकडे व्हा पाहूं; तो पलंगपोस टाका वहिनी काढून पाहूं," असें म्हटलें; परंतु विष्णुपंत, "पण आपल्याकडून आपली सावधगिरी राखावी तें चांगलं." असें म्हणत बाहेर गेले. मला अगदीं वेडयासारखें झालें. आणखी मी आपली इकडे तिकडे हिंडूं लागलें. तिकडे पहावें, नानासाहेबांकडे पहावें, "हें काय हो असं एकाएकीं झालं!" असें म्हणावें; आणखी त्यांनीं "हें काय असं करतां वहिनी?" असें म्हटलें म्हणजे "काय करूं हो तर मग? मला कीं नाहीं कसंसंच झालं आहे," असें म्हणावें; त्यांना मदत करावयाची ती एकीकडेच राहिली म्हटलें तरी चालेल. इतक्यांत माझ्या दोघी मैत्रिणीही उठून आल्या, आणखी त्यांनींही मला धीराच्या गोष्टी सांगितल्या व त्या पुढें होऊन त्यांनीं दादास व नानासाहेबांस मदत केली. मीं आपली यांच्या तोंडाकडे पहावें, त्यांच्या तोंडाकडे पहावें, "आतां आणखी नाहीं ना हो गुळणी यायची?" असें म्हणावें. त्यांनीं जरा समाधानाचें बोलणें काढलें म्हणजे बरें वाटावें. पुन्हा पांच मिनिटें झालीं; आणखी तिकडे इकडचे त्या कुशीवर झाले किंवा सुस्कारा टाकला म्हणजे पुन्हा गुळणी आली असें वाटून घाबरून जावें असें चाललेंच होतें. इतक्यांत दुर्गीही उठून आली. तिलासुद्धां मीं "कांहीं नाहीं ना ग व्हायचं?" असा प्रश्न केला. आतां जरा तिकडे डोळा लागलासें वाटलें. इतक्यांत पुन: उठायला जायचें. आणखी एकदां तोंडांतून एकदम रक्त आलें. आतां माझी स्थिति किती विलक्षण झाली! मी

एकदम रडायला लागलें. आणखी सासूबाईना तरी हांका मारा हो" म्हणून गयावया करूं लागलें. त्या म्हातारीला हें पाहिल्याबरोबर काय वाटेल आणखी काय नाहीं याचा विचारसुद्धां माझ्या मनांत आला नाहीं. कोणी तरी येईल मायेचें आणखी कांहीं तरी उपाय करील असें वाटून मी आपली जें जें माणूस त्या वेळीं नव्हतें त्या त्या माणसाला बोलावूं लागलें. सासूबाई खालीं गोपिकाकाकूंकडे निजत. त्यांना अजून या गोष्टीची कांहींच माहिती नव्हती. "जा ग सासूबाईना बोलाव" असें मीं दुर्गीला म्हटल्याबरोबर तिकडून हात वर करून नको म्हणून खूण करावयाची. मी जवळ जाऊन "हें आज असं काय होतं आहे?" असा रडत रडत प्रश्न केला. त्याबरोबर अतिशय खोल अशा आवाजानें "कांहीं नाहीं. तूं अशी रडूं नको," असें म्हटलें. परंतु मला कुठलें राहवायला! "अरे दादा, डाक्टरला तरी बोलाव रे. नानासाहेब स्वस्थ काय बसलांत?" असें म्हणून मी मोठमोठ्यानें ओरडूं लागलें, तेव्हां दादा म्हणाला, "यमूताई, अग तूं असं वेड्यासारखं काय करते आहेस! विष्णुपंत केव्हांच डाक्टरकडे गेले आहेत; इतक्यांत येतील त्यांना घेऊन. तूंच जर असं करायला लागलीस तर मग आम्हीं बाकीच्यांनीं धीर तरी कसा धरावा?" इतकें बोलतो आहे, तों तिकडून अंगाची आग झाल्यासारखी खूण करून वारा घालण्याला सांगितलें. मी लागलीच पंखा घेऊन वारा घालूं लागलें. मनांतल्या मनांत हजारों देवांना नवस करीत होतें. जोगेश्वरीला, तुळजापूरच्या भवानीला; कोल्हापूरच्या अंबाबाईला; एका देवीला म्हणजे कांहीं नवस केल्याखेरीज ठेवलें असेल असें नाहीं; परंतु माझें सारें चित्त आतां तिकडे होतें. मघांची ती दुसरा गुळणी आली त्याला बराच वेळ झाला; आतां गुळणी येत नाहीं

असें वाटलें, आणखी मी मोठ्या आशेनें ज्याच्या त्याच्याकडे पाहून "आतां नाहीं ना हो यायची गुळणी ? आतां लागेल ना हो झोंप ?" असें म्हणत होतें. इतक्यांत डाक्टरला घेऊन विष्णुपंत आले. हे डाक्टर आमच्या मंडळींत नेहमीं येणाऱ्यांपैकींच होते. त्यांनीं येण्याबरोबर तपासणी केली, आणखी "अंः त्यांत कांहीं नाहीं; आतां येवढें बरीक करा, कीं त्यांच्याभोंवतीं एक दोन माणसांच्यापेक्षां अधिक माणसं बिलकूल ठेवूं नका. यत्किंचित् गडबड देखील अशा स्थितींत उपयोगी नाहीं. गणपतराव, अगदीं सगळी मंडळी इथून जाऊं द्या." त्याबरोबर नानासाहेब आपणच आधीं उठले, विष्णुपंतांनीं आपल्या व नानांच्या बायकोला खूण केली. आणखी मंडळी मलाही चलण्याविषयीं आग्रह करूं लागली. परंतु मीं तेथून न हालण्याविषयीं हट्ट धरला.. माझे पाय तेथून कसे निघावे ? "इथें बसून तूं गडबड करतेस, रडतेस. तूं येथें बसूं नकोस. दुर्गाताई, इला तूं कसंही करून बाहेर घेऊन जा. मीं एकटा पुरे आहें इथें. आणखी पाहिजे तर विष्णुपंत आणखी यशोदाबाई रहातील, पण ही नको." असें दादानेंही म्हटलें. परंतु मी कांहीं केल्या इथून हालायची नाहीं असें सांगितलें; पण माझं कोणी चालूं देईना, लक्ष्मीबाईनीं आणखी दुर्गीनें मला बळेनें काढली. मी त्यांच्या पायां पडलें व "अग बायांनो, नका आमची ताडातोड करूं! कां असं करतां ? अहो, ही काळगुळणी कुठून हो आली ?" असें ओरडत ओरडत बाहेर आलें, तों बाहेर सासूबाई नुकत्याच काय गोंधळ आहे तें पाहण्यासाठीं वर आल्या होत्या. त्यांना पाहण्याबरोबर तर माझ्या दुःखाला पारावार नाहींसा होऊन "आतां तुम्ही तरी आंत जाऊन बसा हो जवळ. काय पहा आंत झालं आहे तें ! एकाएकीं काय हो हें झालं !"

असें म्हणून त्यांना एकदम घाबरवून टाकलें. त्या वेड्यासारख्या माझ्याकडे पाहूं लागल्या, लक्ष्मीबाईकडे पाहूं लागल्या. दुर्गीला "हें आहे तरी काय? ह्याला का कांहीं झालं?" असें विचारूं लागल्या. त्याबरोबर "अहो, हो, आपलं नशीब, काय ग बाई तरी ती गुळणी ! मी इकडे येऊन गेलें एवढीच.– दुर्गे जा ग, तूं तरी जाऊन पुनः गुळणी आली कीं काय तें पाहून ये. मला नाहीं जाऊं देत, तर तुम्हीं वरचेवर पाहून येऊन तरी मला सांगा. अग, अशा कशा निर्दय झालां अगदीं ?........" असें आणखी अशाच तऱ्हेनें मी काय वेड्यासारखें बोललें असेल आणखी काय नाहीं याचा नेमच नाहीं. एकसारखें माझें बरळणें चाललेंच होतें. इतक्यांत सासूबाई तिकडे गेल्या. त्यांना एकदां आंत नेलें; परंतु त्या माझ्यासारखा आक्रोश करूं लागल्या, तशी यशोदाबाईनीं आणखी गोपिकाकाकूंनींही अगदीं नाना तऱ्हा करून त्यांना बाहेर आणलें. डाक्टरानें सांगितलें, सगळ्यांनीं सांगितलें कीं, "तुम्ही अशा घाबरूं नका, दुखणं जरा चमत्कारिक आहे खरं; पण इतकं घाबरण्याजोगं नाहीं. मीं आतां औषध दिलं आहे, आणखी दोन तीन घटकांत सगळं यथास्थित होईल. त्यांतून मी आतां इथून आज हलत नाहीं. पण तुम्ही असा आक्रोश करूं नका. रघुनाथराव जसे तुमचे मुलगे तसे माझे भाऊ मी समजतों. वहिनी, काकू, तुम्ही अगदीं अगदीं काळजी करूं नका. जर वैद्यक्रियेंत कांहीं करामत असेल आमच्या, तर आम्ही त्यांना चार तासांच्या आंत खडखडीत करतों बघा." हें डाक्टराचें अतिशय धीर देणारें बोलणें ऐकून क्षणमात्र मला किती तरी धीर आला; परंतु असा धीर किती वेळ राहणार असायचा? थोडासा वेळ गेला नाहीं तोंच मी पुनः "जा ग, आणखी गुळणी आली आहे कीं काय पाहून ये. डाक्टर काय

म्हणताहेत पाहून ये," असें बडबडूं लागले. कोणी उठलें नाहीं तर आपणच धांवत दारापाशीं जावें म्हणून उठूं लागावें. इतक्या थरावर गोष्ट आली म्हणजे मग दोघींपैकीं एक कोणी तरी दाराशीं जाऊन येई, आणखी मला कांहीं तरी येऊन सांगे. सासूबाईंना गोपिकाकाकू पुनः खालीं घेऊन गेल्या. परंतु त्या फार वेळ तेथें बसल्या नाहींत. पुनः वर आल्या आणखी माझ्याजवळ येऊन, "मुली, काय ग हें आज आपल्या नशिबीं आलं आहे" असें म्हणून माझ्याप्रमाणेंच वेड्यासारख्या होऊन त्या नाना तऱ्हेचे नवस बोलूं लागल्या. अशा स्थितींत केव्हांच उजाडून गेलें तें आम्हांला समजलें नाहीं. आमची फारच निराशा होऊन आम्ही अगदीं गयांवया करतों आहोंत असें पाहिलें, म्हणजे एकदां कोणीं तरी जाऊन डाक्टरला आणावें, आणखी डाक्टराकडून आमचें समाधान करावें, असें चाललें होतें. इतक्यांत गोपाळमामंजींना तरी तार करावी असें माझ्या मनांत येऊन मीं धोंडूभावजींना सांगितलें. तेव्हां एकदां कशाला त्यांना उगीच आणखी घाबरवतां? असें तसें झालेंच; परंतु मला वेडीला असें वाटूं लागलें, कीं कोणी तरी नवें येऊन चांगलें औषध देईल. होती ही मंडळी काय कमी मायेची, आणखी कमी श्रम करणारी होती? पण नाहीं, बुडणाराला गवताची काडी सुद्धां मोठी आधारशी वाटते. माझा आणखी सासूबाईचाही आग्रहच पडल्यावर मग काय करतां? केली ताबडतोब तार. इकडे डाक्टरांच्या येरझारा चालल्याच होत्या. आंत काय चाललें होतें त्याच्या गोष्टी बरीक जशा आंतून येतील तसतशा आमच्या कानांवर येत, बाकी कांहीं नाहीं. दुपारचे बारा वाजले. तथापि, आम्हांला तिकडे न जाऊं देतां, फक्त केव्हां त्यांना झोंप लागली आहे, आतां किती वेळांत तरी गुळणी आली नाहीं, असे निरोप

येत; परंतु सगळ्या निरोप सांगणारांचे चेहरे अगदीं लबाडीचे असे मला दिसत. ते सांगतात हें अगदीं खोटें असें मला वाटून व सासूबाईनाही वाटून आम्ही दोघी आंत जाऊन बसण्यासाठीं फार आक्रोश करूं लागलों. आमचा आक्रोश जों जों जास्त होऊं लागला, तों तों ती मंडळीहीं आम्ही बाहेरच राहण्याविषयीं अतोनात आग्रह धरूं लागली. "आमची ताडातोड करून तुम्हांला काय मिळतें? कां उगीच मायलेंकरांची ताडातोड करतां?" असे शब्द देखील सासूबाईच्या तोंडून निघाले; परंतु कोणी तिकडे लक्ष दिलें नाहीं. दुपारीं दोन वाजण्याच्या सुमारास एक साहेब-डाक्टर येऊन गेला. त्याबरोबर तर माझें धाबें अतिशय दणाणून मीं तो गेल्याबरोबर तेथून आंत जाईनच असा निश्चय केला; परंतु तो कांहीं केल्या बाहेर येईना. तो जातो केव्हां आणखी मी आंत घुसेन केव्हां असें मला होऊन गेलें होतें; इतक्यांत तो जाण्याचें एकीकडे राहून त्यानें लिहिलेल्या दोन तीन चिठ्ठ्या घेऊन पहिले डाक्टर बरीक बाहेर आले. ते येण्याबरोबर मी त्यांना अतिशय केंविलवाणीनें विचारलें, "काय हो, डाक्टर काय म्हणतात?" "कांहीं नाहीं; म्हणतात कीं अगदीं स्वस्थपणा पाहिजे आहे. आतां बडबड अगदीं करूं देऊं नका कोणाला म्हणजे झालं. एवढंच म्हणतो आहे," असें म्हणून नानाजवळ त्या चिठ्ठ्या देऊन ते पुनः पटकन् खोलींत येऊन खोलीचें दार लावून बसले. मला त्या वेळीं काय वाटलें पण? तितक्या त्या ह्यांत आवेश येऊन दाराला धक्का मारून जावेंसें वाटलें. परंतु न जाणो त्यांचें म्हणणें जर खरें असलें तर आपण आपल्या हातानें कुऱ्हाडीचा घाव घालून घेतलासेंही होईल, असेंही मनांत येऊन मी तशीच सासू-बाईच्या जवळ चुळबुळ करीत बसलें. काय करणार! सासूबाई तर

आपली माळ घेऊन जपच करूं लागल्या. मला एकसारखें रडूं येत होतें, परंतु मी त्यांच्यासाठीं म्हणून, होतां होईल तों दाबीत होतें. मधून मधून आपल्याला तेथें मुळींच जाऊं देत नाहींत, म्हणून मंडळीस निर्दय म्हणून थोडाबहुत तिकडे जाण्याचा यत्नही करीत होतें. परंतु लक्ष्मीबाई आणखी दुर्गी या दोघीजणी कांहीं केल्या मला कांहीं हलूं देईनात. इतक्यांत आणखी एक साहेब व दोन आपलेच डाक्टर आले तेही आंत गेले. बराच वेळ आंत बसल्या-नंतर एक एक चालते झाले. त्यांनीं तिथें बसून काय केलें मला कांहींच समजेना. मीं केव्हांही विचारलें तरी कांहीं नाहीं, बरें आहे, इतक्यांतच सगळ्यांनीं मिळून नवीन औषध दिलें तें फार चांगलें आहे, ते आतां बरे होतील, तुम्ही अशा घाबरूं नका, तुम्ही घाबरलांत म्हणजे मग आमचा कांहीं उपाय चालत नाहीं असें तसें नाना रीतींनीं त्यांचें बोलणें चाललें. परंतु सुमारें चार साडेचार वाजतां मीं अगदीं निश्चय केला, कीं कांहीं होवो, जें काय व्हायचें असेल तें होईल, मी आतां जवळ जाऊन बसणार असें म्हणून उठलें, आणि आंत घुसलेंच. मग मागें पुढें पाहिलें नाहीं. हें काय ! हें काय ! करीत मंडळी दोन्ही बाजूला झाली. सर्वांचे चेहरे अगदीं काळेठिक्कर पडलेले होते. हीं पांघुरणें रक्तानें भिजलीं होतीं ! त्या राशीकडे पाहण्याबरोबर मीं एकदम दादाकडे वळून म्हटलें, दादा, तूं दिखील का रे इतका निष्ठुर झालास ? तूं दिखील माझ्यापासून हें सारें लपवून ठेवलंस ! परंतु त्यानें, यमू-ताई तूं इथें असतीस तर कांहीं अधिक केलं असतंस असं तुला वाटतं का ? इतकेच शब्द उच्चारले, आणि माझ्याचप्रमाणें रडकुंडें तोंड करून बाजूला सरला. मी आतां कोणीकडे न पाहतां, तडक

उशाशीं जाऊन बसलें. आतां ती स्थिति पाहून माझ्या डोळ्यांतलें अश्रू नाहींसे झाल्यासारखे झाले. रडूं म्हणून येईना. काय करावं कांहीं सुचेना. तीनतीनदां उरावर, कपाळावर हात ठेवावा, पण तिकडे टकमका पाहण्यापलीकडे कांहीं एक केलें नाहीं. हात उचलण्याची देखील शक्ति नव्हती; या कुशीचे त्या कुशीवर होण्यास ताकद नाहीं. इतकी स्थिति येईपर्यंत आपल्याला निर्दय-पणानें या साऱ्यांनीं दूर ठेवलं, याबद्दल मला काय वाटलं आणि काय नाहीं! असा विचार झाला नाहीं, कीं मी जवळ असतें तर कांहीं दुखणें कमी का केलें असतें! पण नाहीं, असतें तर ........काय झालें असतेंसें मला वाटलें, कांहींच सांगतां येत नाहीं. इकडून उठावें तिकडे बसावें. उशापासून उठावें पायथ्याशीं जावें. मध्येंच आपल्या हातांत हात घ्यावे, आणखी पांघरूण नीट सावरावें. एकदां कांहीं बोलल्याचा भास होऊन कान तोंडाशीं न्यावा असें एकसारखें चाललें होतें. मधेंच डाक्टराकडे वळून म्हटलें, "संपलीं का हो सारीं तुमचीं औषधें? मला तरी एक द्या चांगलंसं, म्हणजे बरोबरच........"

हे शब्द पुरते माझ्या तोंडून निघतात न निघतात, तों पुनः तें काळरक्त एकदम तोंडावाटे बाहेर आलें आणि तें आतां दृष्टीस पडल्याबरोबर माझ्या डोळ्यांला अंधारी येऊन मी धाडकन् पलीकडे पडले. किती वेळ झाला मला मुळींच ठाऊक नाहीं. मला तेथून उचलून कोणीं कुठें नेलें तेंही ठाऊक नाहीं. किती वेळ तरी मी मेल्याप्रमाणें पडलें होतें; परंतु इतकें माझें कोठलें पुण्य. मी टवळी कांहीं वेळानें पुनः सावध झालें. ऐन तिन्ही सांजची वेळ होती. मला आणून कोठेंसें निजविलें होतें व माझ्याजवळ दुर्गी आणखी लक्ष्मीबाई बसल्या होत्या. जागी झाल्याबरोबर मी पुनः चवताळून

उठून, अहो, मला का तुम्हीं इथें आणलंत! काय असा मीं तुमचा अपराध केला तर तुम्हीं माझा छळ चालवला आहे! अशा अर्थाचें कांहीं पुटपुटत— अर्थाचेंच म्हणायचें कारण त्या वेळीं मीं काय बोललें आणखी काय केलें याचें मला मुळीं स्मरणच कुठलें!— पुनः दांडगाई करून आंत गेलें तों सर्व मंडळी पहिल्याप्रमाणेंच बसली होती. सासूबाई कोठें दिसेनात. मी जवळ गेलें त्या-बरोबर माझ्या हातावर हात ठेवला, आणखी कांहीं बोलल्याप्रमाणें ओठ हालविलेसें मला वाटलें. मी "दादा, दादा" करून ओरडलें. दादा जवळ आला. दादाचा हात धरून माझ्याकडे पाहिलें आणखी माझ्याकडे पाहून कांहीं बोलण्याची इच्छा आहेसें दाखविलें. मला त्या वेळीं कुठलें धैर्य आलें कोणास कळे? मीं अगदीं बडबड न करतां तोंडापाशीं कान नेला. तों आईला.... अंतर....देऊं......नको....कोणी....नाहीं....शंकरमामा.....इतकेच शब्द माझ्या कानीं पडलें व लागलीच दादाकडे वळून पॉलिसी....पेटींत....असे अर्धवट शब्द उच्चारले. पुढें काय म्हणायचें होतें, आणखी काय सांगावयाचें होतें तें त्या शब्दांच्या लागोपाठ आलेल्या गुळणींतच गेलें. सगळें अंग पिवळटल्यासारखें केलें. "सासूबाईना तरी आणा हो एकदां" असें मी ओरडलें. पुनः "अग, मी तुझ्याबाहेर का आहें?" असें म्हणून आतां "कसे हो बाहेर चालला?" असे कांहीं शब्द माझ्या तोंडावाटे निघून मीं हात घट्ट धरला, व "मी तरी येतें, थांबा" असें स्पष्ट म्हटलें व ताडकन् कपाळ आपटून घेतलें, इतकें मला अगदीं स्पष्ट आठवतें. पुढें सर्व अंधारच झाला. परंतु तो अंधार कायमचा कुठला राह्यला! डोकें हापटून जर अंधार होता तर मग आणखी काय पाहिजे होतें! मला मग किती वेळपर्यंत कांहीं ठाऊक नाहीं.

मधल्या सगळ्या वेळीं भ्रांतींत होतें, कीं मी मेलें होतें– पण मला टवळीला कुठलें मरण आलें आहे!– कांहीं कळलें नाहीं. भ्रांतींतून म्हणा किंवा कशांतून म्हणा पण सावध झाल्याबरोबर माझ्या कानीं पहिले शब्द पडले ते–“ मी टवळी जिथें जाईन तिथें असंच होणार का हो ? ” हे होत. हे शब्द दुर्गीनें उच्चारलेले होते. तिच्यासमोर दादा उभा होता. मी शुद्धीवर आलेली किंवा जागी झालेली त्या दोघांना ठाऊक नसावें असें दिसतें. कारण “ दुर्गा-ताई, तूं हें असं कां बोलतेस ! अग तूं काय केलं आहेस ? तुझ्या-कडे काय आहे ? ” इतकें बोलून दोघेंही स्तब्ध राहिलीं. त्याबरो-बर मी एकदम उठून, “ दादा, दादा तर मग आतां तूं कोणाबरो-बर रे पुण्यास वकिली करणार ? ” असें कांहीं तरी बडबडूं लागलें असें एक मला आठवतें. पण तेथून पुढें मला दोन तीन दिवस भ्रम झाला असावा असें दिसतें; कारण मला सरळ असें कांहींच आठवत नाहीं. सासूबाई कुठें आहेत, आपण कुठें आहोंत, दादा कुठें आहे कांहीं ठाऊक नसावेंसें दिसलें; पण तो भ्रम जाऊन मी ताळ्यावर कशी आलें हें मला चांगलें आठवतें. मी ज्या खोलींत बसलें होतें त्या खोलींत चवथे दिवशीं सकाळीं कोणी नव्हतें असें वाटतें. मी आपली जमिनीवर कीं चौघडीवर तळमळत होतें. इतक्यांत माझ्या शेजारीं कोणाचीं पावलं वाजलेलीं कानीं पडलीं. “कोण ? दादा!” असें मीं स्पष्ट विचारलें. परंतु “ नाहीं, मी आहें. सूनबाई, आतां झालं तें कांहीं परत येत नाहीं, पण जनरीतिप्रमाणें सगळ्या गोष्टी....” इतके शब्द कानीं पडतात न पडतात, तों तो शब्द मीं ओळखला, आणखी “ कोण ? शंकरमामंजी ? –दादा ! ” करून मोठ्यानें किंकाळी फोडली. माझ्या दृष्टीसमोर तो पुन्हा शेवटचा देखावा दिसूं लागला. ते शेवटचे– “ शंकरमामा....” हे शब्द

माझ्या कानीं पुन्हा पडताहेत असा भास झाला. इतकेंच नव्हे, तर " संभाळ, तो तुझा गळा कापील " असे शब्द त्याच मुखांतून निघून माझ्या कानीं पडताहेत असें मला पक्कें वाटलें; स्वप्नांत जशी एखादी गोष्ट खरी खरी वाटते, त्याचप्रमाणें मला तो शेवटला सर्व देखावा खरा दिसूं लागला आणखी ते शब्द कानांत घुमत असतांना जेव्हां शंकरमामंजींची ती काळमूर्ति दृष्टीस पडली, तेव्हां माझ्या जिवाचें काय बरें झालें असेल ! मीं दादा म्हणून हांक मारली असतांना दादा आला नाहीं तेव्हां धैर्य येऊनच कीं काय शंकरमामंजी पुढें येऊन मला म्हणतात, " अग, तूं काय या वेडांत शिरली आहेस ! तुझ्या मनांतून त्याला नरकांत का ठेवायचं आहे ? जिवंतपणीं त्याच्याकडून पापं करवलींस तेवढीं थोडीं नाहीं झालीं ?" देवा ! नारायणा, ते तसले दुष्ट शब्द ऐकून घेण्याला कशाला तरी मला जगवलंस ! काय कोणता तुझ्या घरीं मीं असा अपराध केला होता ! पण त्या देवाला तरी काय म्हणून बोल लावायचा ! माझ्या नशिबीं जें जें होतें तें तें घडलें. शंकरमामंजींचे ते शब्द ऐकून घ्यावे लागले. जास्त बोलतां येईना. तेथून उठून जातां येईना. फक्त ओरडायचें माझ्या हातचें होतें, परंतु त्या समोर उभ्या राहिलेल्या मूर्तीला पाहिल्याबरोबर माझी जीभ चिकटून बसल्यासारखीच झाली. कांहीं केल्या शब्द निघेना. शंकरमामंजी पुढें पुढें येऊन कांहीं बडबडतच होते. " सगळ्यांना सांग, कीं तें कांहीं नाहीं मामंजी सांगतील तसं आपलं मला ऐकलं पाहिजे. भलत्याच सुधारकी मतांत शिरून भलतंच करूं नको. आमच्या कुळाला डाग लावूं नको. झाल्या गोष्टीची मी अगदीं क्षमा करतों, समजलीस ? तो तुझा भाऊ एक विक्षिप्तच आहे. मीं परवां गोष्ट काढल्याबरोबर प्राण घेईन म्हणाला. मग काय बोलायचं ? " तो

त्यांचा प्रत्येक शब्द म्हणजे डागणीनें काळजावर डागल्याप्रमाणें माझ्या हृदयांत भिनून गेला. आतां यांना दृष्टीआड होण्याला करूं तरी काय असें मला झालें. पण काय इलाज? पुन्हा ते "काय बोलत नाहींस ती? तो नरकांत राहिलेला बरा वाटतो तुला?" हे शब्द उच्चारलेले ऐकण्याबरोबर मी अगदीं हताश झाले, आणखी अंगांत होतें नव्हतें तेवढें सारें बळ एकवटून "दादा!" असें अतिशय मोठ्यानें ओरडले. त्याबरोबर बाहेरून "ओ!" अशी हांक येतांच "रड! त्याच्या नशीबींच असलं तर तूं काय करशील अन् तुझ्यापायीं त्याचा साराच घात व्हायचा असला, तर आम्हीं तरी काय करणार? आमच्या नांवासाठीं आम्हांला वाटतं!" असें पुटपुटत लगबगीनें स्वारी बाहेर गेली. तों बाहेरून "बाबा, तुम्ही वहिनीच्या खोलींत गेलां होतां? तुम्हांला कांहीं वाटलं नाहीं आंत जायला अशा स्थितींत?" "गप्प बैस कारट्या! तोंड दाखवूं नको मला. सारे शिंचे कुळदीपकच निघाले आहेत!" असे शब्द माझ्या कानीं पडले. आणखी धोंडूभावजी व त्यांच्या पाठोपाठ दादाही आंत आला. त्याबरोबर मीं धांवत जाऊन त्याच्या गळ्याला घट्ट मिठी मारली. काय झालें तें त्याला कळलेंच नाहीं. त्यानें मला कां, काय वगैरे पुष्कळ विचारलें, परंतु माझ्या तोंडून शब्दच निघेना! आतां मी त्याला काय सांगूं? पण धोंडूभावजींनीं "बाबा इतक्यांत इथें येऊन गेले तेव्हां...."

"कोण, कोण? तुझा बाप आला होता इथें? या खोलींत? अरे........" असें म्हणत दादा त्वेषानेंच पुन्हा बाहेर गेला. आतां काय होतें आणि काय नाहीं याची मला मोठी काळजी लागली.

**ह० ना० आपटे**

(पण लक्षांत कोण घेतो)

**प्रश्न व सूचना**

(१) पत्नी पतीशीं किंवा पतीसंबंधीं बोलतांना 'करायचं', 'बोलायचं' अशा प्रकारची भाषा पूर्वी वापरीत असे. ही पद्धति अलीकडच्या कांहीं स्त्रियांना आवडत नाहीं. तुमचें काय मत आहे ?

(२) वरील कारुण्यपूर्ण उताऱ्यांत विनोदाची किंचित् छटा कोठें दिसते काय ? दिसत असल्यास हा विनोद करुणरसास विघातक कां झाला नाहीं ?

(३) [अ] पुढील वाक्प्रचारांचा अर्थ सोदाहरण स्पष्ट कराः— तोंडचें पाणी पळणें, भानावर येणें, धावें दणाणणें.

[आ] पुढील शब्दांवर व्याकरणदृष्ट्या किंवा व्युत्पत्तिदृष्ट्या टीपा द्याः-- पलंगपोस, विलक्षण, काळगुळणी, यथास्थित, अतोनात.

---

# विदग्ध वाङ्मय

[हरि नारायण आपटे यांनीं मुंबई ग्रंथ-संग्रहालयाच्या १३ व्या वार्षिक सभेपुढं १९११ मध्यें जें अध्यक्षीय भाषण केलें त्यांतून पुढील उतारा घेतला आहे. हरिभाऊ आपटे हे केवळ कादंबरीकारच नसून मार्मिक टीकाकारहि होते; व कादंबऱ्या, नाटकें वगैरेचा हेतु केवळ आनंद देणें हाच असावा का नीतिबोध करणें हा असावा या वादाच्या प्रश्नासंबंधीं पुढील उताऱ्यांत दिलेलें हरिभाऊंचें मत निःसंशय मननीय वाटेल.]

कित्येक वाङ्मयमीमांसाकार, विदग्ध[१] वाङ्मयाचा प्रधान व एकच उद्देश आनंदोत्पादन हाच होय, त्यापासून सत्याचा बोध किंवा नीतीचा बोध झालाच पाहिजे असें नाहीं असें प्रतिपादन करितात. परंतु मला ती त्या मीमांसकांची मीमांसा मान्य नाहीं. काउन्ट लीओ टॉल्स्टाय यांचें मत दिसण्यांत असें दिसतें, परंतु वस्तुतः तसें नाहीं. कां कीं, त्यांचें म्हणणें "कला म्हटली म्हणजे ती सत्यनिष्ठच पाहिजे" तेंच खरें आहे. त्यांचें म्हणणें:—

---

१ विशेष दग्ध, चतुर, कलायुक्त (artistic).

"I do not demand that art is to be a moralising influence. I only demand that it shall be interesting. It can only be interesting when it is upright and express humanity. There are only three requisites necessary in Art—uprightness, uprightness and finally uprightness."

विष्णुशर्मा पंडितानें कोल्ह्याकुत्र्यांच्या गोष्टी सांगून केवळ आनंदच उत्पन्न केला काय ? कालिदासानें काव्य-नाटकें लिहून लोकांस नुसतें रमविलेंच काय ? शेक्स्पिअरनें नाटकें लिहिलीं त्यांचीं अजून लोक पारायणें करितात, तीं केवळ करमणूक म्हणूनच काय ? या प्रश्नांचें उत्तर "होय" असें कोण देईल ?

आनंदोत्पादन, मनोरंजन, करमणूक हा एवढाच हेतु धरून कोणत्याही महाकवीनें, किंवा नीतिबोधकारानें आपलीं काव्यें किंवा गोष्टी हीं रचिलीं नाहींत. वाल्मीकीनें आपलें रामायण, होमरनें आपलें इलियड, विष्णुशर्म्यानें आपलें पंचतंत्र व इसापानें आपल्या गोष्टी हीं कांहीं केवळ मनोरंजक बाडें किंवा गमतीदार चुटके म्हणून निर्माण केलीं नाहींत तर मनुष्यास–निदान अज्ञजनांस–राजमार्गानें सत्य व सत् यांचें ज्ञान नको, म्हणून रंजनाच्या मार्गानें तें त्यांस देण्यासाठीं निर्माण केलीं. लोकांना सत्यमार्ग हवा, व सन्मार्गही हवा. सत्यज्ञान हवें, नीतिबोधही हवा, परंतु तीं नुसतीं सरळ शब्दांनीं नकोत; सजवल्या-नटवल्या शब्दांनीं चित्रित करून हवींत. रोग दूर होण्याचा उपाय पाहिजे, बरें व्हावयास पाहिजे, परंतु औषध कडू, आंबट, तुरट नको. औषध तसें असलें तरी निदान त्याचें अनुपान अगदीं मधुर पाहिजे; आणि तें जें मधुर अनुपान तेंच औषध अशी कल्पना बनवून घेऊन त्यांतून खऱ्या औषधाचें सेवन करावें व बरें व्हावें, ही ज्याची त्याची लालसा. सत्याभासाविषयीं प्रेम मनुष्याला अगदीं स्वाभाविक असतें. त्याचें उत्कृष्ट उदाहरण

इसापानें आपल्या एका कल्पित कथेच्या द्वारें आपल्यापुढें ठेविलें आहे. ती कथा आपल्या लक्षांत असेल. " नकल्या आणि गांवढे-करी " यांची ती कथा होय.

एक नकल्या नानाप्रकारच्या पशुपक्ष्यांचे स्वर काढून नकला करीत असे. त्यांत डुकराच्या केंकाटण्याची नक्कल तर तो फारच उत्तम करी अशी त्याची ख्याति झाली होती. एके दिवशीं तो एका गांवढ्यांत नकला करीत असतां शेवटीं डुकराच्या केंकाटण्याची त्यानें नक्कल केली ती ऐकून सर्व गांवढेकऱ्यांनीं टाळ्या पिटून त्याची फारच वाहवा केली परंतु त्या श्रोतृसमाजांतला एक गांवढे-करी उठून म्हणाला, " याच्या या डुकराच्या केंकाटण्याच्या नकले-पेक्षां मी किती तरी चांगली व हुबेहूब नक्कल करून दाखवीन." श्रोतेमंडळी हसली व त्यास म्हणाली, " ही गोष्ट अशक्य. पण एकदां होऊन जाऊं द्या आपली करामत." गांवढेकरी लागलाच उठला, थोडा बाहेर गेला व एक पासोडी पांघरून आंत आला; जेथें नकल्या उभा होता तेथें उभा राहून पासोडी तोंडावरून घेऊन डुकराच्या केंकाटण्याची नक्कल करूं लागला. परंतु त्याची नक्कल कोणास आवडली नाहीं. जो तो त्याची नक्कल अगदींच गचाळ म्हणून हुर्यो करूं लागला ! तेव्हां त्यानें आपली पासोडी दूर फेंकून दिली आणि कांखेंतलें डुकराचें पिलूं लोकांपुढें करून म्हटलें, "पहा हो तुमची अक्कल ! तुम्हांला अस्सल तें खोटें आणि नक्कल तें खरें असें भासतें ! आतां मी केंकाटलों नाहीं, डुकर केंकाटलें ! पहा, तुम्ही खोट्याचा कैवार आणि खऱ्याचा धिक्कार कसा करतां तो ! "

या गोष्टीचें तात्पर्य मीं विशद करून दाखवावयास पाहिजे असें नाहीं. यांत मनुष्यस्वभावाचें इंगित बरोबर चित्रित केलें आहे. गोष्ट याप्रमाणें घडली असेल असें नाहीं; परंतु गोष्ट घडण्याचा

संभव फार. ही संभवनीय गोष्ट कल्पून सांगून इसापानें मनुष्याचा सत्यस्वभाव सांगितला ! आपल्या श्रोत्यांचे मनास पटविला ! असत्याच्या साधनानें त्यांच्या मनावर सत्य बिंबविलें. हेंच कार्य चित्रकार, कथाकार व कवि करीत असतो. सत्यनीति व सन्नीति लोकांचे मनावर बिंबविण्यास असत्याचा आश्रय चित्रकार व कवि करितात तो अशाचकरितां. मनुष्यास कल्पनाचित्रांपासून म्हणजे सत्याभासापासून आनंद होतो म्हणून सत्याभासाच्या साधनानें चित्रकार व काव्यकार लोकांस सत्यप्रत्यय आणून देतात. सत्य-प्रत्यय आणून देण्याकरितां हें असत्य असें इंद्रजाल तुमच्यापुढें उभें करतों आहें असें म्हणत सुद्धां नाहींत. इंद्रजालाच्या दर्शनानें लोकांना आनंद होतो, तर त्यांचेपुढें इंद्रजाल पसरून त्यांस आपण पहातों तें खरेंच पहातों आहोंत असें भासवितात; पण सत्याचें स्तन्य[1] त्या इंद्रजालाच्या द्वारें न कळत वाचकांच्या, श्रोत्यांच्या व प्रेक्षकांच्या पोटांत जात असतें. कवि व चित्रकार यांच्या कलेचें कौतुक करावयाचें, तें याच कारणाकरितां. कवि व चित्रकार आपल्या कल्पनेचा उपयोग करतात तो हें इंद्रजाल उत्पन्न करण्याकरितां !

### प्रश्न व सूचना

( १ ) विदग्ध वाङ्मयाचा हेतु केवळ आनंद देणें हाच आहे. कलाविलास हा कलाविलासाकरितांच आहे ( Art for art's sake ), या विधानाचें समर्थन करण्याचा प्रयत्न करा. ( प्रो० ना. सी. फडके यांचें प्रतिभासाधनांतील 'व्यासपीठ नव्हे, मयूरसिंहासन' या नांवाचें ८ वें प्रकरण पहा. )

( २ ) वरील वादाची दुसरी बाजू रंगवून सांगा.

( ३ ) [अ] सत्यप्रत्यय, इंद्रजाल या शब्दांचे अर्थ सांगा.

[आ] विदग्ध, स्तन्य, कांख या शब्दांची व्युत्पत्ति द्या.

( ४ ) आपला मुद्दा सिद्ध करण्याकरितां हरिभाऊंनीं दाखले, गोष्टी, कालिदासादिकांचे उल्लेख यांचा कसा उपयोग केला हें लक्षांत घेण्यासारखें आहे.

---

१ दूध.

# रायगडावरील संपत्ति

[ पुढील उतारा प्रो० शिवरामपंत परांजपे यांनीं 'रत्नाकरां'त लिहिलेल्या 'रायगडावरील संपत्ति' या गोष्टींतला आहे. रायगडाचे पायथ्याशीं 'छत्रीनिजामपूर' या गांवांत राहणारा दौलती नांवाचा एक १८–२० वर्षांचा पोरका मुलगा रायगडावरून सोनें लुटून आणतात असें ऐकून आपणहि सोनें आणावें असा बेत करून एका अपरात्रीं कुदळ, पहार वगैरे हत्यारें घेऊन रायगडावर गेला व खणून खणून थकून जाऊन अखेर तेथेंच झोंपीं गेला. पुढें काय झालें हें खालील उताऱ्यांत दिलें आहे. त्यांत शिवरामपंतांच्या लेखनांतील व वक्तृत्वांतील कांहीं विशिष्ट गुण––उदाहरणार्थ, एकच कल्पना घोळून घोळून सांगणें, उपमादिकांनीं विचार खुलवून सांगणें, वाच्यार्थापेक्षां ध्वन्यर्थानें मनांतील कल्पना सूचित करणें, संधि सांपडेल तेथें देशाभिमानाच्या कल्पना व भावना उद्दीपित करणें हे गुण उत्कटत्वानें दिसून येतील. ]

पण ही झोंप फार वेळ लागली नाहीं. तो खणून दमला तेव्हांच बहुतेक रात्र खलास झालेली होती, तरी पण त्या पहांटेच्या थंडगार हवेंत त्याच्या परिश्रमांमुळें त्याला थोडा वेळ कां होईना, पण चांगली झोंप लागली होती. त्यानंतर कांहीं वेळानें आसपासच्या खालच्या खेडेगांवांतील कोंबड्यांच्या आरवण्यानें आणि किल्ल्यावरच्या झाडांवरील पक्ष्यांच्या किल्‌बिल्‌ अशा मंजुळ स्वरानें त्याला जागें केलें. तो जागा झाला, तों रात्रीच्या देखाव्याचें स्वरूप बदलून रायगडावर चोहोंकडे अरुणोदयाचा प्रकाश पसरत चाललेला होता. तरी पण आकाशामध्यें कांहीं मोठमोठे तारे अद्यापि



शि. म. परांजपे.

शिल्लक होते. चोहोंकडे प्रभातकाळचा मंजुळ वारा वाहूं लागला होता, आणि तो खालच्या खेडेगांवांतील पहांटेस पेटविलेल्या चुलींमधील धुराच्या उलट्या नद्यांचे बारीक बारीक फांटे वर वळवून आणीत होता. अंधकार मागें हटत चालला होता आणि प्रकाश त्याचा पाठलाग करून त्याला पिटाळून लावीत होता. वाघ आपल्या करवंदीच्या निबिड जाळ्यांमधून दडून बसण्याकरितां त्या जाळ्यांत शिरूं लागले होते; आणि आसपासच्या गांवांतील गाई आपल्या वासरांना बरोबर घेऊन डोंगरपाखाडीवरून हळुहळू वर चढूं लागल्या होत्या. अशा वेळीं हा एकाएकीं जागा झाला. कांहीं वेळ डोळे चोळून झाल्यानंतर आणि दमलेल्या हातापायांचीं हाडें मोडून झाल्यानंतर त्याची बुद्धिहि जागी झाली. एकदोन जांभया देऊन तो उभा राहिला आणि आपल्याभोंवतीं तो चोहोंकडे पाहूं लागला. त्या वेळीं त्याचें मन आश्चर्यानें अगदीं थक्क होऊन गेलें. तो जिकडे जिकडे पाहूं लागला तिकडे तिकडे त्याला अद्-भुतपणाशिवाय व उदात्तपणाशिवाय दुसरें कांहीं दिसेचना. तो आदल्या दिवशीं संध्याकाळीं डोंगर चढून वर आला तेव्हां तो डोंगर चढतां चढतां दमला खरा; पण आपण किती उंच चढून आलों आहों, याची त्याला त्या वेळीं काळोखामध्यें कल्पना आली नाहीं. पण आतां जेव्हां या रायगडच्या उंच शिखरावर तो एकेका कड्याच्या खालीं पाहूं लागला, तेव्हां पृथ्वीतल सोडून आपण स्वर्गाच्या वाटेवर किती उंच आलों आहों, याची त्याला कल्पना होऊं लागली; व त्याबरोबरच त्याचें मनहि खालच्या प्रतीच्या कल्पनांमधून निघून उच्च प्रकारच्या वातावरणामध्यें प्रवेश करूं लागलें. आपल्याला कोठेंतरी थोडेंबहुत तरी सोनें सांपडावें ही त्याची क्षुद्र इच्छा आणि साऱ्या रात्रभर खणतां खणतां दमून

अखेरीस कोठेंहि सोनें न मिळाल्यामुळें त्याची झालेली आत्यंतिक निराशा, यांच्या योगानें त्याच्या मनांत गेल्या साऱ्या रात्रभर आणि त्या रात्रीच्या झोंपेंत त्याला पडलेल्या स्वप्नामध्येंहि त्याला जी एक-सारखी खिन्नता वाटत होती, ती त्या रायगडवरची त्या वेळची ती प्रशांत रमणीय शोभा पाहून पार नाहींशी झाली. आणि त्याच्या सभोंवतीं पसरलेल्या त्या शेंकडों डोंगरांच्या शिरोभागांवरून जी शांतता पसरलेली होती तिनें त्याच्या मनामध्यें प्रवेश केला आणि त्याच्या मनांतील क्षुद्र वासनांचा निरास होऊन तेथें पूर्ण शांतता प्रस्थापित झाली. त्याचप्रमाणें त्या प्रभातकाळीं सृष्टिदेवतेनें त्या उच्च प्रदेशामध्यें सर्वत्र जो आनंदीआनंद पसरविला होता त्या आनंदाच्याहि छटा त्याच्या अंतःकरणामध्यें प्रवेश करूं लागल्या आणि त्याला न कळत त्याचें अंतःकरण हळुहळू उल्लसित आणि प्रफुल्लित होऊं लागलें. ज्या प्रभातकालीन आनंदानें त्या तेथून दिसणाऱ्या शेंकडों डोंगरावरील वनपुष्पांना प्रफुल्लित केलें होतें, ज्या आनंदामुळें त्या डोंगरांवरील गवतांच्या काड्याहि डोलूं लागल्या होत्या, आणि ज्या आनंदामुळें तेथील पक्षी नाचूं-बागडूं लागले होते आणि माधुर्यानें भरलेलीं गाणीं गाऊं लागले होते त्या आनंदानें तेथील सर्व स्थिरचर विश्वाला भरून टाकल्यानंतर तो स्वर्गांतून खालीं उतरलेला आनंद त्या एकट्याच्याच अंतः-करणामध्यें ओतप्रोत भरल्यावांचून कसा थांबूं शकेल? अशा प्रकारची तेथील ती सकाळची दिव्य शोभा पाहून त्याची चित्तवृत्ति अगदीं बदलून गेली! त्याचें तें छत्रीनिजामपूर नांवाचें गांव ज्या दिशेकडे होतें, त्या दिशेकडे तो एकदां पाही आणि तेथून दृष्टि काढून मग तो फिरून आपल्यासभोंवतीं पसरलेल्या त्या अवाढव्य विश्वविस्ताराकडे पाही. इतक्या उंचावरून आपल्या जन्म-

भूमीच्या खेडेगांवाकडे तो खालीं पाहूं लागला, तेव्हां तें त्याच्या बाल्यावस्थेच्या कल्पनेमध्यें त्याला पुष्कळ मोठें वाटणारें त्याचें गांव वरून एखाद्या ठिपक्यासारखें लहान दिसत आहे असा त्याला भास झाला, व त्या मानानें त्याच्या सभोंवतालच्या विश्वाचा विस्तार त्याला किती तरी प्रचंड दिसूं लागला; आणि या तुलनेच्या योगानें त्याच्या अंतर्दृष्टीमध्यें जी विश्वव्यापकतेची कल्पना प्रादुर्भूत झाली, ती त्याला त्यानंतर मिटावितां येणें अगदीं अशक्यच होऊन गेलें. अशा रीतीनें कांहीं वेळपर्यंत त्याची दृष्टि आपल्या-सभोंवतालचे सृष्टिचमत्कार पाहण्यामध्यें आणि तेथील सृष्टिदेवता त्याचें मन आपल्या अद्वितीय जादूनें भारून टाकण्यामध्यें गुंतलेली होती. अशा परिस्थितीमध्यें कांहीं थोडा वेळ जातो आहे न जातो आहे, तों दक्षिण, पश्चिम, उत्तर या दिशांकडच्या क्षितिजाकडे त्याची दृष्टि गेली. तेथें डोंगरांचीं शिखरें एकापुढें एक अशीं अनेक कोसच्या कोस दाट लागून गेलेलीं दिसत असल्यामुळें हा काय डोंगरांचा आणि पर्वतांचा एखादा महासमुद्रच माझ्यासभोंवतीं पसरला आहे कीं काय, असा त्याला भास झाला. अशा रीतीनें दृश्यमान् होणाऱ्या या हजारों पर्वतशिखरांकडे तो आपली निश्चल दृष्टि लावून तटस्थ उभा राहिला होता; इतक्यांत त्या असंख्य पर्वतशिखरांचा रंग हळूहळू पालटत चालला आहे असें त्याला दिसूं लागलें. आणि आणखी कांहीं थोडे क्षण जात आहेत न जात आहेत, तोंच त्या इतक्या सगळ्या पर्वतांचीं तीं असंख्य शिखरें सोन्यानें मढवून काढलीं गेलीं आहेत असें त्याला आढळून आलें! तो आश्चर्यानें चकित होऊन गेला! त्याला कांहीं समजेनासें झालें! जीं पर्वतशिखरें थोड्या क्षणांपूर्वी तेथील गवतामुळें पांढुरकीं, झाडांमुळें हिरवीं, आणि दगड किंवा माती यांच्यामुळें

काळीं दिसत होतीं, तीं इतक्यांत सगळीं सोन्यानें कशीं मढविलीं गेलीं ! या अनेक पर्वतराजांच्या मस्तकांवर इतके हे अनेक सुवर्ण-मुकुट इतक्यांत कोणीं आणून घातले ! आणि इतक्या या सोन्याचा वर्षाव या सर्व भूमीवर हा कोणीं केला ! हा काय चमत्कार आहे ! ही काय जादू आहे ! इतकें हें सोनें कोणीं निर्माण केलें ! आणि हें कोठून आलें ! असे प्रश्न आपल्या मनाला विचारीत तो दिङ्मूढ होऊन तिकडे फिरून पाहूं लागला ! तों पूर्व दिशेच्या क्षितिजा-कडे त्याचें लक्ष गेलें. तेथें त्याला काय दिसलें? तेथें तें दैदीप्य-मान् सूर्यमंडळ उदयाचलाच्या वर अर्धवट उदित झालेलें त्याला दिसलें ! तें पाहून त्याच्या मनाला त्या वेळीं जो आनंद झाला, तो त्याच्या अंतःकरणांत मावेना. त्या अर्धोदित सूर्यप्रकाशानें त्याच्या अंतःकरणामध्यें त्याच्या पूर्व सुकृताच्या संचितानें त्याची जी दिव्य दृष्टि उन्मीलनोन्मुख झालेली होती, ती एखाद्या सूर्यविकासी कमला-प्रमाणें पूर्णपणें प्रफुल्लित झाली ! त्याला जें दिसत नव्हतें तें दिसूं लागलें. त्याला जें ऐकूं येत नव्हतें तें येऊं लागलें; आणि त्याला जें समजत नव्हतें तें समजूं लागलें. आपल्या आसमंतात्भागीच्या असंख्य पर्वतांवर हा सोन्याचा वर्षाव कोणीं केला आहे, ह्या पर्वतरूपी महायोद्ध्यांच्या अंगांवर हीं सोन्याचीं चिलखतें कोणीं चढविलीं आहेत, ह्या पर्वतराजांच्या मस्तकांवर सोन्याचे हे मुकुट कोणीं ठेविले आहेत, आणि इतक्या सगळ्या अगणित सोन्याचा उगम कोठून आहे, याची त्याला योग्य कल्पना आली. आणि अत्यंत नम्रता-पूर्वक रीतीनें आपले हात जोडून त्याच्या मनानें त्या सूर्याला सहस्र प्रणाम केले ! व आपल्या त्या पूर्वीच्या क्षुद्र मानवी अज्ञानाबद्दल त्यानें त्या दिव्य तेजाच्यापुढें क्षमेची याचना केली. त्याच्या हल्लींच्या मनोवृत्तीची त्याला लाज वाटूं लागली. त्याची ती

आदल्या दिवशीच्या काळोखानें भरलेली रात्र कोणीकडे आणि त्याचा आतांचा हा प्रकाशानें भरलेला प्रभातकाळ कोणीकडे ! त्याला वाटूं लागलें कीं, मी एका रात्रीपूर्वी कितीतरी अज्ञानामध्यें होतों ! काल रात्रीपर्यंत मला असें वाटत होतें कीं, रायगडवरची संपत्ति ही रायगडवरच्या मातीमध्यें पुरलेली आहे. पण ती माझी केवढी चूक ! रायगडवरची संपत्ति रायगडवरच्या मातीखालीं आणि दगडांखालीं पुरलेली नसून ती तर येथें चोहोंकडे उघडी करून मांडून ठेवण्यांत आलेली आहे ! आणि मी काय ती वेड्यासारखा मातीखालीं खणून पहात होतों ! ही रायगडावरची अलोट संपत्ति वाटेल त्यानें यावें आणि वाटेल त्यानें लुटून न्यावी ! परकीय लोकांनीं येथील इतर संपत्ति गुंडाळून नेली असली, तरी ही ईश्वरी संपत्ति कोणालाहि येथून लुटून नेतां यावयाची नाहीं. त्या सदय अंतःकरणाच्या परमेश्वरानें ती येथें उघडी करून ठेविली आहे ! ही संपत्ति खणून काढावी लागत नाहीं ! ही संपत्ति साध्य करून घेण्याकरितां कुदळी आणि पहारा असल्या जड लोखंडी सामानाची जरूरी लागत नाहीं. मी वेडा, म्हणून मीं या कुदळीचें आणि या पहारेचें ओझें खालून वर वाहून आणलें ! पण खऱ्या संपत्ती-च्या साधनाला असल्या या लोखंडी सामग्रीची कांहीं एक जरूर लागत नाहीं ! असें म्हणून तुच्छतेनें त्यानें आपल्याजवळची कुदळ आणि पहार जवळच्या एका कड्याखालीं फेंकून दिली ! व पुढें तो आणखी म्हणालाः— असल्या या लोखंडी साधनांची येथें काय आवश्यकता आहे ? येथें जमीन खणून तिच्यावरची माती काढावयाची नसून आपलें अंतःकरण खणून त्याच्यावर पडलेली अज्ञानाच्या मातीचीं दडपणें दूर करायाला पाहिजे आहेत. तीं परमेश्वरकृपेनें ज्यांचीं दूर होतील आणि ज्यांच्या डोळ्यांमध्यें हें

ज्ञानाचें अंजन घातलें जाईल, त्यांना येथें संपत्तीला काय तोटा आहे! ते जेथें पाहतील तेथें त्यांना संपत्तीच संपत्ति भरून राहिलेली दिसून येईल! येथें या रायगडावर परमेश्वरानें कोणती संपत्ति सांठवून ठेवावयाची शिल्लक राहिली आहे? येथें या वेळीं सर्व सृष्टीभर हा सूर्यनारायण जिकडे तिकडे आपल्या सहस्र धारांनीं सोन्याचा पाऊस पाडीत असतां मी एखाद्या वेड्यासारखा त्या कालच्या रात्रीच्या काळोखामध्यें चोहोंकडे भोंकें पाडून त्या शिवाजी-महाराजांनीं पवित्र केलेल्या या राज्यवैभवशाली भूमातेला विना-कारण वेदना देत होतों! त्या शिवाजीमहाराजांनीं ही जी पुण्य-भूमि आपल्या सिंहासनाच्या संस्थापनेकरितां पसंत केली ती या-करितांच पसंत केलेली असली पाहिजे, कीं येथें सृष्टिनिर्मित संपत्ति अपरंपार भरलेली आहे! ही अक्षय्य संपत्ति—ही परमेशाच्या कृपेनें प्राप्त होणारी अक्षय्य संपत्ति—येथें अपरिमित सांठविलेली आहे. हें पाहूनच शिवाजीमहाराजांनीं ही भूमि राज्यस्थापनेला योग्य म्हणून मानली असली पाहिजे. हा परमेश्वरी कृपेचा अक्षयीं वाहणारा संपत्तीचा झरा जेथें नाहीं, तेथें कोणीं भिकारी मनुष्यांनीं मुंग्यांच्याप्रमाणें आपलीं वारुळें बांधून त्यांत सांठवून ठेविलेली चिमूटभर संपत्ति किती दिवस पुरणार आहे? जमिनींत पुरून ठेविलेली संपत्ति ही खरी संपत्ति नव्हे, तर भाग्यवान् मनुष्याच्या अंतःकरणामध्यें परमेश्वरानें आपल्या हातानें आणून लाविलेली जी कृपादृष्टीची कल्पलता, तीच मनुष्याची खरी संपत्ति होय! ती शिवाजीमहाराजांच्यापाशीं होती! ती शिवाजीमहाराजांच्या अंतः-करणामध्यें होती! आणि त्यामुळें त्यांना महाराष्ट्राच्या सिंहासनावर बसून आपल्याला स्वातंत्र्याचा राज्याभिषेक करून घेतां आला!—

पण हाय! हाय! मी काल रात्रीं किती नीच होतों! काल रात्रीं माझ्या कल्पना किती अधमपणाच्या होत्या! आणि कालच्या त्या काळोखामध्यें मी कृतघ्नपणाचें एक किती भयंकर कृत्य केलें! नाहीं का? मी आपल्या त्या अधोगामी पहारेनें अनेक ठिकाणीं सोन्याकारितां खणून निराशा झाल्यानंतर या ठिकाणीं खात्रीनें द्रव्य असलें पाहिजे असें म्हणून मी एका चबुतऱ्याचे दगड आपल्या पहारेनें उचकटले नाहींत काय? तो चबुतरा कसला होता! तो चबुतरा शिवाजीमहाराजांच्या सिंहासनाचा होता! त्या चबुतऱ्याच्या सिंहासनावर शिवाजीमहाराजांना बसवून काशीच्या गागाभट्टांनीं तेथें त्यांना स्वातंत्र्याचा राज्याभिषेक केला!—आणि मी तेथें काय केलें? तर मीं—या अधमानें—या माझ्या अधमतम हातांनीं—त्या आमच्या देशाच्या स्वातंत्र्याच्या सिंहासनाचे दगड यःकश्चित् मातीमोल अशा थोड्याशा सोन्याच्या क्षुद्र नाण्यांसाठीं उलथून पाडले! धिक्कार असो मला! ज्या पहारेनें मी माझ्या देशाच्या स्वातंत्र्याच्या सिंहासनाचे दगड द्रव्याच्या आशेनें उलथून पाडण्याला उद्युक्त झालों, ती पहार खरोखर मीं माझ्या या छातीमध्यें मारून घ्यावयाला पाहिजे होती! पण आम्ही असल्या यःकश्चित् स्वार्थासाठींहि जर आपल्या स्वातंत्र्याचीं सिंहासनें उलथून टाकण्याला अशा रीतीनें प्रवृत्त झालों, तर परमेश्वर आपल्यावर कशी कृपा करील? मी आपल्या राजाच्या सिंहासनाचे दगड उचकटले, याबद्दल मला अत्यंत खेद वाटत आहे! आणि मला या पातकाचा कांहीं तरी प्रतिकार केलाच पाहिजे!

असें म्हणून त्यानें रात्रीं त्या सिंहासनाच्या चबुतऱ्याचे जे दगड काढले होते ते फिरून बसविण्याचा प्रयत्न केला, व ते त्यानें फिरून कसेबसे बसविले; पण ते बसवितांना आणि बसविल्यानंतरहि

त्याच्या मनामध्यें फिरून पुढीलप्रमाणें विचार घोळूं लागले, आणि तो आपल्याशींच म्हणालाः—छे! हे निखळलेले दगड चांगले बसत नाहींत! आणि यांच्यामध्यें चुना वगैरे घातल्यावांचून हे चांगले बसणार तरी कसे! पण तो इतकें म्हणत आहे, तों फिरून त्याच्या मनांत दुसरे विचार असे आले कीं, जुन्या दगडांत नवीन चुना घालणें हा कांहीं शिवाजीचें सिंहासन दुरुस्त करण्याचा खरा मार्ग नव्हे! दोन दगडांना आंवळून धरणारा चुना कोणताहि पाथरवट त्यांच्यामध्यें आपल्या करणीनें भरूं शकेल! पण शिवाजीमहाराजांच्या सिंहासनाला जी खरी बळकटी आली होती ती या दोन दगडांच्यामधील चुन्यानें आलेली नसून आपल्या महाराष्ट्रांतील असंख्य वीर पुरुषांचीं जीं अंतःकरणें तीं एकत्र आंवळून धरणारा असा जो स्वातंत्र्यप्रेमाचा चुना शिवाजीमहाराजांनीं उपयोगामध्यें आणला होता, त्याच्या योगानें त्यांच्या सिंहासनाला बळकटी आलेली होती. तेव्हां अशा दृष्टीनें पाहतां एका घोटीव दगडाजवळ दुसरा घोटीव दगड आणून बसाविणें आणि त्यांना एकत्र आंवळून धरण्याकरितां त्यांच्यामध्यें चुनखडी भाजून केलेला चुना भरणें हा कांहीं खरा मार्ग नव्हे!

या रायगडावर जी अनेक प्रकारची संपत्ति सांठविलेली आहे, त्यामध्यें स्वातंत्र्यप्राप्तीच्या साधनांचीहि संपत्ति तेथें जी भरलेली होती ती त्याच्या अंतःकरणाला अशा रीतीनें दृग्गोचर होऊं लागली; व स्वराज्यसंस्थापनेचे खोटे आणि दिखाऊ मार्ग कोणते यांच्याबद्दलचाहि स्पष्ट विवेक त्याच्या मनामध्यें प्रकाशित होऊं लागला. एकदां अंतःकरण परमेश्वरी प्रेरणेनें विश्वव्यापकतेच्या प्रदेशामध्यें प्रवेश करूं लागलें, म्हणजे त्या अंतःकरणावरचे क्षुद्रतेचे सर्व पडदे गळून पडून तें अंतःकरण सर्व गोष्टींकडे सम्यग्दर्शनाच्या

दृष्टीनेंच पाहूं लागतें आणि त्या अंतःकरणामध्यें उदात्त कल्पनांचीं स्फुरणें उत्पन्न होऊं लागतात; व स्वदेशाच्या स्वातंत्र्याचे खरे मार्गहि स्पष्टपणें प्रादुर्भूत होतात. त्या रायगडाच्या गगनचुंबित शिखरांवरून परमेश्वराच्या परमकारुणिकत्वाची व तादात्म्यवृत्तीची योग्य कल्पना त्याच्या मनामध्यें उभी राहिली. त्याचें त्याला प्रिय असलेलें त्याच्या जन्मभूमचिं जें खेडेगांव तेथून एखाद्या ठिपक्या-सारखें लहान भासत होतें, तें लहान दिसूं लागल्याबद्दल त्याला विषाद न वाटतां येथून ही जी सर्व विस्तीर्ण सृष्टि दिसत आहे, तीच माझी जन्मभूमि अशी विशाल कल्पना त्याच्या अंतःकरणा-मध्यें प्रादुर्भूत होऊन त्याला आनंदातिरेकाचा अनुभव येऊं लागला. त्याच्या जन्मभूमीच्या त्या गांवांतील, त्याच्या त्या लहान घरांतील, त्याची जन्मदात्री आई जी मरण पावली होती, तिचें त्याला या वेळीं स्मरण झालें. पण तिच्या स्मरणामुळें त्याच्या अंतःकरणाला दुःख न होतां त्या सभोंवतालच्या सृष्टींतील प्रत्येक उपकारक वस्तूमध्यें त्याला त्याची आई दिसूं लागली. नाना प्रकारचीं धान्यें उत्पन्न करणारी ही भूमि, मधुर फळें निर्माण करणारे हे वृक्ष, जेथें जावें तेथें शीतल पाणी पाजणाऱ्या या नद्या, श्रमपरिहरण करणारा हा मंदप्रवाही वायु, हा सर्व अन्नांचा परिपाक करणारा सूर्यनारायण, आणि मी जेथें निद्रासेवन करूं इच्छीन तेथें माझ्याकरितां प्रेमाचा पाळणा तयार करून देणारी ही भूमि या प्रत्येकांच्या ठिकाणीं मी माझी आईच पाहत आहें, अशी व्यापक वृत्ति त्याच्या अंतः-करणामध्यें उत्पन्न झाली ! त्याच्या आसमंतात् पसरलेल्या या विश्वचैतन्याच्या आनंदामध्यें तो आपलीं सर्व वैयक्तिक दुःखें विसरून गेला. तो ज्या क्षुद्र सोन्याचा शोध करण्याकरितां काळोखां-तून ठेंचा खात हिंडत होता, त्याच्यापेक्षां शतपटींनीं अधिक

मौल्यवान् असें सोनें त्याला या रायगडावर सांपडलें आणि उचकटलेल्या दगडांमध्यें चुना भरणें या पाथरवटी उपायापेक्षां—देशाच्या स्वातंत्र्याच्या समर्थनाच्या दिशा फार भिन्न आहेत, हेंहि ज्ञान त्याच रायगडावरील दिव्य दृष्टीनें त्याला करून दिलें.

शि० म० परांजपे
( रत्नाकर, ऑगस्ट १९२६ )

### प्रश्न व सूचना

( १ ) दौलतीला रायगडावर कोणती दिव्य दृष्टि लाभली ? तसेंच कोणती संपत्ति प्राप्त झाली ?

( २ ) "जमिनींत पुरून ठेवलेली संपत्ति ही खरी संपत्ति नव्हे, तर भाग्यवान् मनुष्याच्या अंतःकरणामध्यें परमेश्वरानें आपल्या हातानें आणून लाविलेली जी कृपादृष्टीची कल्पकता तीच मनुष्याची खरी संपत्ति होय." या वाक्यांतील कल्पनेचा २०–२५ ओळींपर्यंत विस्तार करा.

( ३ ) [ अ ] या उताऱ्यांतील अर्थालंकारांचीं दोन-तीन उदाहरणें द्या.

[आ] 'दिखाऊ व टिकाऊ', 'प्रेमाचा पाळणा' यांत कोणता अलंकार साधला आहे.

( ४ ) [ अ ] 'उन्मीलनोन्मुख', 'सम्यग्दर्शन', 'दृग्गोचर' या समासांचा विग्रह करून अर्थ सांगा.

[आ] 'दृग्गोचर' या शब्दाप्रमाणें 'गोचर'-पदयुक्त आणखी तीन शब्द बनवा.

( ५ ) या उताऱ्यांतील कांहीं वाक्यें अतिशय लहान तर कांहीं अतिशय मोठीं आहेत. वाक्यें लहान केव्हां येतात व मोठीं केव्हां येतात यासंबंधीं कांहीं नियम बांधतां येईल काय ? भावनेची तीव्रता व विचारांची गुंतागुंत यांचा वाक्याच्या लहानमोठेपणाशीं कांहीं संबंध आहे काय ?

---

# चित्रें व चित्रकलेसंबंधीं टीका

[ प्रो० शिवराम महादेव परांजपे यांची प्रसिद्धि उपरोधयुक्त व उपहासयुक्त अशा वक्तृत्वाबद्दल आणि लेखनाबद्दल आहे; पण ते गंभीर स्वरूपाचे मार्मिक निबंध व टीकालेखहि लिहिण्यामध्यें तितकेच प्रवीण होते. संस्कृत, मराठी व इंग्रजी वाङ्मयांचा त्यांचा व्यासंग दांडगा असून त्यांत रममाण होणारे असे ते उत्तम रसिकहि होते. मराठीमध्यें चित्रकलेसंबंधीं चर्चात्मक लेख लिहिण्यास त्यांनींच आरंभ केला असें म्हणण्यास हरकत नाहीं. पुढील उताऱ्यांत अशाच एका चर्चेचे ओघांत चित्रकार व कवि यांचेसंबंधीं त्यांनीं जें विवेचन केलेलें आहे तें मोठें मार्मिक व मननीय आहे. ]

आपल्या इकडे चित्रकला आणि शिल्पकला या दोन्हीहि कला फार पूर्वीपासून प्रचलित आहेत. मनुष्य उन्हांत उभा राहिला असतां त्याची सावली पडते, किंवा तो पाण्याच्या कांठीं उभा राहिला असतां त्या पाण्यामध्यें त्याचें प्रतिबिंब पडलेलें दिसतें. यावरून अगदीं पुरातन काळच्या पहिल्या मनुष्याला चित्रकलेची कल्पना मिळालेली असली पाहिजे असें दिसतें. प्रत्येक कला ही बहुधा सृष्टिधर्मांच्या अनुकरणानेंच उत्पन्न झालेली असते. सावलीवरून बाह्य रूपरेषा रेखाटण्याची कल्पना ही अगदीं प्राथमिक अवस्थेमधील चित्रकला असली पाहिजे. आणि मनुष्याच्या पहिल्या रानटी अवस्थेमध्यें जेव्हां त्याचें शब्दशास्त्र हल्लींच्याप्रमाणें पूर्ण कार्यक्षम झालेलें नव्हतें, तेव्हां त्याला आपले व्यवहार या प्राथमिक चित्रकलेच्या साहाय्यानेंच करावे लागत असले पाहिजेत, असें कित्येक प्रमाणांवरून दिसून येतें. कारण, चिनी वगैरे-सारख्या भाषांमधून आज जे कित्येक शब्द लिहिले जात आहेत तीं त्या शब्दांच्या उच्चारांतील अक्षरें नसून त्या शब्दांनीं द्योतित[1]

---

१ दार्शित.

होणाऱ्या वस्तूंचीं चित्रेंच आहेत ही गोष्ट महशूर आहे. यावरून चित्रांच्या ओबडधोबड आकृतींचा अक्षरांच्या पूर्वीं उपयोग करण्यांत येत असला पाहिजे हें उघड होतें; व या ओबडधोबड आकृतींमध्यें कालांतरानें मूळ वस्तूंचा हुबेहूबपणा आणण्याची कला वृद्धिंगत झाली असली पाहिजे. पण चित्रकलेची परिपूर्णता ही नुसत्या रेखांच्या आकृतींनीं संपन्न होणें शक्य नाहीं. त्यांत रंगांची भर घातल्याशिवाय तें चित्र अपूर्णच राहणार. सूर्याच्या प्रकाशांत पडणारी एकाद्या झाडाची सावली ही जरी नुसती रेखामात्रच असली तरी त्या सावलीचें मूलभूत असें जें झाड त्यांत नुसत्या रेखाच असतात असें नाहीं; तर त्या झाडाचें सगळें सौंदर्य त्या झाडांतील निरनिराळ्या रंगांनीं त्याच्यामध्यें उत्पन्न केलेलें असतें व तें आपल्या चित्रामध्यें आपण आणलें पाहिजे, अशी महत्त्वाकांक्षा चित्रकाराच्या मनामध्यें साहजिकपणें उत्पन्न होते. हा पहिला मानवी चित्रकार आपलें रंगाचें काम कोणापासून शिकला असावा ? याचा गुरु कोण असला पाहिजे ? तर एकनाथमहाराजांनीं आपल्या एका अभंगांत वर्णन केल्याप्रमाणें सूर्याच्या किरणांनीं ढगांच्या पृष्ठभागावर इंद्रधनुष्याचे रंग भरणारा प्रत्यक्ष परमेश्वर हाच त्याचा गुरु असला पाहिजे. एकनाथ त्या अभंगांत म्हणतात:—

देव रंगारी रंगारी । त्रिभुवनाचा रंग करी ॥
लक्ष चौऱ्यायशीचे ठसे । वेगळाले केले कसे ॥

परमेश्वर हा एक मूर्तिकारहि आहे आणि एक रंगारीहि आहे, हें जें एकनाथांनीं येथें काव्यात्मक वर्णन केलें आहे, तें कितीतरी हृदयंगम आहे ! या अभंगांतील वेदान्ताच्या आणि सृष्टपदार्थशास्त्राच्या नियमांप्रमाणें परमेश्वर हा पहिला शिल्पकार आणि पहिला चित्रकार होय; आणि त्याचीं चित्रें व त्या चित्रांवरील त्याचे रंग

पाहून मनुष्य आपलीं चित्रें काढून तीं रंगवूं लागला असला पाहिजे. अशा आपल्या गुरूच्या हातच्या सृष्ट पदार्थांच्या नानाविध सुंदर तसबिरी आपल्या डोळ्यांपुढें ठेवून आपल्या आर्यावर्तांतील जे चित्रकार आपल्या कलेचा व्यासंग करूं लागले, त्यांनीं ती कला पूर्वींच्या काळांत परमावधीला नेऊन पोंहोचविली असली पाहिजे, याबद्दल शंका नाहीं. या कलेच्या कौशल्याचीं निदर्शक अशीं पुष्कळ उदाहरणें आपल्या प्राचीन इतिहासांतून व पुराणांतून आपल्याला पहावयाला सांपडतात. महाभारतांतील मयासुराचें शिल्पशास्त्रविषयक नैपुण्य किती होतें, हें आपणां सर्वांना माहीतच आहे. हरिवंशामध्यें बाणासुराची जी गोष्ट आहे, तिच्यामध्यें त्या वेळच्या चित्रकलेच्या प्रगतीचा एक उल्लेख जो एका प्रसंगानें आलेला आहे तोहि मननीय आहे. बाणाची मुलगी उषा हिनें आपल्या स्वप्नामध्यें कोणी एक सुंदर पुरुष पाहिला, पण तो कोण हें तिला जागृतीमध्यें निश्चित करण्याला कांहीं मार्ग सांपडेना. तेव्हां अन्वर्थक नांव धारण करणारी तिची चित्रलेखा या नांवाची जी एक मैत्रीण होती तिनें त्या वेळच्या अनेक सुंदर पुरुषांचीं चित्रें हुबेहूब काढलीं व त्यांतून उषेनें आपला प्रियकर अनिरुद्ध हा ओळखून काढला. अशा प्रकारची पौराणिक काळापासून आपल्यांत चालत आलेली जी आपली चित्रकलेची परंपरा ती जुनीं देवळें, जुने राजवाडे, जुन्या गृहांतील लेणीं वगैरे ठिकाणांमधून अजूनहि आपल्या दृष्टोत्पत्तीस येते. प्राचीन काळीं लोक जेव्हां गुहांमधूनच राहात असत, तेव्हां त्यांनीं त्या गुहांतील लेण्यांमधून जीं चित्रांचीं आणि मूर्तींचीं कामें करून ठेवलेलीं आहेत, तीं खरोखर आश्चर्यकारक आहेत. देवतांच्या मूर्ति आणि देवतांचीं मंदिरें यांच्या द्वारानें आपल्या धार्मिक भावनांनींहि आपल्या शिल्पशास्त्रांच्या

प्रगतीला पुष्कळ साहाय्य केलेलें आहे. बौद्ध, जैन, मुसलमान वगैरे आर्यधर्माहून भिन्न अशा धर्मांचे लोक जरी हिंदुस्थानांत उत्पन्न झाले, तरी शिल्पशास्त्राच्या आणि चित्रकलेच्या बाबतींत सगळ्यांचा धर्म एकच होता. उत्तर हिंदुस्थानांत आर्य संस्कृतीच्या योगानें या कलांना ज्या वेळीं उत्तेजन मिळत होतें, त्याच सुमाराला दक्षिण हिंदुस्थानांत द्राविडी संस्कृतीच्या जोरावर शिल्पशास्त्रांतील अत्यंत अद्‌भुत व आश्चर्यकारक अशा मूर्तींच्या आणि मंदिरांच्या प्रचंड कल्पना मूर्त स्वरूपामध्यें आणण्यांत येत होत्या. अशा रीतीनें ज्या कला आपल्यामध्यें उन्नतावस्थेला जाऊन पोंहोचलेल्या आहेत, त्यांतील रहस्याचा आस्वाद घेण्याची योग्यता आपल्यामध्यें उत्पन्न होण्यासाठीं या चित्रकलेवरील आणि शिल्पकलेवरील टीकेच्या शास्त्राची आपल्याला आजकाल फार आवश्यकता आहे. काव्य-नाटकादिकांवर जशा टीका केल्या जातात, तशा निरनिराळ्या चित्रांतील गुणदोषांचें आविष्करण करणाऱ्या टीका लिहिल्या गेल्या, तर त्यांपासून चित्रकलेचा तर फायदा होईलच होईल, पण त्यांपासून हल्लींच्या आपल्या ललितवाङ्मयामध्येंहि एका नवीन विषयाची भर पाडल्यासारखें होईल. चित्रांची काव्यांइतकीच मोठी योग्यता असते; आणि चित्रकार हे एक प्रकारचे कविच असतात. कवीची कल्पकता चित्रकाराच्या मनांत असल्यावांचून त्याचें चित्र चांगलें वठावयाचेंच नाहीं. कल्पनेच्या अत्युच्च भराऱ्या या कवि आणि चित्रकार या दोघांनाहि सारख्याच अवगत असतात; व या दृष्टीनें बोलावयाचें झाल्यास, कवि हा एक चांगला चित्रकार असतो आणि चित्रकार हा एक चांगला कवि असतो. कालिदास हा आज जगामध्यें एक उत्तम कवि म्हणून सुप्रसिद्ध आहे; पण त्यानें मनांत आणलें असतें तर तो एक उत्तम चित्रकार म्हणूनहि

तितकाच प्रसिद्धीला आला असता, व चित्रकलेच्या अभिज्ञतेचा हा कालिदासाचा गुण त्याच्या शाकुंतल नाटकामध्येंच आपल्याला पहावयाला सांपडतो. त्या नाटकाच्या सहाव्या अंकामध्यें दुष्यन्तानें शकुंतलेचें एक चित्र काढलेलें असल्याचा एक प्रसंग कालिदासानें आणिलेला आहे; व त्या चित्राची पार्श्वभूमिका कशी असावी ह्यासंबधानें कालिदासानें त्या ठिकाणीं:—

कार्या[1] सैकतलीनहंसमिथुना स्रोतोवहा मालिनी
पादास्तामभितो निषण्णहरिणा गौरीगुरोः पावनाः ।
शाखालम्बितवल्कलस्य च तरोर्निर्मातुमिच्छाम्यधः
शृङ्गे कृष्णमृगस्य वामनयनं कण्डूयमानां मृगीम् ॥

या सुंदर श्लोकानें आपली कल्पना व्यक्त केली आहे. याच्या-पेक्षां जास्त चांगली पार्श्वभूमिका कोणता चित्रकार आपल्या कल्पनाशक्तीनें निर्माण करू शकणार आहे ? चित्रकाराची सर्व कांहीं बारकाई कवीच्या शब्दचित्रामध्यें आलेली आहे; आणि कालिदासानें या श्लोकामध्यें शब्दानें जें वर्णिलें आहे, तें त्यानें आपल्या चित्रफलकावर आपल्या रंगाच्या कलमानेंहि तितक्याच उत्तम रीतीनें रंगविलें असतें, याबद्दल शंका नाहीं. सुप्रसिद्ध इंग्रजी लेखक, टॉमस कार्लाईल, यानें आपल्या 'हीरो वर्शिप्' नामक ग्रंथामध्यें हेंच तत्त्व प्रतिपादित केलें आहे. जी बुद्धीची विशालता एखाद्या प्रसिद्ध पुरुषाच्या ठिकाणीं एखाद्या विशिष्ट

---

१ मालिनी नदीच्या वालुकामय तीरांवर हंसमिथुन बसलेलें (लीन) आहे असें दाखवावें; तिच्या दोन्ही तीरांवर हिमालयाच्या टेकड्या दाखवून त्यांवर हरिणें बसलेलीं (निषण्ण) आहेत असें दाखवावें; त्याचप्रमाणें तीरांवरच्या झाडांवर वल्कलें वाळत घातलीं असून त्या झाडाखालीं कृष्णमृगाच्या शिंगाला आपला डावा डोळा खाजवीत असलेली मृगी दाखवावी अशी माझी इच्छा आहे.

कार्यांत आज प्रकट झालेली आपल्याला दिसत असते, तीच बुद्धीची विशालता त्यानें दुसऱ्या एखाद्या कामांत खर्च केली असती, तर त्या कामांतहि ती तितक्याच उत्कृष्टतेला जाऊन पोंहोचली असती. आणि हेंच कार्लाईलचें तत्त्व कवि आणि चित्रकार यांच्या बाबतींमध्यें कसें लागू पडतें, हें कालिदासाच्या वरील उदाहरणावरून स्पष्टपणें दिसून येतें.

सारांश, चित्र ही एक कविताच आहे, आणि त्या कवितेंतील काव्य हें एखादें सामान्य काव्य नसून तें ध्वनिकाव्य आहे. त्या चित्रस्वरूपी काव्यामध्यें सजीव मनुष्याच्या मनांतल्याप्रमाणेंच सुखदुःख, कामक्रोध, वगैरे नाना प्रकारचे मनोविकार अनुच्चारित स्थितीमध्यें भरून राहिलेले असतात. त्यांचें उद्घाटन करण्याकरितां टीकाशास्त्राची फार आवश्यकता आहे. आपल्या मुक्या प्राण्याचे मनोविकार कोणी बोलका प्राणी जगापुढें बोलून दाखवील काय म्हणून हीं सगळीं चित्रें वाट पहात बसलेलीं असतात. त्यांची आकांक्षा तृप्त करणें हें प्रत्येक सहृदय प्रेक्षकाचें कर्तव्यकर्म आहे. शिवाय या चित्रांतून जसे कांहीं गुण असतात, तसे त्यांच्यांत कांहीं दोषहि अंतर्भूत झालेले असतात. ते दोष टीकेच्या रूपानें दाखविले गेले असतां, दुसऱ्या चित्रांतून तसले दोष उत्पन्न होण्याचा संभव उरणार नाहीं. म्हणून मानसशास्त्राचा आणि मनुष्यस्वभावाचा ज्यांना पूर्ण परिचय झाला आहे अशा मर्मज्ञ लोकांकडून तें टीकेचें कार्य झालें, तर तें मार्गदर्शक झाल्यावांचून राहणार नाहीं.

अशा टीका सर्वच चित्रांवर करण्याची आवश्यकता नाहीं. हल्लींचीं चित्रें हीं बहुतेक फोटोग्राफीनें घेतलेलीं छायाचित्रेंच असतात. तेव्हां अशा चित्रांच्या ठिकाणीं टीकेला फारच थोडा

अवकाश असणार, हें कोणाच्याहि लक्षांत येण्यासारखें आहे. पण जीं चित्रें कल्पकतेच्या आणि प्रतिभेच्या अनुरोधानें काढण्यांत आलेलीं असतात, तींच चित्रें वर सुचविलेल्या टीकेला विषय होत. इंग्लंड, फ्रान्स, हॉलंड, इटली, वगैरे देशांतून आर्ट गॅलरीज, रॉयल ॲकॅडमीज वगैरेसारख्या चित्रकलेच्या उत्तेजनासाठीं कायमच्या संस्था निर्माण करण्यांत आलेल्या आहेत, तशा आपल्या इकडे नाहींत. कांहीं कांहीं ठिकाणीं चित्रांचीं प्रदर्शनें भरविण्यांत येतात; व औंध संस्थानचे अधिपति श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधि यांना या चित्रकलेची विशेष हौस असल्यामुळें त्यांच्या परिश्रमानें येथील कौन्सिल हॉलमध्यें वगैरे अलीकडे कांहीं चित्रांचे संग्रह प्रेक्षकांच्या मनोरंजनासाठीं दाखविण्यांत येतात. पण याच्यापेक्षां जास्त कायम स्वरूपाच्या संस्था आणि चित्रांच्या नॅशनल गॅलरीज आपल्याकडे उघडल्या गेल्या पाहिजेत; आणि अशा नॅशनल गॅलरीजमध्यें ठेवण्याला योग अशीं जीं चित्रें ठरतील, त्यांची प्रतिकृति प्रसिद्ध करून त्यावर गुणदोषविवेचनात्मक टीका लिहिल्या गेल्या पाहिजेत; तरच त्या टीकांना कांहीं महत्त्व प्राप्त होईल, व त्याच टीका उपयुक्ततेची योग्यता पावतील. अशा टीका करण्याला केवळ लेखनव्यवसायाचेंच ज्ञान असून भागणार नाहीं, तर त्या लेखकांना चित्रकलेचेंहि ज्ञान असणें आवश्यक आहे, असे हे दोन्ही गुण ज्यांच्या अंगामध्यें एकवटलेले आहेत अशीं श्रीमंत बाळासाहेब पंत प्रतिनिधि यांच्यासारखीं कांहीं माणसें सुदैवानें आज आपल्यामध्यें आहेत. त्यांच्यासारख्यांनीं हें कार्य हातीं घेतलें, तर चित्रमय वाङ्मयावर त्यांचे फार उपकार होतील. हल्लीं चित्रकला आणि शिल्पकला आपल्यामध्यें नाहीं असें नाहीं; पण ती अंधारांत पडलेली आहे. तिच्यावर जर टीकात्मक विवेचनाचा प्रकाश कोणी

मर्मज्ञ पाडतील तर तीं अंधारांतील कौशल्यें उजेडांत येऊन स्वाभाविकपणेंच अधिक तेजस्वी दिसूं लागतील.

शि० म० परांजपे
(रत्नाकर वर्ष ३, अंक ११)

**प्रश्न व सूचना**

(१) 'चित्रें हीं ध्वनिकाव्येंच होत' या वाक्याचा खुलासा करा.

(२) रविवर्म्याचें किंवा दुसऱ्या एखाद्या प्रसिद्ध चित्रकाराचें चित्र समोर ठेवून (किंवा मनश्चक्षूंपुढें आणून) त्यांतील व्यक्तींचें व प्रसंगाचें वर्णन करा.

(३) महशूर, परमावधि, परंपरा, अन्वर्थक या शब्दांची व्युत्पत्ति द्या.

(४) मयासुराची गोष्ट थोडक्यांत सांगा.

(५) पान १५० वरील उपान्त्य वाक्य ('हल्लीं चित्रकला...पडलेली आहे.) व्याकरणदृष्ट्या शुद्ध आहे काय ?

(६) आर्ट गॅलरीज्, रॉयल ॲकॅडमीज् अशासारख्या शब्दांचें मराठी भाषांतर द्यावें का ते शब्द मूळ स्वरूपांतच ठेवावेत ? असले शब्द मराठींत लिहिताना अनेकवचनी रूपें इंग्रजीतील नियमांप्रमाणें द्यावींत का मराठींतील नियमाप्रमाणें द्यावींत ?

---

# पेशवाईतील कांहीं चुका

[सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांनीं पानिपतविषयक पत्रांचा एक खंड प्रसिद्ध केला असून त्याला त्यांनीं एक मार्मिक प्रस्तावनाहि जोडली आहे. याच प्रस्तावनेंतून सदरहू उतारा घेतला आहे. मराठ्यांच्या ऱ्हासाची राजवाड्यांनीं केलेली चिकित्सा लक्षांत ठेवण्यासारखी आहे.]

जिंकलेल्या प्रांतांतील लोकांचीं मनें आकर्षून घेण्याचीं साधनें पेशव्यांच्याजवळ नव्हतीं. कथा, पुराणें, यात्रा वगैरे संस्था सतराव्या शतकांतल्याप्रमाणें अठराव्या शतकांतहि चालू होत्या. परंतु सतराव्या शतकांतला जिवंतपणा अठराव्या शतकांतील कथा-

पुराणांत राहिला नव्हता. येणेंप्रमाणें मराठ्यांच्या राजकारणाला सरदारांचीं व प्रजेचीं मनें उपयोगी पडण्यास योग्य जेणेंकरून होतील, अशी—ग्रंथ, व्याख्यानें वगैरे साधन-संपत्ति पेशव्यांनीं तयार न केल्यामुळें हिंदुस्थानांतील मराठे सरदार व तद्देशीय संस्थानिक व सामान्य जन पानिपतच्या मोहिमेच्या अगोदर व नंतर मराठ्यांच्या विरुद्ध उठले ह्यांत तिळमात्र संशय नाहीं. ग्रंथसमूहाचा, धर्मव्याख्यानांचा, साधुसंतांचा व यात्राजत्रांचा उपयोग राष्ट्रांतील लोकांच्या मनाला नीट वळण देण्यास केवढा मोठा होतो ही गोष्ट शहाजी व शिवाजी ह्यांच्या मनांत जशी बिंबली होती तशी बाळाजी बाजीरावाच्या व सदाशिव चिमणाजीच्या मनांत भरलेली दिसत नाहीं. शिवाजी व बाळाजी ह्यांच्यामधील महदंतर हेंच होय. राज्यें मिळविण्यास जसा तोफांचा व शिपायांचा उपयोग होतो, तसा तीं कायम राखण्यास व जतन करण्यास व्याख्यानांचा व विचारी पुरुषांचाहि होतो.


वि. का. राजवाडे

हें तत्त्व पेशव्यांच्या ध्यानांत कां आलें नाहीं ह्याचें कारण शोधण्यास फारसें लांब जावयास नको. त्या वेळीं महाराष्ट्रांत विद्येची व शिक्षणाची स्थिति कशी होती ह्याचा विचार केला असतां ह्या कारणांची अटकळ बांधितां येण्यासारखी आहे. त्या वेळच्या विद्येचे स्थूलमानानें तीन भाग करितां येतील—( १ ) वैदिक,

(२) शास्त्रीय व (३) व्यावहारिक. वैदिक ब्राह्मण दशग्रंथांचें[1] पठण करीत षट्शास्त्रांचा[2] जिम्मा शास्त्रीपंडितांनीं घेतला होता; व ब्राह्मणवैश्यादिक इतरजन व्यवहाराला उपयोगी जें ज्ञान तें ज्ञान संपादन करीत. वैदिक व शास्त्रपंडित ह्यांना राजाश्रय असे. व व्यावहारिक शिक्षणाच्या शाळेंतील पंतोजींना लोकाश्रय असे. व्यवहारशिक्षणांत अक्षरांचे कित्ते, संसारचोपडी, बरावर्दीगणितें[3], मराठ्यांच्या व मुसलमानांच्या बखरी व तवारिखा[4], विक्रमबत्तिशी, वेताळपंचविशी, शुकबहात्तरी, लटकचाळिशी, भारत, भागवत व रामायण ह्या इतिहासग्रंथांतील आख्यानांच्या मराठी बखरी, रामरक्षादिस्तोत्रें, जमाखर्चाच्या पद्धति, भूमापन, पत्रें लिहिण्याचे मायने, मराठी कविता वगैरेंचा समावेश होत असे. पुरुषांप्रमाणें अत्यंत कुलीन स्त्रियांनाहि लिहितां वाचतां येत असे. व्यवहाराशिक्षण बहुतेक सर्व ब्राह्मणांना, वैश्यांना व उच्च प्रतीच्या मराठ्यांना मिळत असे. गृहस्थ, ब्राह्मण व मराठे ह्यांचे धंद्याच्या मानानें तीन वर्ग करितां येतीलः—(१) स्वतःची शेतवाडी पहाणारे, (२) कारकुनी धंदा करणारे व (३) शिपायगिरीचा पेशा स्वीकारणारे. ह्या तिन्ही धंद्यांतील लोकांना वर सांगितलेल्या व्यवहाराशिक्षणाच्या पलीकडे माहिती म्हटली म्हणजे वयपरत्वें येणाऱ्या जगाच्या अनुभवाखेरीज जास्त कांहीं एक नसे. कारकुनांना व शिपायांना हिंदुस्थानचें भूज्ञान स्वतः हिंडून जें कांहीं मिळे त्यापलीकडे बिलकूल नसे. हिंदुस्थानाव्यतिरिक्त इतर देशांचें भूज्ञान ह्या

---

१ संहिता, ब्राह्मण, आरण्यक, पदें, शिक्षा (स्वरोच्चार), ज्योतिष, छंद, निघंटु (कोष), सूत्र, व्याकरण. २ सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, पूर्वमीमांसा, उत्तरमीमांसा (वेदान्त). ३ (फा. बरावर्द) अन्दाज, हिशेब. ४ इतिहास ('तारीख'चें अनेकवचन.)

लोकांना कांहींच नसे. निपाणीजवळ भोज येथील कुलकर्ण्यांच्या येथें मला एक अठराव्या शतकांतील पृथ्वीचा नकाशा सांपडला. त्यांत सप्तसमुद्रात्मक पृथ्वी शेषाच्या मस्तकावर दिली असून चीन, इंग्लंड, रावणाची लंका वगैरे देशांच्या दिशा स्थूल मानानें बरोबर दाखविल्या आहेत, व हिंदुस्थान चतुष्कोणाकृति काढिला असून तासगांव हिंदुस्तानचा मध्य धरिला आहे ! परंतु हें भूगोलज्ञान सामान्य जनांचें झालें. स्वतः पेशवे व त्यांचे सरदार ह्यांचें भूगोल-ज्ञान ह्या लोकांच्यापेक्षां अर्थात् जास्त विस्तृत व व्यवस्थित असे. फिरंगी[1], फराशिस[2], वलंदेज[3], डिंगमार[4], आल्फंदोर[5], दुराणी, तुराणी, अरब, गिलच्ये, हबशी, शामळ[6], तुर्क, यँवन[7], इराणी, शिद्दी, इंग्रज, मोरस, आफरीदी वगैरे अठरा टोपीवाल्यांचे देश, व हिंदुस्थानांतील राजांचे छपन्न देश पेशव्यांना व त्यांच्या मुत्सद्द्यांना—कित्येक नांवानें व कित्येक स्वदृष्टीनें माहीत होते; देशोदेशीचे वकील पेशव्यांच्या दरबारीं मोठ्या इतमामानें रहात असत. (का. पत्रें यादी वगैरे १३४) त्यांजपासूनहि, त्यांच्या देशांची माहिती पेशव्यांना मिळत असण्याचा अवश्य संभव आहे. हिंदुस्थानांतलि निरनिराळ्या प्रांतांचे नकाशे पेशव्यांजवळ असत, लढाया झाल्या म्हणजे तह ज्या अर्थीं होत, त्या अर्थीं पेशव्यांजवळ नकाशे असत हें मुद्दाम सांगण्यांत विशेष मुद्दा आहे असें नाहीं. महाराष्ट्रांत बखरी वाचण्याचा प्रघात फार असे. तेव्हां मराठ्यांच्या व यवनांच्या इतिहासाचें ज्ञान महाराष्ट्रांत बहुशः सार्वजनिक होतें असें

१ पोर्तुगीज. २ फ्रॅङ्क्स, फ्रेंच. ३ हॉलंडचे लोक. ४ डेन्मार्कचे लोक. ५ फ्लांडर्स (बेल्जमच्या दक्षिणेस फ्रान्स व जर्मनी यांच्यामधील प्रदेश)चे लोक. ६ काळे शिद्दी. ७ 'आयोनिअन'–ग्रीक. पुढें मुसलमानांनाहि हा शब्द लावूं लागले.

म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. पानिपतच्या बखरीचा कर्ता रघुनाथ यादव यानें त्या बखरीच्या १९ पृष्ठावर मराठ्यांच्या सर्वव्यापी सत्तेचा प्रसार कसकसा होत गेला व सर्व हिंदुस्थान हिंदुमय करून टाकण्याचा मराठ्यांचा मनोदय होता वगैरे गोष्टी अबदालीच्या तोंडून वदविल्या आहेत. त्यावरून इतिहास व भूगोल ह्यांचें ज्ञान रघुनाथ यादवाला थोडेंथोडकें नव्हतें असें दिसून येतें. रूमशाम म्हणजे कुस्तुंतुनियां[1] येथें इ. स. १७३७ पासून १७५४ पर्यंत राज्य करणाऱ्या सुलतान महमदाचेंहि नांव रघुनाथ यादवाला माहीत होतें ( र. या. पा. ब. पृ. १९ टीप ) असें त्यावरून ठरतें. भूगोल व इतिहास ह्यांची माहिती बाळाजी बाजीरावाला व सदाशिव चिमणाजीला आपल्या कामापुरती यथास्थित होती ह्यांत संशय नाहीं. परंतु युरोपांत तत्कालीन दरबारांतून म्हणजे पंधरावा लुई, बडा फ्रेडरिक्, दुसरा जॉर्ज ह्यांच्या दरबारांतून व राज्यांतून भूगोलाचें व इतिहासाचें जें ज्ञान त्या वेळीं होतें त्याच्या मानानें पेशव्यांच्या दरबारचें इतिहासाचें व भूगोलाचें ज्ञान अगदींच क्षुद्र होतें हें कबूल करणें योग्य आहे. कपिल, कणाद वगैरे मुनींनीं प्रणीत शास्त्रांच्या व्यतिरिक्त युरोपांत ठाऊक असलेल्या शास्त्रांचा गंधहि पेशव्यांच्या राज्यांत कोणाला नव्हता. पाठशाला, विद्यापीठें, विद्वत्सभा, अजबखाने, वादसभा, शोधसभा, पृथ्वीपर्यटणें वगैरे युरोपियन् संस्था पेशव्यांच्या राज्यांत नव्हत्या; इतकेंच नव्हे, तर त्या दुसरीकडे कोठें आहेत किंवा काय ह्यांचाहि पत्ता महाराष्ट्रांत कोणाला नव्हता. ह्या नकारात्मक वाक्यांचा इत्यर्थ एवढाच कीं अठराव्या शतकाच्या पूर्वार्धांत व उत्तरार्धांत मराठ्यांची संस्कृति युरोपांतील प्रगत राष्ट्रांच्या

---

१ कॉन्स्टॅन्टिनोपल.

संस्कृतीहून कमी दर्जाची होती. ती कोणकोणत्या गोष्टींत तशी होती त्याचा अंशतः निर्देश वर झालाच आहे. एक दोन विशेष मुद्द्यांचा विचार पुढें करितों.

अठराव्या शतकांतील पश्चिम युरोपांतील संस्कृतीची व महाराष्ट्रांतील संस्कृतीची तुलना करूं पाहतां शेंकडों भेद दृष्टीस पडतात. पैकीं कांहींचाच उल्लेख करणें येथें इष्ट आहे.

( १ ) मराठ्यांच्या संस्कृतींत प्रथम व्यंग म्हटलें म्हणजे त्यांना छापण्याची कला माहीत नव्हती व ती माहीत करून घेण्याचा त्यांनीं कधीं प्रयत्नहि केला नाहीं. १४९८ च्या ११ मेला गामानें हिंदुस्थान शोधून काढलें तेव्हांपासून १७६० पर्यंत फिरंग्यांच्या व मराठ्यांच्या मुलाखती अनेक ठिकाणीं झाल्या. गोमांतक, सावंतवाडी, वसई, कोची, दाभूळ, दीव, दमण वगैरे स्थळीं मराठ्यांच्या फिरंग्यांशीं गांठी पडलेल्या आहेत. वलंदेज ( डच ) व डिंगमार ( डेन ) ह्या लोकांनाहि मराठे ओळखत असत. मुसाबूसी[१] वगैरे फ्रेंच लोकांशीं तर मराठ्यांची चांगलीच घसट असे. मुंबई, सुरत, बाणकोट, विजयदुर्ग, राजापुरी, दाभोळ वगैरे ठिकाणीं इंग्रजांचीहि जानपछान मराठ्यांना झाली होती. मुंबईतील प्रभू, शेणवई, पारशी, भाटे व वाळकेश्वरचे छत्रे, भातखंडे वगैरे ब्राह्मण पुजारी व बैरागी इंग्लिश लोकांशीं हरहमेश दळणवळण ठेवीत. कित्येकांना चांगलें इंग्रजी लिहितां व बोलतां येत असे; त्यांनीं छापील पुस्तकें पाहिलीं होतीं ह्यांत संशय नाहीं. नाना फडणिसांच्या दप्तरांत छापील इंग्रजी नकाशे अद्यापहि आहेत. मोरोबादादाच्या घरच्या पुस्तकालयांत एक इंग्रजी चोपडी होती असें त्यांच्या पुस्तकांच्या यादीवरून कळतें. असें असून म्हणजे युरोपांतील सर्व देशचे लोक त्यांच्या दारीं उभे असून

---

१ Monsieur Bussy मॉंसे बुसी असा फ्रेंच उच्चार त्याचा अपभ्रंश.

मराठ्यांनीं छापण्याची कला कशी घेतली नाहीं ह्याचें मोठें आश्चर्य वाटतें. मराठ्यांच्या वाढत्या साम्राज्यांत योग्य कल्पनांचें बीं पेरण्यास ह्या कलेचाच प्रवेश महाराष्ट्रांत झाला पाहिजे होता. घोरपडे, शिंदे, होळकर, भोसले, कोल्हापुरकर, सावंत, आंग्रे, वगैरे सरदारांच्या पदरीं फिरंगी, फराशिस, इंग्रज वगैरे बरेच देशचे लोक पेशवाई जाईतोंपर्यंत व पुढें देखील होते; असें असून ज्या अर्थीं मराठ्यांनीं ही कला उचलली नाहीं त्या अर्थीं त्यांच्या ग्राहकशक्तीला, कीर्तीला बराच कमीपणा येतो हें निर्विवाद आहे. ( २ ) मुद्रणकलेसारखा उघड उघड डोळ्यांवर येणारा गुण ज्या लोकांच्या ध्यानांत आला नाहीं त्यांचें भूगोलाचें व इतिहासाचें ज्ञान कोतें असावें ह्यांत मोठें नवल नाहीं. ( ३ ) परंतु ज्या वस्तूंची मराठ्यांना दरघडीस अत्यंत जरूर लागत असावी असा आपण तर्क करितों त्यांपैकींहि कांहीं वस्तू मिळविण्याची मराठ्यांनीं इच्छा दर्शविली नाहीं व प्रयत्न केला नाहीं. धुळपांना व आंग्र्यांना लोहचुंबकाची व तारवें बांधण्याच्या गोष्टींची जरूर विषेश होती. या दोन्ही गोष्टी त्यांनीं इंग्रजांच्या गलबतांतून व मुंबईत पाहिल्या होत्या. परंतु त्या स्वतः बनविण्याची उत्कट इच्छा त्या प्रांतांतील लोकांना किंवा पुणें येथील मुत्सद्द्यांना झाली नाहीं हें मोठ्या कष्टानें कबूल करावें लागतें. ह्या इतक्या बाबींत मराठ्यांचें पाऊल मागें होतें. परंतु एका बाबींत त्यांनीं आपली ग्राहकशक्ति चांगली दाखविली होती. ती बाब म्हटली म्हणजे कळेच्या तोफा व कवायती सैन्य ठेवण्याची तयारी ही होय.

वि० का० राजवाडे

### प्रश्न व सूचना

( १ ) 'पेशव्यांचें लक्ष छापखाने वगैरे सुधारणांकडे गेलें नाहीं याचें कारण बारंवार होणाऱ्या लढायांमुळें व अंतःकलहामुळें त्यांना तिकडे लक्ष देण्यास

फुरसदच सांपडली नाहीं आणि दुसरें म्हणजे त्यांच्यामागें लागलेला कर्ज-बाजारीपणा'. हें म्हणणें तुम्हांला कितपत पटतें ?

( २ ) पेशवाईकालीन मोठ्या माणसांना हल्लींच्या एखाद्या हायस्कुलांतील मुलापेक्षांहि इतिहास, भूगोल इत्यादींचें ज्ञान कमी असून सुद्धां त्यांपैकीं कांहीं माणसें त्या वेळीं कार्यक्षम होऊन नांवलौकिकास कशीं चढलीं ?

( ३ ) हल्लींचें हायस्कूलमधील शिक्षण घेतलेला १५–१६ वर्षांचा मुलगा १७६१ च्या महाराष्ट्रांत दैवी चमत्कारानें नेऊन सोडला आहे अशी कल्पना करा व तो त्या परिस्थितीला कसें तोंड देईल याचें विनोदी ( किंवा गंभीर ) शब्दचित्र काढण्याचा प्रयत्न करा.

( ४ ) व्युत्पत्तिदृष्ट्या किंवा व्याकरणदृष्ट्या टीपा द्याः— तिळमात्र, जान-पछान, बैरागी, हरहमेष.

( ५ ) पान १४७ मधील ( २ ) आंकडा दिलेल्या वाक्याचें पृथक्करण करा.

( ६ ) मराठ्यांच्या इतिहासासंबंधीं परिश्रम करणाऱ्या ५-६ अभ्यासकांचीं व २-३ ऐतिहासिक संग्रहांचीं नांवें सांगा. एखादें ऐतिहासिक पदार्थसंग्रहालय पाहिलें असल्यास त्याचें थोडक्यांत वर्णन करा.

( ७ ) आपण 'शस्त्रजित' नाहीं, तर 'शास्त्रजित' आहों असं कांहीं लोक म्हणतात, तें कितपत खरें आहे ? ( केळकरकृत 'मराठे व इंग्रज' तसेंच पोतदार-कृत 'मराठे-इंग्रज परीक्षण' पहा. )

---

# वर्तमानपत्रकर्ता

[ श्रीपाद कृष्ण कोल्हटकर हे एका विशिष्ट विनोदात्मक लेखनपद्धतीचे जनक होत. पुढील उतारा त्यांच्या 'सुदाम्याचे पोहे' ऊर्फ 'साहित्य बत्तिशी' या लेखसंग्रहांतील असून त्यांत तत्कालीन कांहीं वर्तमानपत्रांचे व संपादकांचे दोष विनोदपूर्ण भाषेंत दिग्दर्शित केले आहेत. ]

पंधरा वर्षांपूर्वीं मीं आपल्या गांवीं एक मिठाईचें दुकान काढिलें. तें काढण्याचा उद्देश केवळ स्वार्थसाधूपणाचा नसून तरुण

पिढीचें लक्ष व्यापारधंद्याकडे वळवावें हा होता. त्याचप्रमाणें राष्ट्र अनेक व्यक्तींचें बनलें असून राष्ट्रहित साधण्याकरितां प्रत्येक व्यक्तीनें स्वहितार्थ झटलें पाहिजे हें तत्त्व माझ्या मनावर पक्केपणीं बिंबलें असल्यामुळें, या धंद्यांत होईल तितका पैसा मिळवून स्वहित साधावें व या रीतीनें, पर्यायानें का होईना स्वदेशहित साधावें हाहि माझा एक हेतु होता. दुकान थाटल्यावर कांहीं दिवसपर्यंत फारशीं गिऱ्हाइकें मिळेनात; पण हळुहळू माझ्या दुकानची विक्री वाढत चालली. ती शेवटीं इतकी वाढली, कीं पुडे बांधण्यास रद्दी कागद मिळण्याची मारामार पडूं लागली. ही जी कागदांची



श्री. कृ. कोल्हटकर

टंचाई पडूं लागली तिच्यामुळेंच वर्तमानपत्र काढण्याचा विचार प्रथमतः माझ्या मनांत आला, व तेव्हांपासून तो माझ्या मनांत सारखा घोळूं लागला. शेवटीं वर्तमानपत्रांत मला फारशी प्राप्ति जरी झाली नाहीं तरी त्यांत मला माझ्या मिठाईच्या दुकानाची जाहिरात देतां येईल, वर्तमानपत्राचे अंक पुडे बांधण्यास उपयोगी पडतील, व अशा प्रकारें एका कामांत दोन कामें साधतील, असा मीं विचार केला व तो अमलांतहि आणिला.

एकंदर धंद्यांचा सूक्ष्मपणें विचार केल्यास आपणांस त्यांपैकीं बरेच जोडधंदे आढळून येतील. येथें जोडधंदा याचा अर्थ जोड्यांचा किंवा चांभाराचा धंदा असा न घेतां धंद्यांची जोडी असा घ्यावयाचा. या जोडीपैकीं प्रत्येकाचें कांहीं साहित्य दुसऱ्याच्या उपयोगी पडत

असल्यामुळें दोन्ही धंदे एकानें करणें सोइस्कर असतें. हा अर्थ पूर्णपणें मनांत उतरविण्याकरितां येथें कांहीं उदाहरणें देतों. ग्रंथ-कर्त्याचा व पुस्तकविक्रीचा हे जोडधंदे होत. ग्रंथकर्त्यास नवीन पुस्तकें लिहिण्यापूर्वी किताबखान्यांतील[1] पुस्तकें वाचतां येतात व किताबखान्यासहि ग्रंथकर्त्याच्या पुस्तकांनीं शोभा येते. नाटककर्ता व नाटकमंडळीचा मालक यांची जोडीहि याच प्रकारची आहे. हाच प्रकार खाणावळ व दवाखाना यांचा. खाणावळींत जेवलें म्हणजे दवाखान्यास रोग्यांचा पुरवठा होतो व दवाखान्यांत उपचार करून घेण्याकरितां बाहेरगांवांहून आलेले रोगी खाणावळीस गिऱ्हाइकें मिळतात. रोगी बरा झाल्यावर खाणावळींत जेवून परत आपल्या गांवीं जाण्याकरितां निघणार तों त्यास हगवणीनें किंवा आमांशानें गांठलें म्हणून समजावें; व अशा रीतिनें एकदां खाणा-वळीच्या किंवा दवाखान्याच्या कक्षेंत एखादें मनुष्य आलें, कीं तें दोहोंचें कायमचें गिऱ्हाईक होऊन बसतें. वकिलाचा व दरवडे-खोराचा हे धंदेहि याच मालिकेंत येतात. वकिलानें दिवसां वकिली चालवावी व रात्रीं दरवडे घालावे. असें केल्यानें अहोरात्रापैकीं प्रत्येक क्षणाचा त्याला ईश्वरापाशीं हिशेब देतां येईल. दरवड्या-बद्दल दुसऱ्या कोणास पकडलें तर वकिलास दरवडा पचून तें काम चालविण्यासाठीं फीहि मिळते. बरें तो स्वतःच पकडला गेला तर निराळा वकील करावयास नको; व कुळांत भर पडते ती निराळीच! या ठिकाणीं दरवडेखोराचा हलकट धंदा प्रतिष्ठित धंद्यांत सामील झालेला पाहून कित्येक लोकांस राग येईल खरा पण वरील नियम व्यापक करण्याकरितां निढळाच्या[2] घामानें व मनगटाच्या जोरावर चालविलेल्या सर्व धंद्यांचा विचार करावा लागला; व दरवड्याच्या

१ किताब–पुस्तक; किताबखाना–पुस्तकाचें दुकान. २ निटिल–कपाळ.

धंद्याइतका निढळाच्या घामानें व मनगटाच्या जोरावर चाललेला असा दुसरा कोणताहि धंदा आढळणार नाहीं. असो. तर अशांपैकींच वर्तमानपत्रकर्ता व मिठाईवाला ही दुकल आहे. वर्तमानपत्रांत मजकूर कमी पडला म्हणजे तेथें मिठाईच्या दुकानाची जाहिरात द्यावी. व पुडे बांधण्याचे कागद संपले म्हणजे वर्तमानपत्राचे अंक उपयोगांत आणावे. अशा रीतीनें मिठाईच्या गिऱ्हाइकांस न कळत त्यांच्या हातीं नीतिपर लेख पडल्यानें देशहित किती होण्यासारखें आहे, व वर्तमानपत्रांतील लेखांचें माधुर्य मिठाईमुळें किती वाढेल, याची सहज कल्पना होईल.

मीं काढलेल्या वर्तमानपत्राचें नांवहि त्याच्या जोडधंद्यास सर्वस्वीं शोभण्यासारखें 'नीतिमेवा' हें ठेविलें होतें. 'नीतिमेवा' हें आंखूड व मधुर नांव कोणीकडे, आणि अलीकडच्या इतर वर्तमानपत्रांचीं लांबलचक व पांचट नांवें कोणीकडे ! कांहीं पत्रें आपल्या शहरांच्या किंवा प्रांताच्या नांवांपुढें 'समाचार' हें भलें मोठें शेपूट लावून इतस्ततः भ्रमण करीत असतात; पण त्यांपैकीं बरींच पत्रें तेथील इत्थंभूत[1] समाचार देण्याऐवजीं आपल्या व्यक्तिविषयक, खोडसाळ व कडक लेखांनीं त्याचा खरपूस समाचार घेत मात्र असतात. एखादें पत्र आपल्या ठिकाणच्या नांवापुढें 'वैभव' हा भव्य शब्द जोडतें. या शब्दामुळें माझी एकदां फार फसगत झाली. नागपूर येथें राष्ट्रीय सभा भरली होती. त्या वर्षी मी 'वर्तमानपत्रकर्ता' या उच्च नात्यानें तेथें गेलों होतों. नागपूर शहर दृष्टीस पडावें हाहि निघतेवेळीं माझा एक उद्देश होता. परंतु कार्यव्यग्रतेमुळें अखेरपर्यंत शहरांत फिरण्यास मला सवड मिळाली नाहीं, व मींहि त्याबद्दल फारशी फिकीर केली नाहीं; कारण 'नागपूरवैभव' पत्राचें

१ जसा घडला असेल तसा.

कार्यालय पाहिलें म्हणजे सर्व नागपूर पाहिल्याचें श्रेय येईल अशी माझी समजूत होती. निघण्याचे दिवशीं सदरहू कार्यालय पाहण्याकरितां मी तेथें गेलों मात्र, तों पांचच मिनिटांत आंतील घाण, गैरव्यवस्था, आरडाओरड वगैरेनीं माझें मस्तक फिरून जाऊन त्या पत्राविषयींचें मस्तकांतील मतहि फिरून गेलें !

'पत्रकर्तेराव' या बहुमानवाचक नांवाची मला लहानपणापासून फार आवड असे. पण त्या नांवाबरोबर पत्रकर्तेरावावर केवढी जबाबदारी येते याचें मात्र मला त्या वेळीं ज्ञान नव्हतें. जेव्हां स्वतः तें काम करण्याचा प्रसंग आला तेव्हां छातीतर मोठी थोरली धोंड येऊन पडावी असें मला होऊन गेलें. पहिला अग्रलेख लिहिण्याकरितां मी ऐटीनें मिशांस पीळ भरीत व चिरूट ओढीत टेबलावर हात टेकून बसलों खरा; पण एक वाक्यहि पुरें होईल तर शपथ ! मध्यंतरीं, कागदच खराब आहेत, टांकच बरोबर नाहीं, शाई फिक्कीच आहे, अशा प्रकारें "नाचतां येईना अंगण वांकडें" या न्यायानें मीं नोकरमाणसांस शिव्याहि देऊन पाहिल्या; परंतु सारें व्यर्थ ! शिव्या जितक्या सहज रीतीनें तोंडास येत तितक्या शीघ्रतेनें भारदस्त शब्द येईनात. एक तास झाला तरी "दयाळू इंग्रज प्रभूचें राज्य सुरू झाल्यापासून" ह्या ठराविक शब्दांपलीकडे कांहीं सुचेना. शेवटीं कपाळावर घर्मबिंदु चमकूं लागले, अंगास कंप सुटला, तोंडचें पाणी पळून गेलें, डोळ्यांत अश्रु आले, अंगावरील केस ताठ उभे राहिले; याप्रमाणें काव्य-ग्रंथांत वर्णिलेल्या सात्त्विक भावांचा माझ्या अंगीं उद्भव झाला, व या 'अव्यापारेषु व्यापारांत' पडलों नसतों तर बरें झालें असतें असें वाटूं लागलें.

---

१ स्तंभः स्वेदोऽथ रोमांचः स्वरभंगोऽथ वेपथुः । वैवर्ण्यमश्रुप्रलय इत्यष्टौ सात्त्विकाः स्मृताः ॥

परीक्षेंत एखादा कागद कठिण असला म्हणजे उमेदवाराची जी धांदल उडून दिली जाते तिचा अनुभव परीक्षेस बसण्याची यातायात न पडतां मला आयताच आला. परंतु संकट आलें म्हणजे त्यांतून सुटण्याचा उपायहि आपोआप सुचतो. मी आपली ऐटदार बैठक मोडून घाईघाईनें वाचनालयांत गेलों, तेथें वर्तमानपत्रांचीं दोनचार फाइलें चाळून पाहिलीं. त्यांतील बाष्कळ कोटिक्रम, घाणेरडे विचार व गचाळ भाषा पाहून मलाहि कितपत लिहितां येईल असें वाटूं लागलें. फाइलें चाळतां चाळतां 'आर्यभूमि', 'सुवर्णभूमि', 'मायदेश', 'मायभाषा', मायधर्म', 'सनातत धर्म', 'सात्त्विक मनोवृत्ति', 'खाविंदचरणारविंदीं मिलिंदायमान', 'आकाशांतील बाप', 'टारगे सुधारक', 'रावबहादुरें', 'अरेरावी वर्तन', 'अहंपिशा-चिका', 'अलोट', 'स्तोम', 'खोडसाळ', 'पायमल्ली', 'हरताळ लावणें', 'डोळ्यांत धूळ टाकणें', 'सूर देणें', 'री ओढणें', 'गोडवे गाणें', 'टिमकी वाजविणें', 'दांडोरा पिटणें' इत्यादि ठरीव शब्दांचें व अपशब्दांचें मीं टिपण केलें. त्याच्या साहाय्यानें दोनचार रकाने भरण्याचा मीं निश्चय केला, व तो सिद्धीसहि गेला. पहिल्या अंकांत मीं केशवपनापासून होणाऱ्या फायद्यांचें विवरण करून त्यात सुधारकांची खूपच हजामत केली होती. त्यामुळें माझ्या पत्राला एकदम बरेचसे वर्गणीदार मिळाले, वर्गणीची रक्कम व सुधारकांस दिलेल्या शिव्या यांचा जन्यजनकसंबंध याप्रमाणें मला पहिल्याच खेपेस दिसून आल्यामुळें मीं आजपर्यंत तोच क्रम अव्याहत चालू ठेविला आहे, व वेळप्रसंग न पाहतां व विषयां-तराचें भय न बाळगतां सुधारकांस शेलक्या शिव्यांची लाखोली मी नेमानें वहात आलों आहें, यास माझे वाचक साक्षी आहेत! 'शिव्यांची लाखोली' या नांवाचा 'विष्णुसहस्रनामा'च्या धर्तीवर

मीं लिहिलेला ग्रंथ लवकरच प्रसिद्ध होणार आहे. तो होतकरू संपादकांनीं अवश्य वाचून पहावा. त्याजवरून अपशब्दांच्या वाङ्मयाचें माझें अगाध ज्ञान त्यांच्या नजरेस येईल. या शिव्या सारख्या सारख्या अंतरांनीं लेखांत पेरीत गेल्यास त्यांपासून द्रव्याच्या रूपानें बरेंच मोठें पीक निघतें, ही माझी स्वानुभवाची गोष्ट आहे. आजपर्यंत शब्दांचे अनेक कोश झाले आहेत; पण अपशब्दांचा हा पहिलाच कोश आहे !

याखेरीजहि वर्तमानपत्रांतील लेखांचे कांहीं उगम असतात असें अनुभवांतीं माझ्या लक्षांत येऊं लागलें. यांपैकीं कांहीं नित्य व इतर नैमित्तिक असतात. राष्ट्रीय सभा, धर्मपरिषद्, गणपत्युत्सव, सामाजिक परिषद् इत्यादि संस्थांच्या वार्षिक बैठकी ह्या नित्य उगमांखालीं येतात. पहिल्या तिहींचे पोवाडे गाण्यांत व चवथीची थट्टा करण्यांत वर्षांतून चार महिन्यांच्या अंकांची सहज भरती होते. आतां राहिले नैमित्तिक उगम. या सदराखालीं लढाया, राज्यक्रांति, पार्लमेंटच्या निवडणुकी, मृत्यु, विधवाविवाह इत्यादि येतात. ईश्वरानें साम्राज्यवादी लोकांत जें महत्त्वाकांक्षेचें बीं पेरलें आहे तें आम्हां पत्रकर्त्यांच्या फार उपयोगी पडतें. नुसतें बोअर युद्धच माझ्या पत्रास सतत तीन वर्षें पुरलें. तिकडे आफ्रिकेंत बंदुकांची फेर झडूं लागली, कीं इकडे आमच्या लेखांची सरबत्ती सुरू होई. तिकडच्या रक्तपाताच्या बरोबरीनें इकडे आमची शाई खर्च होत असे. तिकडे छापे पडत त्याप्रमाणें आमच्याकडेहि छापखान्यांत पडत असत. तिकडे वेशींस व किल्ल्यांस पडलेले भोंसके जसे सैनिक तांतडीनें बुजवीत असत, तसे इकडे आम्हीहि आपले रकाने भरीत असूं. अखेरीस जेव्हां तह होण्याचें घाटूं लागलें तेव्हां मात्र आमचा निरुत्साह होऊं लागला. सारखीं तीन

वर्षे चेंबरलेनवर कोरडे ओढल्यावर पुनः सुधारकांवर तोंड सोडणें फारच मिळमिळीत वाटूं लागलें. पण ईश्वरास आमची दया, दुसरें काय? दक्षिण आफ्रिकेंतील वैमनस्याची थोडी विझवाविझव होते न होते तोंच उत्तर आफ्रिकेंत वेड्या मुल्लानें धिंगाणा सुरू केला, व पुढें तर राशिया व जपान यांमध्येंहि लढाई उपस्थित झाली; त्यामुळें आमच्या जिवांत जीव येऊन पुनः अन्न पूर्वीप्रमाणें गोड लागूं लागलें.

एकदां कलकत्त्यास राष्ट्रीय सभेची बैठक होणार होती. तिचा अध्यक्ष मुंबईचा एक प्रसिद्ध गृहस्थ होणार होता. त्याच्या चिटणिसाचा व माझा दाट परिचय होता. त्याच्या द्वारें आपणांस अध्यक्षाचें भाषण आयतें लिहिलेलें मिळून तें सर्वांच्या आधीं जादा-पत्रकानें प्रसिद्ध करितां येईल तर आपण तारेनें बातमी मागविली असा लोकांचा समज होऊन आपल्या पत्राची किंमत वाढेल असें मला वाटलें, व मीं ताबडतोब त्या चिटणिसाजवळ ही गोष्ट काढिली. त्यानेंहि मोठ्या आनंदानें त्या भाषणाची नक्कल करून माझ्या स्वाधीन केली. बैठकीच्या पहिल्या दिवशीं मीं तें भाषण छापून त्याच्या हजारों प्रती काढल्या. भाषणांत मधून मधून 'टाळ्या', 'हंशा' असे शब्द पसरण्याची मीं काळजी घेतली होती, व मथळ्यावर "आमच्या खास बातमीदाराकडून मुद्दाम तारेनें आलेली बातमी" हे शब्दहि मोठ्या अक्षरांनीं छापिले होते. संध्याकाळीं माझ्या दुकानांत नेहमींपेक्षांहि जास्ती गर्दी जमली, तेव्हां माझा आनंद गगनांत मावेना. मी डोळ्यांस चष्मा लावून व डोकें वर करून प्रत्येकाकडे आपले कृपाकटाक्ष फेंकूं लागलों. शेवटीं एकानें मला विचारलें, "कां हो पत्रकर्तेराव, आजच्या जादा पत्रकांत अध्यक्षांचें भाषण आलें आहे तें ताबडतोब माग-

विण्यास तुम्हांला बराच खर्च आला असेल नाहीं ?" मीं लागलीच बेपर्वाईचा व कांहींसा अधिकाराचाहि आविर्भाव अंगीं आणून, प्रत्येक शब्दाचा तोल संभाळून व जरासें ठासून उत्तर दिलें, " निरपेक्ष देशसेवेच्या पायीं पैसाच काय, पण प्राणहि खर्ची पडला तरी हरकत नाहीं !"

पुनः त्यानें म्हटलें, " मधून मधून योग्य स्थळीं टाळ्या व हंशाहि दिला तें फार चांगलें झालें. मघांशीं आम्ही सर्वजण मिळून तें भाषण ऐकत असतां त्याच स्थळीं टाळ्या व हंशा उत्पन्न होत होतीं."

मीं म्हटलें, " भाषण होईल तितकें शब्दशः देण्याचा व श्रोत्यांच्या मनोवृत्तीहि यथातथ्य वर्णावयाचा प्रयत्न केला आहे खरा."

यावर त्यानें प्रश्न केला, " का हो, तुमचा बातमीदार भरपूर माहितीचा मनुष्य दिसतो !"

" माझी मनुष्यांची पारख नेहमीं अशचि असते."

" कधीं कधीं तर त्याला घडलेल्यापेक्षांहि अधिक गोष्टींची माहिती आहे असें उघड दिसतें."

" तें कसें ?"

" काल अध्यक्षांचें भाषण न होतांहि ज्या अर्थी त्यानें तें सबंध पाठविलें आहे त्या अर्थी त्याची माहिती खरोखरच विलक्षण असली पाहिजे."

प्रथम मला या बोलण्याचा अर्थ कळेना. परंतु 'कालची राष्ट्रीय सभेची बैठक दोन दिवस लांबली आहे' असें जेव्हां मला कळलें तेव्हां मात्र फजितीला पारावार नाहींसा झाला; व ज्या टाळ्या व जो हंशा मीं सर्व भाषणभर जरा सढळ हातानेंच पेरला होता तो मला प्रत्यक्षच सव्याज अनुभवण्यास मिळाला.

एखादी गोष्ट घडल्याबरोबर तिची तपशीलवार व पद्धतशीर माहिती ताबडतोब वर्तमानपत्रांत येते याचें रहस्य हेंच असतें, कीं त्या माहितीचा लेख ती गोष्ट घडण्याच्या कित्येक दिवस पूर्वी साव-काशीनें लिहिलेला असतो. हें विधान मृत्युलेखास विशेषेंकरून लागू पडतें. जो मृत्यु घडल्याबद्दल लेखक आपल्या लेखांत सखेदाश्चर्य प्रदर्शित करितो त्या मृत्यूबद्दलचा लेख त्यानें कित्येक वर्षांपूर्वी दारूच्या धुंदींत खरडलेला असतो; आणि मृताच्या प्रकृतीबद्दल धन्वंतऱ्यासहि संशय येण्यापूर्वी व तो आपल्या स्त्रीपुत्रांसमवेत आनंदानें नांदत असतां लेखक त्याच्या मृत्यूच्या कारणांची मीमांसा करीत असतो, आणि त्याच्या आत्म्यास शांति देण्याबद्दल परमेश्वरास आळवून त्याच्या कुटुंबाचें पुढें कधीं काळीं होणाऱ्या हानीबद्दल कळकळीनें व उदार बुद्धीनें समाधान करीत असतो !

वृत्तपत्रांस इतर गोष्टींपासून जो पुरवठा होतो त्याबद्दल येथपर्यंत विवेचन झालें. हा सांठा म्हणजे उपासमार होत असलेल्या लांडग्यां-प्रमाणें वृत्तपत्रें एकमेकांवर उदरनिर्वाह करूंच लागतात, आणि एक-मेकांच्या लेखांवर मनसोक्त टीका करून व एकमेकांस मनमुरादें[1] शिव्या देऊन आपल्या अंकाची भरती करतात.

वर्तमानपत्रांतील अग्रलेख व स्फुट लेख लिहिण्यास ज्या अडचणी येतात त्या दूर करण्याचे उपाय वर सांगितले. या लेखांची जागा वजा केली म्हणजे बाकी राहिलेल्या जागेचा बराच भाग नोटिशींनीं व जाहिरातींनीं व्यापिलेला असतो. या जाहिराती बहुतकरून औषधांच्या असतात. यांतच 'नारूवर वस्ताद', 'हॉलोवेचें मलम', 'इसबावर रामबाण औषध' यांचा अंतर्भाव होतो. या औषधांनीं जखमा कितपत भरून येतात हें सांगवत नाहीं. पण पत्रकर्त्यांच्या

---

१ मुराद ( फा. ) इच्छेप्रमाणें.

पिशव्या मात्र खात्रीनें भरतात. तसेंच वुइल्यमच्या पिंक गोळयांनीं रोग्याची क्षुधा प्रदीप्त होते कीं नाहीं हें माहीत नाहीं, पण संपादकांची क्षुधा मात्र शांत होते खरी. साहेबलोकांत वुइल्यमसाहेब व हिंदु लोकांत आंजर्लेकर बिवलकर शास्त्रीबुवा या दोघांना मात्र जाहिरातींपासून होणारा खरा फायदा पूर्णपणें कळून चुकला आहे. तथापि या दोघांच्या जाहिरातींमध्योंहि महदंतर असतें. बिवलकर वाचकांस आपला अभिप्राय सरळ व स्पष्ट रीतीनें कळवितात; पण वुइल्यमसाहेब एखादी गोष्ट सांगण्याचा बहाणा करून व एखाद्या सुंदर स्त्रीस, रोटीवाल्यास किंवा खाणींतल्या मजुरास मध्यस्थी घालून आपला डाव साधतात. रजपुतांची समरांगणावर उभें राहून लढण्याची पद्धत व मराठ्यांचा गनिमी कावा यांत जितकी तफावत असे, तितकीच या दोघांच्या जाहिरातींत असते. वुइल्यमसाहेबांच्या गोष्टी तर फारच मनोवेधक असतात. मीं जेव्हां ह्यांच्या जाहिराती आपल्या पत्रांत देण्यास सुरुवात केली तेव्हां कांहींजणांनीं माझ्या त्या कृतीबद्दल पत्रद्वारें आपली नाखुषी कळविली म्हणून मीं त्या जाहिराती बंद केल्या; पण बंद करण्याचाच काय तो अवकाश, लागलीच मजकडे पत्रांवर पत्रें येऊं लागलीं, कीं तुमच्या सबंध पत्रांत त्या जाहिरातीच काय त्या चांगल्या लिहिलेल्या असतात, व त्या बंद कराल तर आम्हीहि पत्र बंद करूं. माझ्या अल्पसंतोषी वाचकांच्या मर्जीखातर मीं त्या पूर्ववत् चालू ठेविल्या आहेत.

माझ्या पत्रांत ज्या औषधांच्या जाहिराती येतात त्यांपैकीं कांहींच्या गुणांसंबंधानें मला स्वतःला अनुभव आला आहे. माझ्या छापखान्यांतील एका इसमास संधिवात झाला होता, तो त्यावरील औषधाच्या जाहिरातीवरून रूळ फिरविल्यानेंच बरा झाला. तसेंच माझ्या नोकरांपैकीं एक कुणब्याचा मुलगा तोतरें बोलत असे, त्याला त्या-

वरील औषध देऊन पाहिलें तेव्हां त्याचा तोतरेपणा समूळ गेला इतकेंच नाहीं, तर तो मराठी भाषा शुद्धहि बोलूं लागला. कोडावरील मलमाची जाहिरात माझ्या पत्रांत ज्या जागीं नेहमीं असते ती जागा दर आठवड्यास कमी कमी पांढरी होत चालली आहे; आणि रक्त-पितीवरील औषध एका महारोग्यास देऊन पाहिलें तेव्हांपासून त्याचा रोग समूळ नाहींसा झाला आहे; कारण तें रामबाण औषध पोटांत जाण्याला व त्याचा प्राण बाहेर येण्याला एकच गांठ पडली.

माझ्या पत्रांतील वर्तमानसार जितकें मनोरंजक करवेल तितकें करण्याकडे माझा कल आहे. यामुळें माझे वाचक मजवर फार खूष असतात. वाचकांस रंजविण्याकरितां वेळेस मला पदरचें तिखटमीठ जरी घालावें लागलें तरी त्या पदरमोडीला माझी एका पायावर तयारी असते. यामुळें माझ्या पत्राचें फाईल चाळल्यास खालीलप्रमाणें माहिती जागोजाग सांपडेल:—

" अमेरिकेंत क्युमेलो या गांवीं एका बाईस एक तीन तोंडांचें मूल झालें. त्याच्या सर्वांगावर केस असून एका तोंडावर कपाळा-च्या मधोमध शेपटी होती. मूल एक तासभर जिवंत होतें. रावणाच्या अस्तित्वाविषयीं संशय बाळगणाऱ्या सुधारकांचें तोंड या तितोंडी प्राण्यानें बंदच केलें म्हणावयाचें ! "

" भोळेगांव येथील प्रसिद्ध देवालयांतील मारुतीस रामनवमीचे दिवशीं दरदरून घाम सुटला. हें दुश्चिन्ह आहे असा ज्ञात्यांचा अभिप्राय आहे. हा चमत्कार पाहण्यास खूप गर्दी जमली होती. प्रत्येकापासून एक एक पैसा घेऊन आंत सोडण्यांत येई. ही रक्कम जमतां जमतां शंभर रुपयांवर गेली आहे. मारुतीच्या निढळाच्या घामाच्या या रकमेचा विनियोग संकटनिवारणार्थ ब्राह्मणसंतर्पण करण्यांत होणार आहे. धर्मद्वेष्ट्यांचें इकडे लक्ष जाईल काय ? "

" लंबेडो येथें एक धरणीकंपाचा धक्का बसला. त्यामुळें जमिनीला जी एक मोठी भेग पडली तिच्यांतून शेषाचें मस्तक दिसत होतें. शेषाच्या मस्तकावरील मण्यामुळें त्या भेगेंत चोहोंकडे प्रकाशच प्रकाश झाला होता. याउप्पर पुराणें खोटीं असें म्हणण्याचें धाडस कोण करील ? "

वरील गांवें केवळ कपोलकल्पित आहेत. हें धूर्त वाचकांनीं ताडलेंच असेल. श्रीकृष्णाच्या मुखविवरांत अर्जुनास जे अनेक चमत्कार दिसले त्या मासल्याचे माझ्याहि कपोलांतील चमत्कार मी वाचकांपुढें मांडीत असतों.

एकदां एका सामान्य मासिकाचें अनुकरण करून मीं 'वर्तमान-सार' या शब्दाबद्दल 'सारसंग्रह' हा शब्द योजावयास सुरुवात केली. पण लवकरच माझ्या एका वात्रट वाचकानें त्या शब्दाच्या मागें 'अति' व पुढें 'णी' जोडून आणि त्याच्याच लगत 'मोर नाचूं लागलेला पाहून लांडोर नाचूं लागली' हें वाक्य लिहून माझा अंक मजकडे परत केला. तेव्हांपासून मीं त्या शब्दाचा त्याग केला आहे.

एखादा मोठा मनुष्य मरण पावला म्हणजे मी त्याच्या सन्मानार्थ मोठ्या आनंदानें–आनंदानें कसचें ! दुःखानें– एक अंक बंद ठेवीत असतों. महाराणीसाहेबांच्या मरणप्रसंगीं तर मी एक महिनाभर अंक बंद ठेवण्यास तयार झालों होतों; पण वाचकांपुढें इलाज चालेना.

मध्यंतरीं एक मासिक पुस्तक काढण्याचाहि माझा विचार होता पण मासिक पुस्तक बगीचाप्रमाणें असून वर्तमानपत्र हें शेताप्रमाणें असतें; म्हणजे मासिक पुस्तक अधिक सुंदर, व्यवस्थित व टिकाऊ असलें तरी त्याला आद्यापेक्षां खर्चच अधिक लागतो; आणि वर्तमानपत्र जरी तात्पुरत्या महत्त्वाचें असलें तरी तें उत्पन्नाला बरें

असतें. शिवाय मासिक पुस्तक काढलें म्हणजे त्याबरोबर अनियमित होण्याची जबाबदारी संपादकाच्या माथीं येऊन पडते. ज्याप्रमाणें राजास छप्परपलंगावरून उशिरानेंच निजून उठावें लागतें त्याप्रमाणें मासिकासहि ग्राहकाच्या हातीं महिन्याच्या महिन्यास पडून उपयोग नाहीं. कांहीं मासिकें तर इतर सृष्टि दिवाळीच्या उत्सवांत मग्न असतां शिमग्याचा सण साजरा करीत असतात, व अवर्षणानंतरच्या पुढील सालीं पीक येऊन सुबत्ता झाल्यावरहि दुष्काळाच्या विवंचनेंत चूर राहून दुष्काळी कामांची व्यवस्था कशी असावी याची मुद्देसूद वाटाघाट करीत असतात. हा सर्व विचार करून मीं मासिक पुस्तक काढण्याचा आपला विचार रहित केला.

पत्रकर्त्याच्या स्थानाला लोकांत मान बराच असतो हा या धंद्याचा एक मोठा फायदा आहे. त्याला वाटेल त्या सभेस जाण्याची पूर्ण मोकळीक असते. त्याच्याकरितां राष्ट्रीय सभेसारख्या परिषदांत मुद्दाम निराळें आसन राखून ठेविलेलें असतें. शिवाय त्याला वाटेल त्या पुरुषास वाटेल तेव्हां उपदेश करितां येतो. एकदां तर मीं खुद्द बिस्मार्कसाहेबांस राज्य कसें हांकावें याचा उपदेश केला होता व दुसऱ्या प्रसंगीं मॉर्लेसाहेबांस ग्रंथरचनेच्या कामीं सूचना करून थोडेंसें प्रोत्साहनहि दिलें होतें. गांवांत नाटक मंडळी आली म्हणजे तिच्याकडून आम्हांस दर नाटकास एक दोन पास ठरलेले असतातच. जर नाहीं आले तर आम्ही लागलीच मंडळीवर टीका करून तिला 'दे माय धरणी ठाय' करून सोडतों. ग्रंथकर्त्यांनीं नवीन पुस्तकें प्रसिद्ध केलीं म्हणजे आम्हांकडे त्यांनीं एक एक प्रत पाठविलीच पाहिजे; नाहीं पाठविली तर आम्ही चाबूक ओढओढून मारे त्यांच्या पाठीची सालडीं काढितों. आमचा सर्वांत मोठा

अधिकार म्हटला म्हणजे आम्ही आत्मनिर्देश एकवचनांत न करितां अनेकवचनांत करितों.

अजून माझ्या पत्राचा खप असावा तितका समाधानकारक नाहीं. वर निर्दिष्ट केलेल्या उपायांशिवाय लोकप्रियतेचा आणखी एक उपाय राहिला आहे, व त्याची प्रचीति मी लवकरच पाहणारहि आहें. तो उपाय कारागृहवास हा होय. मला अशी विश्वसनीय माहिती मिळाली आहे, कीं संपादकाच्या प्रत्येक बंदिवासास वर्गणीदारांची संख्या पांच हजारांनीं तरी वाढते. अलीकडे कांहीं लोकमान्य पुरुष कैदेंत गेल्यापासून कैदेचा दोषहि कमी झाला आहे. आजपर्यंत मी कैदेंत जाण्याकरितां दोन तीन वेळां संभावित लोकांची अब्रू तिखटमीठ लावून चव्हाट्यावर आणली, पण व्यर्थ! त्यांनीं मजवर अब्रुनुकसानीची फिर्याद आणिली नाहीं व माझ्या हातांपायांचा कंडू शृंखलांनीं शमावयाचा तसाच राहिला. आतां यापुढची पायरी म्हणजे चोरी होय; व तिच्यांत मला हटकून यश येणार असें माझ्या होऱ्यांत येत आहे. जर चोरी पचली तर डबोलें हातीं येऊन मी जन्माचा सुखी होईन; जर उघडकीला येऊन खटला झाला तर कैदेंत जावें लागून वर्गणीदार वाढतील! याप्रमाणें एकीकडे सुखातिशयाचा आड तर दुसरीकडे विहीर असें होऊन मी त्यांमध्यें मनांतल्या मनांत आनंदाच्या गटंगळ्या खात आहें.

श्री० कृ० कोल्हटकर

(सुदाम्याचे पोहे–मुष्टि ११ वी.)

**प्रश्न व सूचना**

(१) श्लेष व अतिशयोक्ति यांचीं या उताऱ्यांतील उदाहरणें द्या.

(२) कोटी व विनोद यांतील फरक काय हें या उताऱ्यांतील उदाहरणें घेऊन सांगा.

( ३ ) या उताऱ्यांतील कांहीं उदाहरणें देऊन कोल्हटकरांच्या विनोदांतील गुणदोषांचें विवेचन करा.

( ४ ) उत्तम वर्तमानपत्रकार व्हावें अशी महत्त्वाकांक्षा तुम्हांला आहे असें गृहीत धरून ह्या लेखापासून तुम्ही काय बोध घ्याल तें सांगा.

( ५ ) 'मी लोकनायक कसा बनलों' यावर कोल्हटकरी पद्धतीनें एखादा विनोदी लेख लिहिण्याचा प्रयत्न करा.

( ६ ) दवाखाना, अहोरात्र, निढळ, घर्मबिंदु, बाष्कळ या शब्दांची व्युत्पत्ति देऊन अर्थ सांगा.

---

# संत व सत्संगाची महती

[ भक्तिमार्गाची आवड असलेले आधुनिक विद्वान् हरिभक्तिपरायण लक्ष्मण रामचंद्र पांगारकर यांच्या लेखणीतून उतरलेला पुढील उतारा कांहींना किंचित् कठीण वाटला तरी संस्कृताशीं परिचय असलेल्यांना तो अतिशय रम्य वाटेल. पांगारकर हे स्वतः संस्कृत व प्राकृत भक्तिपर वाङ्मयांत इतके रममाण व समरस होऊन जाणारे आहेत, कीं ते बोलत किंवा लिहीत असतां सहजगत्या सुंदर श्लोक, ओव्या वगैरे त्यांस आपोआप आठवतात व त्यामुळें त्यांची वाणी रसाळ व परिणामकारक वाटते. त्यांचा संतवाङ्मयविषयक व्यासंग सुप्रसिद्ध आहे. त्यांनीं नुकताच 'मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड पहिला' हा ग्रंथ प्रसिद्ध केला असून पुढील उतारा त्यांतूनच घेतला आहे. ]

आपल्यापेक्षां वरिष्ठांची संगति आपल्या उन्नतीला कारण होते हा जगांतला अनुभव आहे. सर्वच श्रेष्ठ पुरुष आपल्याला गुरुरूप असतात; मग ज्यांनीं सत्यस्वरूप परमात्मा आपलासा केला, सत्‌चें चिंतन करितां करितां जे सत्स्वरूप झाले, त्यांच्या संगतीपेक्षां अधिक लाभदायक काय आहे? सत्संगांत संतांना जें प्रिय तें आपल्याला

आवडावयाला लागतें, ते ज्यांचा त्याग करितात त्या गोष्टी त्याज्य वाटूं लागतात व मनुष्य संतसंगतींत संतच होतो. संतांना देव अत्यंत प्रिय किंबहुना संत हीं देवाचीं बोलतीं चालतीं रूपें आहेत. त्यांच्या दर्शनाबरोबरच शुद्ध संस्कार जागृत होऊन पावनता येते.

येषां संस्मरणात्पुंसां सद्यः शुद्ध्यन्ति वै गृहाः ।
किं पुनर्दर्शनस्पर्शपादशौचासनादिभिः ॥ ( स्कंद १-१९-३३ )

संतांची सेवा केली असतां 'भक्तिर्भवति नैष्ठिकी' (१-२-१८). ध्रुवप्रल्हादादि असंख्य भक्त सत्संगानेंच उद्धरले आहेत, फार काय पण सत्संगाशिवाय कोणीहि उद्धरला नाहीं असेंहि म्हणायला हरकत नाहीं. संतांपासूनच जगाला सुखसमाधान मिळतें. मनुष्याची पशुवृत्ति दवडून त्याला देव बनविण्याचें सामर्थ्य संतांत असतें. संत पतितांना तारतात, जडाला बुद्धि देतात. दगडाचे देव बनवितात. ऋषभदेव आपल्या पुत्रास सांगतात,



ल. रा. पांगारकर

कीं, 'महत्सेवां द्वारमाहुर्विमुक्तेस्तमोद्वारं योषितां संगिसंगम्'। ( स्कंद ५-५-२ ) संतसेवा हें मोक्षाचें व स्त्रैणांचा संग हें नरकाचें द्वार आहे ! संत हे समचित्त, शांत व दयाळू असतात. ज्ञान हें तपानें मिळत नाहीं, यज्ञयागानें, अन्नदानानें, वेदाभ्यासानें मिळत नाहीं, सत्पुरुषांची पायधूळ मस्तकीं धारण केल्यावांचून म्हणजे संतांना शरण गेल्यावांचून कशानेंहि मिळत नाहीं; कारण संतांच्या घरीं पुण्यश्लोक भगवंताच्या गुणांचें गायन नित्य चाललेलें असतें ( उत्तमश्लोक-

गुणानुवाद ), तेथें विषयांच्या गोष्टींना ( ग्राम्यकथा ) प्रतिबंध असतो, रोजरोज भगवत्कथा कानांवर पडत असल्यामुळें मुमुक्षूंची बुद्धि निर्मळ होऊन वासुदेवाच्या स्वरूपीं ती अनायासें रंगते ( स्कं. ५–१२–१३ ). "महीयसां पादरजोभिषेकम्"–संतांच्या पायधुळींत लोळण घेतल्याशिवाय भक्ति-सुख प्रिय होत नाहीं व भक्तीवांचून भवदुःखाची निवृत्ति होत नाहीं ( स्कं. ७–५–३२ ). गुरुसेवा, भक्ति, आत्मनिवेदन, साधुभक्तांची संगति, व ईश्वराराधन हे संतांचे सहजधर्म आहेत (७–७–३०); व याचें रहस्य त्यांच्या संगतींतच साधकांना समजत असतें. "दयया सर्वभूतेषु संतुष्ट्या येन केन वा। सर्वेंद्रियोपशान्त्या च तुष्यत्याषु जनार्दनः।" ( ४–३१–१९ ). असा भगवत्प्रसादाचा राजरस्ता संत सांगत असतात. "संतुष्ट व स्वात्माराम झालेल्या पुरुषाला जें सुख आहे तें कामलोभानें दशदिशां धांवणाऱ्यांच्या" कपाळीं कोठचें? "सदा संतुष्टमनसः सर्वाः सुखमयाः दिशः।" ( ७–१५–१७ ). पर-दुःखानें विव्हळ होणें व भूतांच्या हितार्थ झटणें हा साधूंचा स्वभाव असतो, हेंच सर्वांतर्यामी परमेश्वराचें आराधन आहे.

तप्यन्ते लोकतापेन साधवः प्रायशो जनाः।
परमाराधनं तद्धि पुरुषस्याखिलात्मनः॥ ८–७–४४॥

व म्हणूनच समस्त संसारपरिश्रम हरणारें भगवंताचें जें गुणानुवर्णन त्यांत ते स्वतः रमतात व जगास रमवितात ( १२–७–४६ ). भगवान् म्हणतात लोकांच्या दुःखाची आंच माझ्या भक्तांच्या हृदयाला लागली, कीं ती माझ्या हृदयाला लागते; कां कीं, "साधवो हृदयं मह्यं साधूनां हृदयं त्वहम्। मदन्यत्ते न जानन्ति नाहं तेभ्यो मनागपि" ( ९–४–६८ ) साधु माझें हृदय आहेत व मी साधूंचें हृदय आहें, ते मजवांचून दुसरे कोणी जाणत नाहींत व मी

त्यांच्यावांचून कांहींहि जाणत नाहीं. याप्रमाणें देव-भक्त अगदीं एक-मय आहेत, म्हणून साधूंना लोकदुःखाची आंच बसतांच ती देवाच्या हृदयाला बसते व साधूंचें हें परतापजनित दुःख दूर करण्यासाठीं भगवंताला अवतार घ्यावे लागतात! " परित्राणाय साधूनां.... संभवामि युगे युगे।" या गीतावचनाचा अर्थ असा आहे, म्हणूनच " साधवो दीनवत्सलाः।" असें म्हटलें आहे. दुष्टांकडून साधूंचा वेळोवेळीं छळ केला जातो, पण शेवट पाहिला तर पापी मनुष्य आपल्या पापानेंच मरतो व साधूची सर्वत्र समबुद्धि असल्यामुळें तो सर्व संकटांपासून मुक्त होतोः–"हिंस्रः स्वपापेन विहिंसितः खलः। साधु समत्वेन भयाद्विमुच्यते।" (११–७–१३).

न ह्यम्मयानि तीर्थानि न देवा मृच्छिलामयाः।
ते पुनंत्युरुकालेन दर्शनादेव साधवः॥ १०–८४- ११.

उदकें हीं खरोखर तीर्थें नव्हत, व मृत्तिकापाषाणांच्या प्रतिमा ह्या देव नव्हत ( त्यांना तीर्थपण व देवपण संतांमुळें येतें. ) कारण त्यांना लोकांना पावन करायला पुष्कळ काळ लागतो, व साधु तर दर्शनमात्रानें जीवांचा उद्धार करितात. देव, तीर्थें, व क्षेत्रें दर्शन-स्पर्शनार्चादिकांनीं पावन करितात. पण तीं दीर्घकालानें; आणि हीसुद्धां त्यांच्या ठिकाणची शक्ति साधूच्या समागमामुळेंच त्यांना येते. भगवान् उद्धवाला म्हणतातः—

न तथा मे प्रियतम आत्मयोनिर्न शंकरः।
न च संकर्षणो न श्रीर्नैवात्मा च यथा च भवान्॥ १५॥
निरपेक्षं मुनिं शांतं निर्वैरं समदर्शिनम्।
अनुव्रजाम्यहं नित्यं पूयेयत्यंघ्रिरेणुभिः॥ ११–१४–१६॥

उद्धवा! तूं मला जितका प्रिय आहेस तितका माझा पुत्र ( आत्मयोनि, ब्रह्मदेव ) प्रिय नाहीं. सखा शंकर, भाऊ बलराम,

भार्या लक्ष्मी, फार काय पण माझा मीहि मला प्रिय नाहीं! निरपेक्ष, मननशील, शांत, निर्वैर व समदर्शी अशा संतांच्या व भक्तांच्या मागें मागें मी फिरत असतों, तो एवढ्याचसाठीं, कीं त्यांच्या चरणधूळीनें मीं माझ्या उदरांतील ब्रह्मांडांना पावन करून घ्यावें! म्हणून मी म्हणतों, कीं इतर सर्वसंग सोडून—ते खरोखरीच दुःसंग आहेत—केवळ संतांचाच संग करावा. मनाची विषयप्रीति संत उठवितात—

संतो दिशंति चक्षूंषि बहिरर्कः समुत्थितः ।
देवता बांधवाः संतः संत आत्माहमेव च ॥ ११-२६-३४ ॥

संत डोळे देतात. अंतर्बाह्य प्रकाश पाडणारे संत होत! संतच देव, संतच बांधव, संतच आत्मा. फार काय संतच मूर्तिमंत परमेश्वर होत!

ल० रा० पांगारकर
(मराठी वाङ्मयाचा इतिहास—खंड १.)

प्रश्न व सूचना

(१) श्लोकांचे अर्थ सामान्यतः श्लोकाखालीं आलेलेच आहेत. शब्दशः अर्थ शिक्षकांना विचारावा.

(२) सत्संगानें मनुष्य सुधारतो याचीं इतिहासांतील (किंवा लहानशा प्रमाणांत का होईना तुमच्या अनुभवांतील) उदाहरणें द्या.

(३) [अ] पुढील शब्दांचा अर्थ द्याः—समचित्त, मुमुक्षु, साधक, पुण्यश्लोक, स्वात्माराम.

[आ] पुढील वाक्याचा अर्थ उदाहरणांनीं स्पष्ट करून सांगाः—'पापी मनुष्य आपल्या पापानेंच मरतो.'

---

# माझी आगगाडी कशी चुकली

[रा० न. चिं. केळकर हे जरी लघुकथा-लेखक म्हणून फारसे प्रसिद्ध नसले, तरी त्यांच्या कांहीं गोष्टी उत्तम लघुकथांत मोडतील अशा आहेत. 'माझी आगगाडी कशी चुकली' ही अशा लघुकथांपैकींच एक आहे. लघुकथांमध्यें एकाच गोष्टीवर विशेष भर असतो, मग ही गोष्ट विशिष्ट स्वभावाचित्रण असो,

किंवा चमत्कारपूर्ण प्रसंगाचें वर्णन असो, किंवा एखाद्या संस्मरणीय भावनेचें आविष्करण असो, अगर विविष्ट वातावरणाचें दिग्दर्शन असो, किंवा एखाद्या विविष्ट स्थानाचें वगैरे रसपूर्ण वर्णन असो. प्रस्तुत लघुकथेंत कोणत्या गोष्टीवर भर दिला हें वाचकांना समजून येईलच. ]



न. चिं. केळकर

आमच्यामध्यें आग्रहाची एक चाल मोठी वाईट आहे. पाहुणचार हा गुण खरा, पण फाजिल पाहुणचार हा अवगुण असून तो संतोषापेक्षां असंतोषालाच अधिक वेळां कारण होतो. पाहुणचार याचा अर्थ पाहुण्याचा संतोष. पण जी गोष्ट पाहुण्याला नको किंवा जी गोष्ट त्याला गैरसोईची असेल ती त्याचेवर लादणें हा मार्ग पाहुणचाराच्या अगदीं उलट्या दिशेचा होय. पण दुर्दैवानें आदरातिथ्याच्या भरांत आम्ही ही साधी गोष्ट विसरून जातों. त्याचा परिणाम कित्येक वेळां खरोखर असा होतो, कीं पाहुणा घरून जातांना गोड तोंडानें व धन्यवाद गात जावा तो आंबट तोंड करून व प्रत्यक्ष शिव्याशाप देत नसला, तरी मनांतल्या मनांत निंदा करीत जातो.

कांहीं दिवसांपूर्वीं लोणावळें स्टेशनापासून सुमारें चार मैलांवर असलेल्या एका गांवीं कांहीं कामाकरितां जाण्याचा मला प्रसंग आला होता. ज्यांच्याकडे मी गेलों ते गृहस्थ माझ्या वडिलांच्या जुन्या ओळखीचे असून त्यांचा व आमचा विशेष घरोबा होता. त्यांच्या गांवीं पुष्कळ वर्षांत न गेल्यामुळें या माझ्या भेटीला एक

प्रकारचें महत्त्व होतें, व मी तेथें गेल्यावर माझा चांगला पाहुणचार होणार अशी अपेक्षा होती. पण दुर्दैवानें तेथें चार दिवस स्वस्थ राहून पाहुणचार झोडण्याइतका मला वेळ नव्हता. मला सोमवारीं सकाळच्या मेलनें मुंबईस जावयाचें असून रविवारची रात्र तेवढी या गांवीं मला काढतां येण्यासारखी होती. सकाळच्याच मेलनें मी पुढें जाण्याचें कारण असें, कीं त्या दिवशीं दोन प्रहरीं माझा एक स्नेही एका फ्रेंच बोटीनें विलायतेला जाणार होता व तो जातांना त्याची माझी गांठ पडण्यावर त्याचें व माझें शेंकडों रुपयांचें नफा-नुकसान अवलंबून होतें. त्या काळीं पुण्याची मेल सकाळीं लोणावळ्याहून सवानऊ वाजतां सुटत असे. तिनें मी गेलों तर बोट सुटण्याच्या आधीं दीड तास मी मुंबईस पोंहोचावयाचा; आणि ती गाडी चुकली तर पुढें चार तास गाडी नाहीं व बोटीनें जाणाऱ्या मित्रास भेटणें मुळींच शक्य नाहीं अशी स्थिति होती. या गांवीं लोणावळ्याहून जाण्यायेण्याचा रस्ता भातखाचरांतून असून त्यांवरून गाडी जाई, पण मोठ्या कष्टानें; आणि बैल चांगले व हाकणारा चांगला असें असलें तर या चार मैलांच्या प्रवासास कमींत कमी सवा तास लागेल असें होतें.

असो. सदर गांवीं मी रविवारीं रात्रीं पोंचलों. रात्रीचा पाहुण-चार तर यथास्थित झालाच; पण रात्रीची गोष्ट आपल्या हातची, तास अर्धा तास जाग्रण अरतें परतें इतकेंच, असें समजून मीं तो पाहुणचार आमचे यजमान दादासाहेब यांच्या इच्छेप्रमाणें सर्व घेतला. अखेर गाण्याबजावण्याशिवाय सर्व पाहुणचार फुकट, अशी कल्पना येऊन दादासाहेबांनीं गांवांत चांगला गाणारा असा मानला गेलेला गृहस्थ होता त्याला बोलावण्याचा घाट घातला.

मी म्हणालों. " उगाच तसदी कशाला घेतां ? १०–१८॥

वाजण्याचा सुमार आहे व जेवणहि यथेच्छ झाल्यामुळें मला झोंप येत आहे. शिवाय सकाळींहि मला लवकर उठलेंच पाहिजे. म्हणून मला वाटतें आतां झोंपीं गेलेलें बरें ! ''

यावर दादासाहेब म्हणतात, '' छेः, असें कुठें झालें आहे कीं काय? तुम्ही शहरचे राहणार. तुम्हांला रहिमतखान, बंदेअली असल्या गवय्या-बजवय्यांचीं गाणीं-बजावणीं ऐकण्याची संवय. तुम्हांला आमच्या खेडेगांवचें गाणें कसलें पसंत पडतें म्हणा? पण खेडेगांवचा मासलाहि तुम्हांला दाखविला पाहिजे.''

जवळच्या मंडळींनींहि त्यांच्या म्हणण्याची री ओढली व गाण्याच्या बैठकीच्या तयारीस प्रारंभ झाला. खेडेगांवांतली गाण्याची तयारी म्हणजे संन्याशाच्या लग्नाला जशी शेंडीपासून तयारी तशी. गाणें खेडेगांवचें पण तें साथीशिवाय कसें होणार? तंबोरा पाहिजे. तो एक आणण्यास गेला. गांवच्या गुरवाकडे तबला खाचित असावा असें अनुमान करून दुसऱ्यास तिकडे धाडण्यांत आलें. मुख्य गवई-बुवा त्या रात्रीं गांवांत आहेत असें कोणी म्हणे व कोणाचा समज असा होता, कीं ते संध्याकाळीं परगांवीं कामास निघून गेले असावेत. तथापि त्यांच्याहि शोधाला मनुष्य धाडण्यांत आला.

अशा रीतीनें चहूंकडे मनुष्यें शोधाला गेलीं व सुमारें १५-२० मिनिटेंपर्यंत कोणी आलें नाहीं असें पाहून मला मनांत एक प्रकारें आनंदच झाला. मी मनांत म्हणालों, '' बहुधा गाण्याचा प्रसंग टळला असें दिसतें.'' पण वरउपचारी म्हणालों, '' खेडेगांवचें गाणें झालें म्हणून काय झालें? एखादा गवई चांगला असतो, मधुर गळा असला म्हणजे गाण्याची बहुतेक गोडी त्यात आलीच. पण आतां उशीर झाला आहे. ११ वाजायला आले तेव्हां आतां निजावें हेंच बरें. ''

दादासाहेब म्हणाले, "छेः छेः, असें कुठें झालें आहे कीं काय? आमच्या तिंबूबुवांचें गाणें तर ऐका. तो एका मुसलमान वस्तादाजवळ दोनतीन वर्षें चिलीम भरून देत होता. मग गाणें आल्याशिवाय त्याला कसें राहील! शेण जमिनीवर पडेल, तर थोडी तरी माती घेऊन उठेलच. आतां गुरूच्या संगतीनें हे बुवाहि थोडेसे तऱ्हेवाईक झाले आहेत खरे. त्यांची तार लागेल तरच एखादी चीज म्हणतील, नाहीं तर प्राण गेल्यानें आ म्हणून करणार नाहींत; पण—"

इतक्यांत तंबोरा आणण्यास गेलेला मनुष्य परत आला, व म्हणाला, "सदूदादाकडून काल त्या अंबाजीनें तंबोरा नेला तो तिकडेच आहे."

दादासाहेब म्हणाले, "अरे, हात हालवीत काय आलास? धाव मार, जायला फार तर अधा घटका. अंबाजीचें घर काय असें चार कोस थोडेंच आहे? जवळच्या वाडींत तर राहतो. जा, जा घेऊन ये."

हें ऐकून तो मनुष्य कां कूं करीत निघून गेला.

मीं म्हटलें; "दादासाहेब, राहीना का! उगाच कशाला त्याला हेलपाटा देतां?"

ते म्हणाले, "अहो, हीं आमचीं खेडेगांवचीं माणसें म्हणजे अशींच चुकारतट्टू! त्यांना असे हेलपाटेच दिले पाहिजेत."

इतक्यांत गुरवाकडून मनुष्य येऊन सांगूं लागला कीं, "गुरव जेवीत बसला आहे. तो म्हणतो, तबल्याच्या वाद्या तुटल्या आहेत, पण जरा दम धराल तर त्या गांठून आणि ठोकळे बडवून देईन."

मी घड्याळाकडे पाहून म्हणालों, "जाऊं दे कीं, कशाला इतका त्रास!" दादासाहेब म्हणाले, "छेः, असें करून कसें चालेल? तुम्ही आज एक दिवस आलां; पण इथल्या लोकांशीं

आमची नित्य गांठ. जेव्हांच्या तेव्हां या लोकांकडून काम चोपून घेतलें तर बरें, नाहीं तर हे उरावर बसलेच."

*मी मनांत म्हणालों, "हा माझा पाहुणचार कीं दादासाहेबांच्या अंमलबजावणीची परीक्षा ?"*

दादासाहेब म्हणाले, "जा, गुरवाला सांग क्षणभर लागला तरी हरकत नाहीं, पण म्हणावं तबला दुरुस्त होऊन आलाच पाहिजे."

अकरा वाजून १० मिनिटें झालीं, इतक्यांत गवईबुवाकडे गेलेला मनुष्य आला. तो म्हणाला, "तिंबूबुवा गांवांत घरींच आहेत, गांवाला गेले नाहींत; पण म्हणतात, अमांश झाल्यामुळें आज रेचक घेतलें होतें. तब्यत बरी नाहीं, त्यांतूनहि आज्ञा होईल-च तर थोड्या वेळांत येतों."

दादासाहेब म्हणाले, "हेंच तें, म्हटल्याबरोबर कोणी येईल तर शपथ ! पण यांना एकदां सैल सोडलें, कीं हे बसलेच उरावर. तें कांहीं नाहीं, तूं परत जा आणि तिंबूबुवांना म्हण, कीं असाल तसे या. येथें तुम्हांला औषध मिळेल. चार पदें म्हणून जा म्हणजे झालें."

झालें. तंबोरा, तबला व गवई यांचा अशा रीतीनें अजून ठिकाण नाहीं व मला तर चांगलीच झोंप येऊं लागली, तरी मला निजूं देण्याची बुद्धि दादासाहेबांस होईना. गवई नाहीं तर नाहीं, गवयांच्या गोष्टी सांगितल्यानें तरी माझा संगीत पाहुणचार होणार असें वाटून कीं काय, त्यांनीं मला तिंबूबुवांच्या एकेक गोष्टी सांगण्यास आरंभ केला.

मी टुकडे पेंगत होतों; मधून मधून घड्याळ काढून पहात होतों; व चूळ भरून टाकून डोळ्यांला पाणी लावीत होतों; पण कांहीं

केल्या दादासाहेबांस माझी दया येईना. तिंबूबुवाला गाण्याची आवड कोणी लाविली; त्याची आणि त्याच्या वस्तादाची गांठ गांजा ओढण्याच्या एका अड्ड्यांत कशी पडली; तो आपल्या वस्तादाच्या मौजेच्या गोष्टी कशा सांगतो; त्यानें एका भर मजलशींत तंबोऱ्याच्या चारी तारा तोडून बदरंग कसा केला; त्यानें दुसऱ्या एका प्रसंगीं मृदंगास लावण्यास आणलेली कणीक भूक लागल्यामुळें कोणास न कळत हळूच कशी खाल्ली; तो गाण्यापेक्षां गाण्याच्या गप्पा मारूनच वेळ अधिक कसा काढतो; त्याचें व तबलजीचें एकदां भांडण होऊन त्यानें तंबोरा उचलून तबल्यावर हापटल्यामुळें दोन्हीहि कसे फुटून गेले; साधारण मनुष्यानें एखादें पद किंवा राग नांव घेऊन गा म्हटलें, म्हणजे "आपल्या वडिलांनीं तरी तें कधीं ऐकलें होतें का?" असें म्हणून तो अपमान कसा करी वगैरे अनेक गोष्टी खुलवून सांगण्यास दादासाहेबांनीं प्रारंभ केला.

मी म्हणालों, "दादासाहेब, खरोखरच मला गाण्याची हौस नाहीं."

दादासाहेब म्हणाले, "छे:, असें कुठें झालें आहे कीं काय? तुमचें शहरचें पंचपक्वान्न रोज चालूच आहे; पण आमच्या खेडेगांवच्या चिंचेचा ठेंचा एक दिवस तरी खाऊन पहा."

अकरा वाजून पंचवीस मिनिटें झालीं. इतक्यांत तिंबूबुवा खोकत आणि हातांतील काठी टेंकीत टेंकीत येऊन दाखल झाले. दादासाहेबांनीं गड्यास बैठक घालण्यास हुकूम केला.

बुवा म्हणाले, "काय दादासाहेब, काय आज्ञा आहे?"

दादासाहेब म्हणाले, "अहो, आज्ञा कसची? तुम्ही आमच्या

गांवचें सौभाग्य ! हे मोठ्या शहरचे मोठे पाहुणे. कधीं नव्हे ते आपल्या घरीं आले. यांना चार पदें ऐकवा; दुसरें काय ? "

बुवा म्हणाले, " हो ऐकवूं त्यांत काय ? पण माझा घसा आज बसला आहे व प्रकृतिहि साफ नाहीं."

मी पडत्या फळाची आज्ञा घेऊन म्हणालों, " बुवासाहेब, आपण आलां इतकें पुरें झालें. आपली प्रकृति नादुरुस्त आहे, आपल्याला मुळींच त्रास देण्याची माझी इच्छा नाहीं. "

पण बुवांना चढविण्याच्या हेतूनें दादासाहेब म्हणाले, " अहो, कसली प्रकृति आणि कसलें काय ? आमच्या बुवासाहेबांची लहर मात्र लागली पाहिजे ! एकदां ते घसा खांकरून आ करून बसले म्हणजे त्यांना भीमाचें बळ येतें. रात्र सहज उजाडायची ! "

मी मनांत म्हणालों, " ईश्वर करो आणि तसा प्रसंग आज तरी न येवो."

बुवासाहेब म्हणाले, " असें तर खरेंच आहे. वेळेचा गुण कांहीं वेगळा असतो." असें म्हणून त्यांनीं गाण्याच्या ऐवजीं आपल्या आयुष्यांतील आठवणी सांगण्यास हळुहळू प्रारंभ केला. आणि दादासाहेब आणि बुवा दोघेहि रंगांत आले होते व मधून मधून जोरानें हंसत होते. मीहि हंसण्याचा मधून मधून प्रयत्न करीं, पण इकडे डोळ्यांत झोंप भरलेली व दुसरे दिवशीं लवकर जेवून निघून गाडी गांठायला सांपडते कीं नाहीं या भीतीचा वायगोळा क्षणोक्षणीं पोटांत उठत होता तेव्हां मला कसचें हंसूं येणार ?

हें चाललें आहे तोंवर तबल्याकडे गेलेला मनुष्य तबला तर घेऊन आला. तबल्याच्या दोन भांड्यांपैकीं मुख्य भांड्याची शाई बहुधा उडालेली होती व डग्ग्याच्या कांतडयाला चीर पडली होती. मिळून दोन्हीहि बदबद वाजत होतीं. हें पाहतांच बुवांनीं गुरवास शिव्या

देण्यास प्रारंभ केला. " हे लेकाचे असेच. हत्यार कधीं दुरुस्त ठेवतील तर शपथ. वडलार्जित तबलजीचा धंदा राखायचा सोडून पत्रावळी लावून पोट भरण्यांतच यांना आनंद वाटतो. हे पत्रावळींचे टांके यांच्या घशांत जाऊन एकदां यांचा प्राण कां जात नाहीं ? बरें, तबला पाठविला तर स्वतः आला तरी ? माझा मीच वाजवून गाऊं कीं काय ? आणि मी तरी हा तबला कसा वाजवूं ? यापेक्षां एखादं फुटकं गाडगं द्याल तरी बरं ! "

आपणांवर बाजू आली असें पाहून दादासाहेबांनीं गुरवास शिव्या झोडण्यास सुरुवात केली.

मी मध्येंच म्हणालों, "जाऊं दे कीं, इतका खटाटोप कशाला ?"

दादासाहेब म्हणाले, " असें कोठें झालें आहे कीं काय ? माझा स्वभाव करारी आहे. मी तुम्हांला गाणें ऐकवीन म्हटलें तर गाणें ऐकवीनच." बुवांनीं तर तबल्यावर डग्गा पालथा घालून रागानें दूर भिंतीशीं सारून दिला आणि बैठकीवर जाऊन पानसुपारी खाण्यास सुरुवात केली, व गाणें नाहीं तर नाहीं, निदान गवयाच्या गप्पा-गोष्टी ऐकावयास मिळतील तरी मी माझें भाग्यच समजेन अशा समजुतीनेंच कीं काय, मला पुण्यांतील दोनचार पिढ्यांच्या गवयां-ची माहिती विचारण्यास प्रारंभ केला.

" आपण चुन्नाचें गाणें ऐकलेंच असेल ? "

" नाहीं, मी तेव्हां पुण्यांत नव्हतों."

" नसलां म्हणून काय झालें ? चुन्ना म्हणजे प्रत्यक्ष गंधर्वांची राणी. पण आपल्याला अबदुल करीमखांचें पुष्कळ वेळ ऐकावयास सांपडलेंच असेल ? "

पण तिंबूबोवांचें व माझें भाषण सर्व सांगत बसलों तर वाचकांस कंटाळा येईल. त्यांतील तात्पर्य इतकेंच कीं, बुवांनीं प्रश्न विचार-

विचारून मनाशीं असें ठरविलें कीं, मी नांवाचा मात्र शहरवासी, पण गाणें वगैरेंच्या बाबतींत बुवांच्या दृष्टीनें मी अगदीं ठोंब्या होतों. पण मला बोलणें शक्य तितकें आवरतें घ्यावयाचें होतें म्हणून होय, नाहीं वगैरे एकेरी शब्दांशिवाय मी त्यांना माझ्या उत्तरांत फारसें कांहीं लाभूं दिलेंच नाहीं.

असो. बुवांनीं केलेली माझी उलटतपासणी संपली व बाराचा ठोका पडला, तों इतक्यांत तंबोरा आणण्यास गेलेला मनुष्य तो घेऊन परत आला.

घरधनी म्हणाले, " कां बुवा, एकूण तुम्हांला आजचें गाणें चुकत नाहीं असेंच दिसतें. कारण नाहीं होय म्हणतां म्हणतां तबला व तंबोरा दोन्ही शेवटीं आलेच."

बोवा म्हणाले, " आले, पण हे असलेच कीं नाहीं? येथें काय गवई रडेल ? "

पण बुवांनाहि दिसलें, कीं घरून उठून साहेबांच्या घरापर्यंत हेलपाटा तर घेतलाच आणि तबला, तंबोरा, मोडकातोडका का होईना, पण येऊन दाखल झाला. तेव्हां आतां कांहीं तरी गायल्या-शिवाय यजमान खास सोडीत नाहींत, म्हणून त्यांनीं तंबोरा जवळ घेतला व गवसणी काढून तारा लावण्यास आरंभ केला. पण वेळच खडतर, त्याला ते काय करणार ! कारण खुंटी पिळतां पिळतां पंचमाची तार तडकून तुटली.

झालें; फिरून बुवांनीं तंबोरावाल्याचे आईबाप उद्धरण्यास सुरुवात केली. हें निमित्त घेऊन मी म्हणालों, " साहेब, खरोखरच आज योग दिसत नाहीं. कोणींहि झालें तरी वेळेला सतावूं नये."

पण मला गाणें ऐकवून पाहुणचार करण्याच्या बुद्धीपेक्षां आपल्या

गांवचे आपण राजे असा अभिमान तडीस नेण्याच्या कल्पनेचाच अंमल साहेबांवर पुरा झाल्यामुळें मी गरीब त्यांत सांपडलों.

साहेब म्हणाले, " तो तंबोराहि नको आणि तबलाहि नको आपल्याला. गळा गोड असला म्हणजे साहित्य लागत नाहीं, आणि तोच वाईट असला म्हणजे इतर साहित्यानें निभावत नाहीं. तें कांहीं नाहीं, ठेवा तो तंबोरा बाजूला आणि झडूं दे नुसत्या गळ्याचीच लकेर."

आतां तिंबूबुवांस कांहींच सबब उरली नाहीं. त्यांनीं खांकरून आ तर पसरलाच; पण नुसते एक दोन आलाप घेतल्याबरोबर गायनशास्त्रांतल्या अगदीं साध्या गोष्टीवर मला व्याख्यान देण्यास सुरुवात केली. मींहि निश्चय केला, कीं या पाहुणचाराचा जुलूम यापुढें सोसावयाचा नाहीं; आणि बुवांच्या कहाणीस हुंकार देतां देतां हळूच भिंतीजवळच्या तक्क्यास टेंकून पाय लांब केले, डोळे मिटले आणि खुशाल घोरण्यास सुरुवात केली !

त्याचा मात्र साहेबांवर कांहीं परिणाम झाला असा दिसला. कारण, " यांना खरीच झोंप येऊं लागली बरं का " असें म्हणून त्यांनीं मला अंथरूण घालून देण्याकरितां गड्यास हाक मारली. मी निजावयास निघालों खरा, पण रात्रीच्या पाहुणचारावरून सकाळीं काय होणार याची कल्पना मला पुरी येऊन चुकली म्हणून, जातां जातां मी साहेबांस ऐकूं येईल अशा रीतीनें आपणांशीं म्हणालों, " सकाळीं लवकर उठलें पाहिजे."

आणि माझी खरी अडचण व कळकळ दाखविण्याकरितां पुढें म्हणालों, " सकाळची झोंप थोडीशी मोडली तरी हरकत नाहीं,

येऊन जाऊन गाडी सांपडली म्हणजे मग दहा जाग्रणांचाहि शीण जाईल."

हें ऐकून साहेब म्हणाले, "त्याची तुम्हांला काळजी नको. अगदीं पहांटे म्हटलेंत तरी पहांटे जेवण तयार ! आमच्या भिम्या आचाऱ्याला इषारत द्यायची फुरसत, कीं दहा मिनिटांत स्वयंपाक तयार. दिवस उगवण्यापूर्वीं जेवावयाचें नाहीं म्हणून काय तें. नाहीं तर हा झाडांवरच्या कावळ्यांना दगड मारून त्यांच्या ओरडण्याची आज्ञा घेऊन हरहर महादेव म्हणावयाचा."

हें ऐकून मात्र मला फार समाधान वाटलें. मी मनांत म्हणालों, "भिम्या आचाऱ्यामुळें आपणांस उद्यां गाडी सांपडणार तर मग !" पण मला हर्षवायु होण्याची भीति ईश्वरास पडली म्हणूनच कीं काय त्यानें साहेबांस आणखी पुढें बोलण्याची बुद्धि दिली.

ते म्हणाले, "भिम्या घरीं निजला असला तर बरेंच झालें, नाहीं तर आपण त्याला आणूं सकाळीं लवकर हाक मारून म्हणजे झालें. भिम्याला हुडकून आणायचा म्हणजे तें एक मोठेंच काम आहे म्हणा; पण तो घरीं येऊन दाखल झाल्यावर स्वयंपाकास उशीर नाहीं." मग माजघराकडे तोंड करून ते कोणालासे ओरडून म्हणाले, "काय रे, पाहुण्यांना सकाळीं लवकर जेवण करून जावयाचें आहे हें भिम्याला कोणीं सांगितलें का ?"

पण रात्रीचे बारा वाजून सर्व सामसूम झालेली; साहेबांना उत्तर देणार कोण ? तेव्हां साहेब निराश न होण्याचा निश्चय करून म्हणाले, "हुंः, त्यांत काय ! आधीं सांगून नाहीं ठेवलें तर नाहीं ठेवलें एक प्रहरांत शंभर पानांचा स्वयंपाक भिम्या करील."

झालें, माझा सर्व हर्ष मावळला आणि फांशीं देण्यास चालविलेल्या मनुष्याइतक्या उल्हासानें मी माडीकडे निजण्यास गेलों !

पहांटे उठण्याची सगळी काळजी मला होती, तरी मी स्वतःच सहा वाजल्यावर जागा झालों. तरी काय, घरांत जिकडे तिकडे सामसूम. साहेबांस झोंप लागली असतां त्यांना उठविण्याचा शिरस्ता नाहीं; आणि ते नाहींत तर चाकर-माणसांना हुकूम सोडणारा मी कोण! अर्थात् चूळ भरून टाकून अंथरुणावर वेड्यासारखा नोकरांच्या हालचालींकडे आशाळभूतपणें पहात बसलों होतों. शेवटीं सात वाजण्याचे सुमारास साहेब जागे झाले व फिरून माझ्या पाहुणचारास त्यांनीं सुरुवात केली. प्रातर्विधि करण्यापुरता माझा मी मोकळा होतों, पण पाहुणचाराच्या जुलुमास चहापासून सुरुवात झाली. उत्तम चहा करण्याचे हुकूम सुटले व लवकर चहा करण्याचे तगादे झाले. होतां होतां साडेसात वाजतां चहाचे पेले वर आले तों त्यांत थोडीशी राख पडली असून पहिल्याच घोटाबरोबर राकेलची घाण आली; पण आतां जर का मी ही चूक साहेबांच्या नजरेस आणीन तर या चहाप्रकरणांत आणखी अर्धा तास जाणार असें जाणून, मी मन घट्ट करून ओठ दाबून खोटा हंसण्याचा आव घालून घोटाघोटानें चहा पिऊनहि टाकला. पण साहेब थंड चहा पीत म्हणून थांबले होते. त्यांनीं तोंडास पेला लावतांच त्यांना सर्व कळून चुकलें व एकदम त्यांनीं सर्व चाकरमाणसांस शिव्यांची लाखोली वाहण्यास सुरुवात केली व फिरून चहा करून आणण्यास त्यांनीं हुकूम सोडला. बऱ्याच वेळानें नाहीं होय म्हणतां म्हणतां चाकरांनीं लाजतलाजत येऊन कळविलें, कीं घरांतील चहा संपला आहे.

साहेबांची अब्रू बचावावी व पाहुणचाराचा जुलूम टळावा म्हणून मी म्हणालों, "मी कांहीं चहाचा मोठासा शोकी नाहीं, आणि प्यालेल्या चहालाहि कांहीं फारशी घाण येत नव्हती." पण

पाहुणचाराची साहेबांची कल्पना जाज्वल्य असल्यामुळें ते म्हणाले, " फिरून चहा करवीन एवढेंच नव्हे, तर बाजारांतून 'लिप्टन'चा नवा डबा आणवीन."

मी मनांत म्हणालों, " नशीब माझें." फिरून विचार केला. जेवणाची तयारी वेळेवर असली म्हणजे झालें. तंवरचा तास अर्धा तास यजमानास खूष करण्यांत गेला तर जाईना का ? पण इतक्यांत साहेबांना आठवण होऊन ते म्हणाले, " आमच्या भिम्याचा चहा कधीं बिघडायचा नाहीं; पण आजच त्याला काय अवदसा आठवली कोणास ठाऊक ! " पण इतक्यांत शेजारीं गडी उभा होता त्याच्या मनांत न्यायदेवता उभी राहून त्यानें सांगितलें, कीं चहा भिम्यानें केला नसून घरांत कोणी नाहीं म्हणून आयत्या वेळीं शेजारच्या आजीबाई बोलावून आणल्या व त्यांनीं हा चहा बनविला. साहेबांच्या मनांत आजीबाईनाहि शिव्या द्यायचें येऊन गेलें, पण कांहीं कृतज्ञता व कांहीं शिष्टाचार मिळून त्यांनीं आजीबाईवर शिस्त धरली नाहीं.

पण या सगळ्या प्रकरणांत, भिम्या आचारी अजून आला नाहीं मग स्वयंपाकास सुरुवात होणें लांबच, येवढी गोष्ट मात्र आपोआप सिद्ध झाली. मग काय विचारतां ? साहेबांच्या आरडण्याओरडण्यानें सर्व घर दणाणलें. दाही दिशांना गडी पाठवून भिम्या असेल नसेल तेथून धरून आणण्याचे हुकूम सुटले; व दरम्यानचा वेळ कोणत्या तरी पाहुणचारांत जावा, व्यर्थ दवडूं नये, म्हणून साहेबांनीं आपला बगीचा पाहून येण्याची गोष्ट काढली.

ते म्हणाले, " बगीचा येऊन जाऊन मैलभर तर लांब आहे, स्वयंपाक होईपर्यंत आपण दहादां जाऊनसुद्धां येऊं." आणि स्वयंपाक करण्याचा तगादा भिम्यामागें लावण्याचा फिरून एक हुकूम

सोडून ते म्हणाले, " स्वयंपाक स्वयंपाक तो काय ? आपण बगीचांत जाऊन येईतों दहा वेळ स्वयंपाक होईल."

स्वयंपाक होईपर्यंत बगीचाच्या दहा खेपा होणार, बगीचाची एक खेप होईपर्यंत स्वयंपाक दहा वेळां होणार, हें एकांत एक कसें बसतें याचें कौतुक वाटून मला थोडेंसें हंसूंहि आलें. पण त्याचा संबंध बगीचा पाहण्याच्या आनंदाशीं जोडून देऊन मीं वेळ मारून नेली.

बगीचांत न जातां आम्ही घरीं राहिलों, तरी मला स्वतःला चुलीपुढें जाऊन स्वयंपाक थोडाच करावयाचा होता ? स्वयंपाकघरांतील 'भवितव्यता' सर्वस्वीं भिम्याच्या हातांत राहणार. म्हणून बाहेर बगीचांत गेलों तर स्वयंपाकाकडचें लक्ष तरी कमी होईल अशा हेतूनें बगीचाकडे जाण्यास संमति दिली.

बगीचांतहि पाहुणचार माझी वाट पहातच होता व झाडांवरचीं फूलें खुडणें, फळझाडांवरचीं ताजीं फळें तोडणें वगैरे गोष्टी साहेब मजकरितां करीत होते. त्या पाहुणचाराच्या रूपाच्याच होत्या यांत शंका नाहीं. पण कित्येक वेळां अशा गोष्टींत पाहुणचाराच्या बुद्धीपेक्षां गर्वोक्तीचें आत्मनिवेदनच अधिक असतें. तसेंच येथेंहि झालें. साहेबांनीं मला मूळ बगीचा घेतल्यापासून सर्व वृत्तान्त निवेदन केला. त्यांनीं केलेलें सर्व कांहीं चांगलें व शहाणपणाचें होतें अशी माझी खात्री करून देण्याचा त्यांचा सारखा प्रयत्न चालू होता. क्षणोक्षणीं हुंकारानें मी कबुलीजबाब देतच होतों. पण खात्री करावी तितकी थोडी, अशापैकीं ही गोष्ट आहे असें साहेबांस वाटत असावें. त्यामुळें पुराव्याचीं ओझ्यांवर ओझीं मजवर लादून युक्तिवादाचे हल्ल्यांवर हल्ले ते मजवर चढवीत होते. त्यांची जमीन चांगली, त्यांचे गडी हुषार, शेती व बागाईत करण्याची

त्यांची पद्धति लोकोत्तर, त्यांचें पीक लोकांपेक्षां अधिक, फार काय पण पाऊससुद्धां त्यांचा पक्षपाती असून शेजारच्या नंबरांतल्यापेक्षां त्यांच्या नंबरांत अधिक मुबलक व वेळेवर पडत असे अशीहि माझी खात्री झाली; पण खात्री न होईल तर काय झालें! माझे कान तेवढे साहेबांकडे होते; पण मन स्वयंपाकघरांतील भिम्याचा स्वयंपाक आणि स्टेशनांतील मुंबईमेल यांच्या दरम्यान भ्रमण करीत होतें. साहेबांच्या पाहुणचाराच्या बुद्धीला मजकडून मिळावा तितका खुलासेवार व कृतज्ञतापूर्वक जाब मिळत नव्हता, पण त्याला मी तरी काय करणार?

मला स्टेशनवर पोंहोचविण्याकरितां बहुधा शेतांतल्या बैलांपैकींच जोडी मिळणार असें वाटून मी होऊन साहेबांस म्हणालों, "यांतले कोणते बैल मला स्टेशनावर नेणार?"

साहेब एका जोडीकडे बोट करून म्हणाले, "ही तर घरची सत्तेचीच आहे. पण शेजारचा वांटेकरी बळी पायगुडा यानें प्रदर्शनांत घेतलेली एक जोडी आहे तीच होतां होईतों तुम्हांस नेण्यास मी देणार आहें."

शोध करितां गड्याकडून कळलें, कीं पायगुड्याची जोडी एक मैलावर असलेल्या कुरणावर चरावयास ठेवलेली आहे. तेव्हां ती कदाचित् वेळेवर येणार नाहीं अशा भीतीनें मी म्हणालों, "हें पहा साहेब, घरची जोडी तीच खरी, दुसऱ्याची कशाला?"

फिरून साहेबांना आपण गांवचे अधिराजे या अभिमानाची लहर आली. ते म्हणाले, "हें पहा, आमच्या या गांवांत कोणतीहि वस्तु दुसऱ्याबिसऱ्याची हें मी जाणत नसतों. म्हणेन तेव्हां ती वस्तु मला मिळालीच पाहिजे हा आपला माझा कायदाच आहे. मला जोडी देतो म्हणजे पायगुड्या काय उपकार करतो कीं काय?"

असें म्हणून त्यांनीं ती जोडी घेऊन येण्यास चाकरांना सक्तीचा हुकूम सोडला.

मी या मुद्द्यावर अधिक हुजत घालीत बसलों नाहीं. पण एवढेंच म्हणालों, " आपलें काय जातें मिळालें तर ? प्रदर्शनांत बक्षिस मिळालेल्या जोडीच्या गाडींतूनच आपण राजासारखे स्टेशनवर जाऊं."

पण लगेच डामडौल व मिजासीपणा यांच्यामुळें राजे लोकांच्या आगगाड्या कित्येक वेळां चुकतात या आठवणीनें मनाला धक्का बसून मी पुढें म्हणालों, " जोडी कोणाची का होईना ? आपलें स्टेशनवर वेळेवर पोंचलें म्हणजे झालें ! "

पण तोफेच्या तोंडीं दिलेल्या मनुष्याचीं जितकीं शकलें होत असतील तितकीं साहेबांनीं आपल्या निश्चयात्मक उत्तरानें माझ्या शंकेचीं केलीं

ते म्हणाले, " हात्तेच्या रे. स्टेशनावर वेळेवर पोंचावयाचें येवढी-च ना येऊन जाऊन तुमची शंका ? हुंः ! त्यांत काय आहे ? आमचा नाम्या गडी आणि आमचीच जोडी असली म्हणजे स्टेशन काय पंधरा मिनिटांचा रस्ता ! "

नाम्या गडी व त्यांची बैलांची जोडी यांची किंमत कमी करण्याचें मला कारण नव्हतें. पण चार मैलांची मजल पंधरा मिनिटांत मारावयाची म्हणजे तासीं सोळा मैल वेग होतो हें उदाहरण मनानें सोडविल्यामुळें मीं तें सहज साहेबांपुढें मांडलें. हेतु हा, कीं साहेबांचें गणित चुकल्यानें माझी गाडी चुकूं नये.

पण साहेब पडले अभिमानी पुरुष. ते काय अशा दुरुस्तीला भीक घालतात ? ते म्हणाले, " पंधराच्या ठिकाणीं वीस. आमची

ही जोडी एकदां चौखूर उडूं लागली म्हणजे एखाद्या वेळीं घोड्याच्या गाडीलाहि मागें टाकावयाची."

मी अगदीं मनाविरुद्ध 'तथास्तु' असा आशीर्वाद देऊन हा वाद थांबविला.

घरीं येतों तों आठास सुमारें दहा मिनिटें कमी होतीं; पण माझ्या दुर्दैवानें लिप्टनचा चहाचा डबा येऊन पडला होता. मग काय साहेब मला सोडणार? मी म्हणालों, "स्टेशनावरून गाडी हलायला फक्त एक तास पंचवीस मिनिटें आहेत. तितक्यांत मला आंघोळ-जेवण करून भातखांचरांतून चार मैलांवर मजल जावयाची आहे. तेव्हां आतां चहाच्या भानगडींत कशाला पडावें?" पण साहेब म्हणाले, "स्वयंपाक चुलीवर होतोच आहे, पण वैल रिकामाच आहे कीं नाहीं?" असें म्हणून भिम्या, जो या सुमारास येऊन चूल पेटवून भात टाकीत होता, त्याला साहेबांनीं चहा करण्यास हुकूम दिला.

झालें! या पुढची हकीकत वर्णन करण्यास मी असमर्थ आहें. प्रत्येक पळाबरोबर माझा जीव तिळतिळ तुटत होता. माझें सगळें लक्ष्य आगगाडीकडे होतें आणि एखाद्या कळसूत्री बाहुल्याप्रमाणें मी पाहुणचार घेत होतों. प्रथम चहा झाला. नंतर आंघोळीकरितां बाजारांतून साबण आणण्यास पांच मिनिटें गेलीं. नको नको म्हणत असतां गुलाल-रांगोळ्या झाल्या. ऐन भात वाढावयाच्या वेळीं भर्जीं केलीं नाहींत म्हणून भिम्यास रागें भरून घेऊन चुलीवर कढई ठेवावी लागली. भिम्यानें ऊन ऊन चपाती करून वाढावी व मीं खावी याशिवाय यजमानांचा संतोष होण्यासारखा नसल्यानें तो प्रकार आग्रहपूर्वक सुरू झाला. पाणी पिण्याची वेळ आली तेव्हां घरच्या विहिरीचें आख्यान दिवाणी कोर्टांतील अपिला-

पर्यंत सांगून त्याचें पर्यावसान झालें कीं रहाटास दोर नव्हता तो मुद्दाम बांधून ताजी घागर काढून अखेर मला पाणी पाजण्यांत आलेंच! पानसुपारीचे वेळीं मला नुसतीं फुलें न देतां त्यांचा गुच्छ सजवून द्यावा अशी साहेबांची लहर लागल्यामुळें त्यांतच चार-दोन मिनिटें गेलीं.

जेवणांतून मोकळा झालों असें पाहून अंगरखापागोटें घालण्याची लगबग मीं केली. पण देवापुढें सुपारी ठेवून जाण्याच्या शिष्टाचारांत मीं सांपडून साहेबांनीं शिसवी देव्हारा करणाऱ्या सुताराची कामगिरी आणि महत्प्रयासानें मिळविलेले बाण व चक्रांगद यांचें वर्णन करून दोनतीन मिनिटें खाल्लींच. अखेर ओटीवर येऊन हातांत बॅग व काठी मी घेतों तों मला समजलें, कीं दारांत मुळीं गाडीच उभी नाहीं. तें ऐकतांच साहेबांनीं नाम्या गड्यास चार शिव्या हांसडल्या. एकामागून एक दोन-तीन गडी धाडले, व इतकें केल्यानें चुकीची योग्य ती दुरुस्ती झाली असें मनाशीं ठरवून ते संथपणानें मला म्हणाले, "अहो, बसाल तर खरे, फिरून एक वेळ विडा खा." तेव्हां मी मात्र मनांत बराच संतापलों. मी साहेबांस जाणवेल अशा रीतीनें घड्याळ काढून पाहून खिशांत आपटलें. पण घड्याळांत किती वाजले ही बाबत साहेबांच्या हिशेबांत नव्हती. 'सकाळीं जेवून गाडीला जायचें' इतकीच गोष्ट ते जाणत होते. सर्व पाहुणचाराच्या समारंभांत त्यांनीं घड्याळाकडे एक वेळहि पाहिलें नव्हतें.

असो. पुन्हा एकदां विडा खाऊन झाल्यावर मी उठलों व सामान घेऊन दारांत उभा राहिलों, तरी गाडी येईना. मी आपणाकडून चुळबुळ करीत होतों व गाडी आतां इतक्यांत येईल असें आशापूर्ण शुभवर्तमान साहेब वर्तवीत होते. अखेर एकदांची गाडी आली

तोंच इतक्यांत घरच्या घड्यांळांत नवाचे ठोके पडले. याचा अर्थ चार मैलांवर असलेल्या स्टेशनावरची गाडी बरोबर १५ मिनिटांनीं सुटावयाची !

पण साहेब स्वस्थपणें म्हणाले, "शकुन तर ठीक झाला." मी गाडींत बसून गाडी चालू होतांना साहेब म्हणतात, "पंधरा मिनिटें आहेत ना? हात्तेच्या ! नाम्या तेवढ्या वेळांत दोनदां स्टेशनाला पोंचवील. नाम्या, ढवळा बैल जरासा लंगतो आहे. पण हाण जरा जोरानें म्हणजे झालें."

शेवटीं साहेब मला म्हणतात, "एक मिनिटभर थांबत असलां तर थोडेंसें फराळाचें देतों." मी हातानेंच नको म्हणून 'हाण गाडी' असें नाम्यास म्हणालों.

साहेबांचे अखेरचे शब्द ऐकूं आले ते असे:– "पुन्हा लवकरच या बरं का आजच्यासारखे !"

यावर मीं काय उत्तर दिलें, तें साहेबांस किंवा नाम्यालाहि ऐकूं जाण्यासारखें नव्हतें. पण तें उत्तर काय असेल याची वाचक कल्पना करतीलच !

मी स्टेशनावर पोंचलों तों पावणेदहा झाले होते. मेलगाडी जाऊन अर्धा तास झाला होता आणि स्टेशनवर सर्वत्र सामसूम झालें होतें.

साहेबांच्या पाहुणचारामुळें माझी आगगाडी कशी चुकली याचें सर्व चित्र माझ्या डोळ्यांपुढें पाहुणचाराच्या पहिल्या हल्ल्या-पासून उभें राहिलें व मी मटकन् प्लॅटफॉर्मच्या बाकावर बसलों.

न० चिं० केळकर

(कथासप्तक)

## प्रश्न व सूचना

( १ ) [अ] प्रस्तुत गोष्टीच्या गुणांचें दिग्दर्शन करा.

[आ] प्रस्तुत गोष्टींत कला या दृष्टीनें तुम्हांला कांहीं दोष दिसतो काय? पाहुण्यांच्या आदरसत्काराचा अतिरेक करणें हें निराळें, व स्वतःच्या वैभवाचें प्रदर्शन करणें हें निराळें. या दोहोंपैकीं एकाच मुद्द्यावर भर दिला असता तर कलादृष्टीनें हीच गोष्ट अधिक कला-शुद्ध झाली नसती काय?

( २ ) अतिथिसत्कार करणें हा वास्तविक सद्गुण आहे. मग दादासाहेबांचें चुकलें कोठें?

( ३ ) अतिथिसत्कार कसा करावा या बाबतींत तुम्ही व्यावहारिक उदाहरणें देऊन कांहीं सूचना करूं शकाल काय?

( ४ ) [अ] खालील शब्दांची व्युत्पत्ति द्याः—अतिथि, पाहुणा, बदरंग, वायगोळा, ठोंव्या.

[आ] पुढील शब्दांचा किंवा शब्दसमूहांचा अर्थ द्याः—अरतापरता, बजबय्या, री ओढणें, आंबट तोंड, घाट घालणें, तार लागणें, पडत्या फळाची आज्ञा घेणें, दुरुस्त, खटाटोप, अवदसा आठवणें, हुजत घालणें, भीक घालणें, लगवग.

( ५ ) पुढील वाक्यांचें स्पष्टीकरण कराः—

१ खेडेगांवातली गाण्याची तयारी म्हणजे संन्याश्याच्या लग्नाला जशी शेंडीपासून तयारी तशी.

२ शेण जमिनीवर पडेल तर थोडी तरी माती घेऊन उठेलच.

३ कोणींहि झालें तरी वेळेला सतावूं नये.

४ नाहीं तर हा झाडांवरच्या कावळ्यांना दगड मारून त्यांच्या ओरडण्याची आज्ञा घेऊन हरहर महादेव म्हणावयाचा.

( ६ ) तिंबूबुवा, व दादासाहेब यांचीं स्वभावचित्रें रेखाटा.

( ७ ) ही गोष्ट वाचीत असतांना आपणांस पुष्कळ ठिकाणीं हंसूं येतें तें कां याची मीमांसा करा.

---

*

# हास्य-विनोदांपासून होणारे फायदे

[ न० चिं० केळकर यांनीं लिहिलेल्या 'सुभाषित व विनोद' या पुस्तकांतून पुढील उतारा घेतला आहे. जीवितांत गांभीर्य, ध्येयनिष्ठा, न्यायनिष्ठुरता वगैरे गुण आवश्यक आहेतच; परंतु बिनोद, थट्टामस्करी वगैरेचीहि तितकीच आवश्यकता आहे. आपल्या लोकांत विनोदबुद्धि पुष्कळ कमी आहे असें म्हणतात व पूर्वीच्या वाङ्मयाकडे पाहिलें असतांना हें खरेंहि दिसतें. हा प्रश्न गौण आहे असें म्हणून सोडून दिला तरी विनोदाचा जीवितांत पुष्कळच उपयोग आहे यांत शंका नाहीं. हे उपयोग पुष्कळ प्रकारचे आहेत. त्यांतील कांहीं उपयोग न० चिं० केळकर यांनीं पुढील उताऱ्यामध्यें मार्मिकपणें व निरनिराळीं उदाहरणें देऊन दाखविले आहेत. ]

आतां हास्यबिनोदांपासून व्यक्तीला होणाऱ्या फायद्यांकडे वळूं. हास्यक्रियेचा शरीरावर वैद्यकदृष्ट्या फायदेशीर परिणाम होतो ही गोष्ट प्रथमतः ध्यानांत ठेवण्याजोगी आहे. हास्याचा परिणाम शरीर-प्रकृतीवर चांगला होतो. ज्याला वैद्यकाची माहिती नाहीं असा मनुष्यहि एकदम सांगूं शकेल, कीं हंसल्यापासून अंगांतील शिरांस एक प्रकारचा मोकळेपणा वाटतो. हास्य स्फुट नसतें त्या वेळीं श्वासोच्छ्वासाची क्रिया संथपणें चालत असते. तिच्यामध्यें हंसण्यानें एकदम व्यत्यय येतो हें खरें, परंतु त्या व्यत्ययाचा परिणाम श्वासोच्छ्वासाच्या इंद्रियांवर व शरीरांतील रक्तप्रवाहावर चांगला असाच होतो. हास्यामुळें वक्षःकपाटावर एकामागून एक असे अनेक आघात होतात. या प्रत्येक आघाताच्या वेळीं रक्तवाहिन्यांतील रक्त काळिजांत जाण्यास प्रतिबंध होतो. बराच वेळ मनुष्य हंसत असला म्हणजे त्याचें डोकें व मान तांबूस होतात याचें कारण वरील प्रतिबंधच होय. तसेंच हास्यक्रियेच्या मधून मधून जो खोल असा श्वासोच्छ्वास घेतला जातो, त्याच्या योगानें फुप्फुसांत हवा शिरून तीं

फुगतात आणि त्याचा परिणाम असा होतो कीं, वाहिन्यांतील रक्त काळिजाकडे घालविलें जातें. काळिजाकडे रक्त अधिक जोरानें जाणें व त्यास प्रतिबंध होणें या दोन क्रिया एकामागून एक व आलटून पालटून अशा झाल्यानें रक्तांत प्राणवायूची मिसळ अधिक होते, व प्रवाहहि जोरानें चालतो. हे सर्व प्रत्यक्ष परिणाम होत. यांशिवाय दुसरे अप्रत्यक्ष परिणाम होऊं शकतात. मोकळ्या मनानें मनुष्यास हंसें आलें म्हणजे रक्ताचा मेंदूवरील दाब कमी पडतो. रागावलेल्या मुलास कांहीं चेष्टा करून हंसवितात, याचें कारण तरी हेंच, कीं हंसें फुटल्याबरोबर मेंदूकडील रक्त मोकळें होऊन मनोवृत्ति फुलते. एकंदर शरिरप्रकृतीवर हास्याचे होणारे सुपरिणाम अर्थातच इतके त्वरित होऊं शकत नाहींत. परंतु ते होतात याबद्दल कोणास क्वचितच शंका असेल. इंग्रजींत "Laugh and grow fat" अशी एक म्हण आहे, तिजवरून इंग्रज लोकांत याबद्दल काय समजूत आहे ती व्यक्त होते.

(1) When a man smiles and much more when he laughs he adds a fragment to his life.

—(*Sterne.*)

(2) Laughter makes good blood.

—(*Italian Froverb.*)

ग्रीक तत्त्ववेत्ता आरिस्टाटल याचे वेळेपासून आजपर्यंत हंसण्याचे योगानें फुप्फुसें बळकट होतात व शरीरप्रकृतीच्या निरोगीपणास हास्य हें एक साधन आहे असें सर्व इंद्रियविज्ञान-शास्त्रवेत्ते म्हणत आले आहेत. रस्त्यांत गर्दी वगैरे बरीच जमून जाण्यायेण्यास प्रतिबंध झाला असतां पोलिसानें सोटा उगारून 'चला—लोक, गर्दी मोडा' असें म्हटल्यानें ज्याप्रमाणें जमलेल्या समाजांत खळबळ सुरू होते, त्याचप्रमाणें मेंदूवर किंवा मनावर ताण पडला असला किंवा कांहीं

काळजी वाटून उद्विग्नता आली असली तर खळखळून हंसें आलें म्हणजे एकदम मोकळेपणा वाटूं लागतो. शरीरावरहि तसाच परिणाम घडतो. कारण बहुधा मोकळ्या हंसण्यानें हातपाय वगैरे अंगाचे भागांसहि चलन मिळतें, मात्र 'अति सर्वत्र वर्जयेत्' या म्हणीप्रमाणें हंसण्याच्या कामांतहि अतिशयत्वानें शरीरप्रकृतीवर वाईट परिणाम होण्याचा संभव असतो हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे. औषधाप्रमाणें हास्याचींहि पथ्यकर व अपथ्यकर अशीं प्रमाणें असतात व निरनिराळ्या प्रकृतीस हास्यरूपी औषध निरनिराळ्या प्रमाणांनींच विहित आहे.

नेहमीं गंभीर किंवा आवेशयुक्त विचार मनांत उत्पन्न झाल्यानें मनावर एक प्रकारचा ताण पडतो. धनुष्याचा ज्या वेळीं उपयोग करावयाचा नसतो त्या वेळीं त्याची दोरी सोडून त्यावरील ताण कमी करितात. त्याचप्रमाणें कांहीं विशिष्ट प्रसंगींच आवेशयुक्त व गंभीर विचारांचा ताण मनावर पडावा, एरवींच्या वेळीं मन स्वाभाविक व न ताणलेल्या स्थितींत रहावें व त्याचे अंगच्या स्थितिस्थापकत्वाचा गुण नष्ट होऊं देऊं नये, याकरितां ईश्वरानेंच हास्यविनोदाची तजवीज करून ठेविली आहे. हा उपयोग केवळ अकरणरूप झाला; तथापि त्याचे प्रत्यक्ष असेहि उपयोग आहेत. पैकीं एक असा आहे कीं विनोदशीलतेमुळें आत्मस्वभावाचें निरीक्षण मनुष्य करूं शकतो. जें शस्त्र आपण लोकांवर नेहमीं चालवितों तेंच अर्थात् स्वहितबुद्धीनें आपल्यावरच चालवून पाहण्याची इच्छा मनुष्यास एखाद्या ना एखादे वेळीं तरी होणारच.

विनोद हा एक फिरता दिवा आहे; त्याचा प्रकाश दुसऱ्यावर जसा पडतो तसा आपणांवरहि पडलेला पाहून त्याच्या उजेडांत ज्या गोष्टी दिसतील त्यांचा बोध आपणांस सहजच होतो. " माझें

मलाच हसूं येतें " असा शब्दप्रयोग आपण व्यवहारांत नेहमीं झालेला पाहतों त्याचा अर्थ उघड आहे. ज्याला दुसऱ्याचें नेहमीं हंसूं येतें, त्याला स्वतःचें एखादे वेळीं तरी हंसूं येईलच. परंतु आत्मनिरीक्षण किंवा आत्मशिक्षण यांहून दुसरेहि फायदे आहेत. आपल्या जिवितक्रमांत लहानसहान अडचणी अगर लहानसहान संकटें आपणांवर येतात. तेव्हां आपण कित्येक त्यांच्या ओझ्या-खालीं दडपून जातों. परंतु त्यांच्या योगानें आपल्या एकंदर जिवितक्रमास व्यत्यय न येतां आपण कित्येक त्यांतून लीलेनें पार पडतों. एखादा जिन्नस आपणच कोठें तरी ठेवलेला असावा व तो सुरक्षितहि असावा; पण हुडकूं जावें तर मात्र तो आपणांस सांपडत नाहीं; तो शोधून आपण दमतों. अशा वेळीं आपल्या मनास किती तरी त्रास होण्याचा संभव असतो. विनोदानें हंसून जर आपण तो क्षण सुखाचा केला नाहीं तर तो दुःखाचा खास होईल व असें झालें असतां शुष्क कारणाकरितां आपल्यास दुःखाचे किती तरी क्षण विनाकारण काढावे लागतील. एखादे वेळ गर्दीगर्दीनें गांवाला जाण्यास निघावें तों आगगाडी चुकावी. असे प्रसंग मनुष्यमात्रास केव्हां ना केव्हां तरी येतात. समजा, अशा वेळीं गाडी चुकली म्हणून खिन्न होऊन चार लोकांदेखत गुडघ्यांत मान घालून बसणारा एक मनुष्य घ्या, व दुसरा एक असा घ्या, कीं आपल्या देखत गाडी सुटलेली पाहून न त्रासतां विनोदानें एवढेंच म्हणतो कीं, अहो बाई, तुमच्याकरितां आम्ही इतके लांबून धडपडत व धापा टाकीत आलों. असें असतां आमची एक क्षणाची सुद्धां मुरवत तुम्हीं धरूं नये, हें चांगलें दिसतें का ? " असें बोलून हंसत परत फिरतो. या दोन मनुष्यांच्या स्थितींची तुलना करून पहा व सांगा, कीं दोघांचेंहि नुकसान व अडचण खारखीच

असतां त्यांपैकीं सुखी व दुःखी कोण? समजा, आपण पायगाडी-वर बसून जोरांत चाललों आहों. असें असतां एखादे वेळीं एखादें खेळकर व खोडकर मूल मुद्दाम होऊन पुढें तरी येतें किंवा जागचें हालत तरी नाहीं किंवा आपण त्यास चुकविण्याकरितां डावे-उजवे हाताला वळावें तों तों तेंहि उजवी-डावी बाजू घेऊन नेमकें पुढेंच येतें. अशा वेळीं प्रथमच चटकन् रागाचा व त्रासाचा झटका येतो. परंतु त्रासिक मनुष्य त्याजवर व आपल्यावर रागावून त्याला चार शिव्या देत, आपणांसहि चार घेत निघून जाईल; किंवा त्या मुलाचे वतीनें कोणी बोलूं लागल्यास वर्दळीवरहि येईल. व एकदां रागाच्या शब्दांची किंवा शिव्यांची सलामी दोहोंपक्षांकडून झाली म्हणजे मग तो तंटा किती विकोपास जाईल किंवा अखेर काय परिणाम होतील ते देव जाणे. विनोदी मनुष्याची तऱ्हा याहून वेगळी असते. अशा प्रसंगीं तो हें पटकन् लक्षांत आणील, कीं रस्त्यावर खेळण्याचा लहान मुलांचा हक्क निसर्गसिद्धच आहे, व येणारांजाणारांशीं गमतीनें वागणें हें त्यांच्या खेळण्यापैकींच एक अंग आहे. अशा वेळीं समजा कीं गाडीवरून तो पडला तरीहि, अप-घात विशेषच मोठा नसेल तर, तो 'आतां या गाडीला तिच्या डॉक्टरकडे नेलें पाहिजे' एवढेंच म्हणून हंसून भागवून नेईल. किंवा अपघात न होतां मुलास चुकवून जातां आलें तर मागें वळून तो एवढेंच म्हणेल कीं, कां कशी झाली फजिती? दिली कीं नाहीं झोकांडी? व असें झालें असतां तो स्वतः, तें मूल व आसपासचे लोकहि सर्वजण मिळून हंसून जो तो आपल्या कामास जाईल. आपण एखादे वेळ गाडींतून उतरतांना आपणांस न कळत दारांत धोतर सांपडलेलें असावें व आपणांस जलदीनें उतरतां येऊं नये. अशा वेळीं कोचमनला व्यर्थ शिव्या हांसडणारे व रागावून

अकांडतांडव करणारे लोक ज्याप्रमाणें जगांत असतात, त्याचप्रमाणें दुसरेहि असे कित्येक असतात, कीं ते अशा वेळीं एखादी कोटी करून किंवा विनोदाचें भाषण करून तो अडचणीचा क्षण हास्यास कारणीभूत करतील. अंधारे रात्रीं रस्त्यानें जातांना अडखळून आपण पडलों असतां म्युनिसिपालिटीला शिव्याशाप देऊन आपले जिवाला त्रास करून घेणें ही एक गोष्ट घ्या. आणि 'आतांशा आमच्या कमिटीची रोशनाईची व्यवस्था इतकी चांगली आहे कीं, तिचे कंदील पाहण्यास घरचे कंदील न्यावे लागतील' एवढेंच म्हणून व उठून आपल्या मार्गानें जाणें ही दुसरी गोष्ट. यांपैकीं शहाण्या माणसानें कोणती पत्करावी याबद्दल बहुधा वाद होणार नाहीं. समजा, आपण नाटक पहावयास गेलों असतां आपल्या समोरच्या खुर्चीवर बसलेल्या गृहस्थाचें पागोटें भलें मोठें असल्याकारणानें मौज पहावयास आलेल्यांस व्यत्यय येतो. अशा वेळीं 'अहो, नाटक पहावयास यावयाचें तर असलीं चाकासारखीं पागोटीं घरीं ठेवून यावीं समजलांत का? आम्ही मागच्या खुर्चीवर बसलों असलों तरी तुमच्यासारखेच आम्हांलाहि पैसे मोजावे लागले आहेत. काढा तें पागोटें अगोदर, नाहीं तर मॅनेजरास कळवीन' असें बोलून त्याचें प्रत्युत्तर ऐकून घेणें व शेवटीं भांडाभांडी करून स्वतःच्या व लोकांच्या करमणुकींत व्यत्यय आणून पोलिसापर्यंत मजल नेणें हा एक मार्ग आणि समोरच्या गृहस्थास 'काय हो, स्टेजवर काय चाललें आहे तेवढें सांगाल का?' असें विचारून व्यंग्यार्थानें पागोट्याची अडचण त्याचे नजरेस आणून देणें किंवा थट्टेनें 'रावसाहेब, आज फार उकडतें आहे नाहीं? जरा पागोटें बिगोटें काढून हवा घ्याल कीं नाहीं' असें म्हणणें व

अर्थातच 'कां हवेचीशी चौकशी चालली आहे ! पागोटें बिगोटें तुमच्या दृष्टिआड येतें कीं काय ?' असें विनोदी उत्तर त्याजकडून येऊन आपला हेतु साधणें हा दुसरा मार्ग. यांपैकीं चांगला कोणता हें आम्ही सांगावयास नकोच. एखादा भिक्षुक येऊन खणपटीस बसून त्रास देत आहे, अशा वेळीं त्याजवर रागावून 'काय हो, शंभर वेळां सांगितलें तरी तुम्हांस कळत नाहीं का ? उठतां कीं हातास धरून घालवूं ?' असें म्हणणें बरें; किंवा 'भटजीमहाराज, ऊन्ह होत चाललें, आपल्याला आणखी चार ठिकाणीं जायचें असेल, दुसरे चार लोक हातांत दक्षणा घेऊन आपली वाट पहात बसले असतील, त्यांची आपण निराशा करणार कीं काय ?' असें म्हणणें बरें ? एखादे वेळीं कुलूप काढावयास जावें तों तें गंजून गेल्यामुळें निघूंच नये असें होतें. अशा वेळीं कोणीं तरी कुलूप बिघडविलें खास अशी समजूत खरोखर नसतांहि उगाच घरच्या पोरांबाळांस अथवा चाकरनौकरांस शिव्या हांसडणारीं, किंवा आपल्या गैरमर्जीची मजल कुलुपांच्या कारखानदारांपर्यंत नेऊन कुलुपें गंजतात म्हणजे काय, अलीकडे सर्वच कारखाने चोरांचे बाजार झाले आहेत. याबद्दल वर्तमानपत्रांतून गवगवा केलाच पाहिजे !' वगैरे म्हणणारीं माणसें वेगळीं आणि अचेतन कुलुपासच उद्देशून 'कां स्वारी आज रुसली आहे वाटतें ? तेल पाहिजे का थोडेंसें प्यायला ?' इतकेंच म्हणून जाणारीं माणसें वेगळीं. कथा ऐन रंगांत आली असतां एखादें मूल रडूं लागावें, व असें झालें असतां हरदास मूर्ख असेल तर तो "अहो बाई, त्या मुलाला गप कराल किंवा नाहीं ? लोकांनीं येथें कथा ऐकायला यायचें कीं तुमच्या मुलाचें रडणें ऐकायला यायचें ?" असें बोलून आपल्या स्वतःस त्रास करून घेईल

व त्या बिचाऱ्या माउलीस आपला जीव नकोसा करून टाकील. परंतु त्याचे जागीं एखादा विनोदी हरदास असेल तर 'लहान बालकें हीं राजेलोकांप्रमाणेंच शीघ्रकोपी असतात; त्यांचें समाधान करण्याचे श्रम काय असतात हें गोकुळच्या यशोदेस विचारावें म्हणजे कळेल' असें म्हणून लहान मुलांवर एखादी गोष्ट सांगून सर्वांस क्षणभर हास्यसुखाचा लाभ करून देईल. अशा प्रकारचीं उदाहरणें जितकीं द्यावीं तितकीं थोडींच होतील. परंतु त्या सर्वांचें तात्पर्य हेंच कीं, संसारांतील लहानसहान अडचणींचा किंवा संकटांचाहि परिहार विनोदानें जितका होतो तितका रागावून किंवा त्रास करून होत नाहीं. कित्येक गोष्टी हलक्या हातानें केल्या तरच त्या साधतात हें आपण नेहमीं पाहतों व विनोददृष्टीनें अडचणींकडे पाहणें म्हणजे त्यांच्या परिहारास जो एक प्रकारचा सफाईचा हात लागतो त्याचा उपयोग करण्यासारखें आहे. अशा प्रसंगीं साधु लोक परमार्थदृष्टीनें जें समाधान स्वतःस प्राप्त करून घेतात तेंच संसारी लोक विनोदानें करून घेतात. आपल्या रागीट बायकोनें प्रथम शिव्या देऊन नंतर डोक्यावर घाण पाणी टाकिलें हें पाहून " विजेच्या कडकडाटानंतर व मेघगर्जनेनंतर पर्जन्यवृष्टि झालीच पाहिजे " असें म्हणणाऱ्या साक्रेतीसच्या अंगचा विनोद जरी आपणां सर्वांमध्यें असला नाहीं, तरी पण प्रत्येकास बऱ्याचश्या सांसारिक अडचणी व संकटें यांचा परामर्श विनोदी मनानें घेतां येईल, यांत संशय नाहीं. यदृच्छा किंवा इंग्रजींत ज्यास Circumstances असें म्हणतात, तिचा व मनुष्यमात्राचा सामना विषम आहे; म्हणजे एका बाजूस सर्वशक्तिमान् यदृच्छा व दुसरे बाजूस अल्पशक्तिमान् असे आपण मानवी प्राणी आहोंत. आणि असें हें विषमद्वंद्व जोंपर्यंत आपणांस जगावयाचें आहे तोंपर्यंत

चालणारच. ही गोष्ट नीट लक्षांत घेतली म्हणजे मग हरप्रसंगीं हातघाईवर किंवा उपायीं न येतां, विनोदरूपी मायावी शक्तीची आराधना करून तिच्या सामर्थ्याची मदत आपणांस घेतल्याशिवाय या द्वंद्वांत यश मिळणार नाहीं अशी तेव्हांच खात्री होते.

न० चिं० केळकर
( सुभाषित आणि विनोद )

**प्रश्न व सूचना**

( १ ) [ अ ] खालील वाक्यांचें स्पष्टीकरण कराः—

१ विनोद हा एक फिरता दिवा आहे.

२ यदृच्छा किंवा इंग्रजींत जिला Circumstances असें म्हणतात तिचा व मनुष्यमात्राचा सामना विषम आहे.

[ आ ] पुढील शब्दांचे अर्थ ( व शक्य असल्यास व्युत्पत्तिहि ) द्याः— वक्षःकपाट, उद्विग्न, अपथ्यकर, विहित, स्थितिस्थापकत्व, लहानसहान, अकांडतांडव, उपायीं येणें.

[ इ ] पुढील शब्द व शब्दसमूह यांचा वाक्यांत उपयोग कराः— वर्दळीवर येणें, विकोपास जाणें, खणपटीस बसणें.

( २ ) चिडखोर स्वभावामुळें नुकसान कसें होतें व तोच विनोदी स्वभाव असल्यास प्रसंगांतून कसें निभावून जातां येतें हें एखाद-दुसऱ्या नाट्यप्रवेशाचे द्वारें स्पष्ट करून दाखवा.

( ३ ) या उताऱ्यांतील दोन-तीन चांगले दाखले द्या. त्यांचे योगानें प्रतिपाद्य विषय सुबोध होऊन कसा सजविलाहि गेला आहे हें सांगा.

---

# न्यायाची सूक्ष्म दृष्टि

[ सुप्रसिद्ध नाटककार कृ० प्र० खाडीलकर यांच्या 'भाऊबंदकी' या नाटकांतून सदरहू प्रवेश घेतला आहे. नारायणराव पेशवे यांच्या वधाबद्दल रघुनाथराव व आनंदीबाई हीं जबाबदार आहेत असा लोकप्रवाद होता, व तत्संबंधीं

निवाडा देण्याचें काम त्या वेळचे प्रसिद्ध न्यायाधीश रामशास्त्री प्रभुणे यांचेकडे होतें. पुढील संवादांत रघुनाथराव, आनंदीबाई व रामशास्त्री यांच्या या बाबतींतील दृष्टि व वृत्ति यथार्थ रीतीनें दिग्दर्शित झाल्या आहेत. खाडीलकरांची या प्रवेशांतील भाषा रसाळ व ओजस्वी, स्वभावदिग्दर्शन स्पष्ट व मार्मिक, आणि तत्त्वदर्शन सूक्ष्म व गहन आहे. ]


कृ. प्र. खाडीलकर

**रामशास्त्री**—दादासाहेब, हा संशय मलाच येतो असें नाहीं तर लहानथोर सर्व लोक हाच संशय कुजबुजत असतात. आपण, आतां ह्या दासींच्या तोंडचे शब्द ऐकलेच आहेत; ह्या शब्दांवरून आपलेंहि मन आपणांस खात असावेंसें मला वाटतें.

**आनंदीबाई**—काय मेल्या ह्या मस्तवाल दासी तरी! लोकांना पडलेलीं स्वप्नें सगळ्या शहराला जाहीर करणाऱ्या ह्या गजघंटा मेल्या! शास्त्रीणबाईना माझ्या महालांत नेऊन बसवा जा, मीहि आलेंच. [ दासी व शास्त्रीणबाई जातात. ]

**दादासाहेब**—शास्त्रीबुवा, माझें मन खरें म्हणाल तर उदास झालें आहे. आजकालचे छत्रपति मला फार अपशकुनी दिसतात; आणि माझें मन असें सांगतें, कीं इजा, बिजा, तिजा होऊन चौथ्या पेशव्याला वस्त्रें देण्याचा प्रसंग ह्या छत्रपतीवर लवकरच येईल; म्हणून म्हणत होतों, ह्या पेशव्यांच्या गादीची मला कटकटच नको. पण हिचा हट्ट पुरविण्याकरितां पेशवाईचीं वस्त्रें धारण करण्याचें मी कबूल करीत आहें. अशा प्रसंगीं दरबारांत कोणत्याहि प्रकारचा बखेडा

नसावा, म्हणून आपण सांगाल तें प्रायश्चित्त घेऊन माझें मन शुद्ध आहे, हें दुनियेला जाहीर करण्यास मी तयार आहें. नारायण मारला गेला, ही गोष्ट वाईट झाली; आणि नारायणाच्या जागीं मी मारला गेलों असतों, तरी मला पतकरलें असतें; तेव्हां आमच्या कुळाला झालेल्या ह्या अपशकुनाकरितां कांहीं तरी शांत करणें जरूर आहे.

**आनंदीबाई**—शांत करायला कोण नको म्हणतें आहे ? मोठा दानधर्म करावा, जुन्या देवळांचा जीर्णोद्धार करावा, नव्या देवळांना वर्षासनें द्यावींत, आणि साधुसंतांना भंडारा करावा. पण प्रायश्चित्त काय म्हणून ? शास्त्रीबोवा, आपणच सांगा, दोषावांचून प्रायश्चित्त घेणें हें पाप नाहीं का ? आणि ह्या पापाबद्दल पुन: प्रायश्चित्त घ्यायला नको का ? गारद्यांच्या बोलाचालींत नारायण चुकून मारला गेला ही भयंकर चूक झालेली पाहून गारदी प्रथम भीतीनें गांगरून गेले; पण मग असेहि मरणार, तसेहि मरणार असें वाटून शनवार वाड्याची व सर्व शहरची लुटालूट करून येथून पळून जाण्याचा त्यांनीं बेत केला; अशा वेळीं इकडून जिवावर उदार होऊन सुमेरसिंग, खरकसिंग ह्यांची समजूत घालण्याचें झालें व गारद्यांना शांत करून पुणें शहरची व पेशवाईची अब्रू वांचविणें झालें; ह्याबद्दल का प्रायश्चित्त आम्हांला घ्यावयाला सांगतां ? हेंच का तुमच्या शास्त्र्यांच्या पोथ्यांत सांगितलें आहे ? नाहीं ग बाई, हे शास्त्री नसेल तेथें तंटा उपस्थित करतील. शास्त्रीबोवा, आपण मुख्य न्यायाधीश. इतर कज्जेदलाल शास्त्र्यांप्रमाणें आपण जर वागूं लागलां तर पृथ्वीतलावर न्यायच उरला नाहीं म्हणायचा !

**दादासाहेब**—शास्त्रीबोवा, ह्या अपशकुनाबद्दल शांत करावी, प्रायश्चित्त काय म्हणून घ्यावयाचें ? नारायणाच्या कैदेंतून मीं स्वत:ची

सुटका करून घेण्याचा प्रयत्न केला, हा अपराध होतो काय? आतां ही गोष्ट मी कबूल करतों, कीं आवेशांत गारद्यांच्या हातून भलतेंच कृत्य झालें. पण कैदेंत पडलेल्या ह्या राघोबाच्या हातून गारद्यांना कसेंबसें शांत करण्यापलीकडे दुसरें काय होण्यासारखें होतें?

**आनंदीबाई**—इकडच्या ऐवजीं आपणांवर जर शास्त्रीबुवा तो प्रसंग गुदरला असता, तर आपण काय केलें असतें? शास्त्रीबुवा, तुम्ही पेशव्यांचे कुळांत जन्मास आलां असतां, भाऊबंदकीमुळें तुम्हांला दोनतीन वेळां कैदेंत पडण्याचा प्रसंग आला असता, व शेवटीं निराश होऊन देवाचें नांव घेऊन कैदेंत तुम्ही दिवस कंठीत असतांना तुमच्याबद्दल हळहळणाऱ्या तुमच्या मित्रांनीं जर कैदेंतून तुम्हांला सोडविण्याचा प्रयत्न केला असता, आणि ह्या प्रयत्नांत त्यांच्या हातून चुकून जर तुमच्या भाऊबंदांपैकीं एकादा मारला गेला असता तर काय तुम्हीं आपल्या मित्रांना दूर लोटून दिलें असतें आणि प्रायश्चित्त घेतलें असतें?

**रामशास्त्री**—दादासाहेब, हें मी कबूल करतों, कीं तुम्ही निर्दोषी असण्याचा संभव आहे. आपआपसांतील भांडणांचा काल आहे; आणि ह्या भांडखोर कालाबद्दल तुम्हांला एकट्याला तरी दोष कां द्यावा? परंतु हा भाऊबंदकीचा घातुक प्रघात पेशव्यांचे घराण्यांत ज्या कारणामुळें पडला, त्या कारणांत तुमची स्वतःची जर प्रमुखत्वें-करून गणना झाली नसती, आणि जी दुष्ट भाऊबंदकी तुम्हीं माजविली, तिचा शेवट जर वारसदार पेशव्यांचे खुनांत झाला नसता, तर तंट्याबखेड्याच्या ह्या काळांत तुमचा एकादा नातेवाईक तुमच्या पक्षपाती मित्रांकडून चुकून मारला गेल्याबद्दल आपणांस मीं प्रायश्चित्त घेण्यास सांगितलें नसतें.

**आनंदीबाई**—आम्ही अखेरीस पेशव्यांचे गादीवर बसलों, एवढ्याचकरितां प्रायश्चित्त घ्यावयाचें, असेंच ना आपलें म्हणणें ? श्रीमंतांची श्रीमंती शेजाऱ्यापाजाऱ्यांचा विश्वासघात केल्याशिवाय प्राप्त झालेली नसते, आणि अधिकाऱ्यांची सत्ता दोस्तांच्या माना मुरगळल्याशिवाय वाढलेली नसते, असल्या शाब्दिक सिद्धान्तांवर भार ठेवून एखाद्यास पुरव्याशिवाय दोषी ठरविणें हें विद्वान् व निःस्पृही म्हणून नांवाजलेल्या रामशास्त्र्यांना तरी शोभत नाहीं. श्रीमंती व सत्ता ही परमेश्वरी शक्ति नसून पापाची जर हुंडी असेल, तर सर्व श्रीमंतांना व सत्ताधाऱ्यांना रोज प्रायश्चित्त घ्यावें लागेल.

**रामशास्त्री**—होय ! बाईसाहेब, आपण म्हणतां तें खोटें नाहीं. सर्व श्रीमंतांनीं व सत्ताधाऱ्यांनीं रोजच्या रोज प्रायश्चित्त घेतलें पाहिजे. पापाप्रमाणें पुण्याचेहि रोप्यांना श्रीमंती व सत्ता हें चांगलें खत आहे, असें नारायणरावसाहेबांचा खून होण्यापूर्वीं मला वाटत होतें; आणि म्हणूनच सत्ताधारी श्रीमंतांच्या आश्रयाला राहून पुण्यवृक्ष वाढीस लावावा, म्हणून मीं न्यायाधीशाची नोकरी पत्करली; पण बाईसाहेब, मला आतां असें वाटतें, कीं पुण्याचा फैलाव गरिबींत जितका निर्दोष व जोराचा असूं शकतो, तितका श्रीमंतींत असत नाहीं. पापाचा विषवृक्ष श्रीमंतींत निरंकुश फोंफावत जातो, पण गरिबींत पाप कितीहि मुरदाडपणानें जिवंत राहिलें तरी त्याला वर डोकें करतांच येत नाहीं. म्हणून बाईसाहेब, आपण म्हणतां तेंच खरें. गरिबापेक्षां श्रीमंतांना रोजच्या प्रायश्चित्ताची जरूरी अधिक आहे.

**दादासाहेब**—शास्त्रीबुवा, आपण म्हणतां ती गोष्ट मला अक्षरशः कबूल आहे. पेशव्यांची सत्ता मीं आपल्या हातांत घेतली आहे, आणि ह्या सत्तेचा दुरुपयोग करण्याकडे मनाची प्रवृत्ति होऊं नये,

म्हणून परमेश्वरास साक्षी ठेवून रोजचे रोज प्रायश्चित्त घेण्यास मला कांहींच कमीपणा वाटत नाहीं. पण नारायणाच्या खुनासंबंधानें प्रायश्चित्त—

**आनंदीबाई**—आम्हीं कां म्हणून घ्यावें ? आम्ही खुनी आहों, असें जर प्रायश्चित्त घेऊन आम्हीं उगीचच्या उगीच कबूल केलें, तर आमचा विश्वास आमच्या मुत्सद्द्यांना, कारभाऱ्यांना, सरदारांना, जहागिरदारांना, सैनिकांना व लोकांना कसा पटेल ?

**रामशास्त्री**—आपला विश्वास सर्वांना पटावा, म्हणूनच मी आपणांस प्रायश्चित्त घेण्यास सांगत आहें. दादासाहेब, आपण जर खरोखरच खुनी असतां, तर पेशव्यांच्या गादीवर आपणांस बसतांच आलें नसतें, आणि असल्या नराधमानें पेशव्यांची गादी विटाळली असतां, एक क्षणभरही पुणें शहरांत वास करावासें मला वाटलें नसतें. बाईसाहेब, प्रत्यक्ष खून केल्याचा आरोप आपणांवर नाहीं, तथापि संशयाला जागा पुष्कळ आहे. हा संशय दूर करण्याकरितां आणि असला संशय उत्पन्न होण्याइतकें तरी तुमचें वर्तन अस्पष्ट होतें, ह्याबद्दल तुम्हांला खरोखर वाईट वाटत आहे, हें सर्वांच्या प्रत्ययाला आणण्याकरितां, दादासाहेब, आपण प्रायश्चित्त घेऊन मोकळें झालें पाहिजे.

**आनंदीबाई**—पण आमचा संशय तरी लोकांना कां यावा ? आम्हीं काय असें लोकांचें घोडें मारलें आहे ?

**रामशास्त्री**—बाईसाहेब, आपण लोकांचें घोडें मारून लोकांना पायीं चालावयास भाग पाडलें असतें, तरी पतकरलें असतें. पण दादासाहेब, तुमच्या फाजील महत्त्वाकांक्षेला लोकांचे हितकर्ते—नेते— बळी पडल्यामुळें तुम्हीं लोकांना पांगळें केलें आहे. दादासाहेब, आम्हीं तुमच्या नांवानें कां खडे फोडूं नयेत ? ज्या दुहीनें

पानिपतास अपयश येऊन दख्खनचे सर्व कर्ते पुरुष मारले गेले, त्या दुहींपैकीं एका पक्षाचे प्रवर्तक तुम्ही आणि तुमचे बापू होतां. पानिपतच्या अपयशानें तुम्ही शुद्धीवर आलां नाहीं, आणि राव-साहेबांच्या कारकीर्दीचे प्रारंभीं रावसाहेबांचा अधिकार कबूल करण्यापेक्षां निजामचा दिवाण विठ्ठल सुंदर याचे घरीं पाणी भरून, धोतरें बडवून, शागीर्द[1] होऊन राहणें बरें, असें तुम्हांला व बापूंना वाटलें ! दादासाहेब, मी तुम्हांला विचारतों, स्वतःच्या गुणांचें व लायकीचें चीज करून दाखविण्याकरितां हा उद्योग होता काय ?

**आनंदीबाई**—त्या माधवाला वडील कोण, कर्ते कोण, सेना-नायक कोण हेंच जेव्हां समजेनासें झालें, तेव्हां लहान तोंडीं मोठा घांस घेऊं नये, हें त्याला शिकविण्याकरितां इकडून निजामा-चीं आर्जवें करणें झालें; आणि बापूंनीं विठ्ठल सुंदरची मन-धरणी केली ह्यांत काय वावगें झालें ?

**रामशास्त्री**—बाईसाहेब, ह्याच कारणामुळें दादासाहेबांवर आज संशय येत आहे. स्वतःचा खासगी नफातोटा संभाळण्या-करितां तुमच्या कुळाच्या, तुमच्या लोकांच्या, तुमच्या देशाच्या, तुमच्या राजाच्या, तुमच्या धर्माच्या शत्रूंनाहि मिळण्यास दादा-साहेब कमी करणार नाहींत, असा दादासाहेबांचा दुर्लौकिक राव-साहेबांच्या कारकीर्दींत झाला; आणि ह्या दुर्लौकिकामुळेंच राव-साहेबांच्या पक्षास मिळून रावसाहेबांच्या वेळीं आणि रावसाहेब स्वर्ग-वासी झाल्यावरहि तुम्हांस अटकेंत ठेवण्यास संमति देऊन, बापूंना आपली अब्रू संभाळावी लागली. दादासाहेब, हा तुमचा घरबुडवे-पणाचा दुर्लौकिक आज पेशव्यांच्या खुनामुळें नव्या[2] पाण्याचे वेळीं

---

१ (फारसी) मूळ अर्थ शिष्य, नोकर. २ ज्याला पिसाळलेलें कुत्रें चावलें आहे त्याचा रोग पावसाळ्याचे सुरुवातीस विकोपास जातो अशी समजूत आहे.

बाहेर पडणाऱ्या कुत्र्याच्या विषाप्रमाणें, पुन्हा चोहोंकडे जोरानें पसरला आहे. आपण कदाचित् खून करण्यास हुकूम दिला नसेल ही गोष्ट मी कबूल करतों; पण तुमचा जर असा दुर्लौकिक नसता तर नारायणरावांवर तलवार चुकून तरी चालविण्याची गारद्यांची काय छाती होती? पूर्वींच्या व आतांच्या ज्या कृत्यांमुळें तुमचा हा असा दुर्लौकिक झाला तीं कृत्यें तुम्हांला, तुमच्या कुळाला, तुमच्या जातीला, तुमच्या लोकांना, तुमच्या देशाला व तुमच्या धर्माला नरकांत टाकणारीं आहेत. दादासाहेब, प्रायश्चित्त न घेण्याचा बाईसाहेबांचा हट्ट जर आपण ह्या वेळीं पुरविला, तर ह्या दुष्कृत्याबद्दल दादासाहेबांना पेशव्यांचे खुनानंतरही पश्चात्ताप झालेला नाहीं, असें पाहून आपल्या हुकमतीखालीं प्रामाणिकपणानें व एकनिष्ठेनें पेशव्यांच्या गादीची सेवा करण्यास कोण तयार होईल? मला जें वाटलें तें मीं आपल्या, माझ्या व सर्व लोकांच्या कल्याणाकरितां स्पष्टपणानें आपल्या कानांवर घातलें आहे.

**दादासाहेब**—शास्त्रीबोवा, आपण म्हणतां त्याप्रमाणें प्रायश्चित्त घ्यावें असें मलाहि वाटतें. एकदोन दिवसांत हिची समजूत घालून आपण सर्व ठरवाल त्याप्रमाणें प्रायश्चित्त घेऊन मोकळे होऊं. चला, आपण आतां गणेशमहालांत जाऊं आणि बापू, नाना वगैरे मंडळी आली असतील, त्यांची सल्ला घेऊन पुढील बेत ठरवूं.

[ दादासाहेब व रामशास्त्री जातात.

**आनंदीबाई**—( स्वगत ) भोळे! खरोखर भोळे! दरडावून जोरानें कोणीं बोललें म्हणजे ह्यांना त्यांचें म्हणणें खरें वाटतें. ह्या भोळेपणानेंच ह्यांच्या नांवाचा असा दुर्लौकिक झाला आहे. आज माधवाच्या नादीं, तर उद्यां बापूंच्या चरणीं, काल माझ्या मुठींत तर उद्यां रामशास्त्र्यांच्या तावडींत अशी ह्यांची दुर्दशा रोज होत

आहे. माझ्या सौंदर्याची छाप ह्यांच्यावर कशी बसवावी हें मला चांगलें कळूं लागलें म्हणून पेशव्यांच्या पदाला हे येऊन पोंहोचले. नाहीं तर ह्यांची झळकणारी समशेर भस्माच्या किंवा तिळांच्या राशींत रामशास्त्र्यांसारख्या जडबुद्धींनीं व बापूंसारख्या आपलपोट्यांनीं एव्हांना पुरून टाकिली असती ! दुर्लौकिकाला आळा घालण्याकरितां प्रायश्चित्त म्हणे ! धर्मशास्त्रांत रामशास्त्र्यांची बुद्धि तीव्र असेल, पण माझ्या पायांपाशीं बसून कित्येक वर्षें ह्यांनीं राजकाजाचे पाठ घेतले पाहिजेत. एका खुनाचें पिशाच्च आणखी दहावीस खून करून गाडावें लागतें ! राजकाज आणि धर्मशास्त्र हीं अगदीं निराळीं आहेत. नारायणाचें पिशाच्च गाडण्याकरितां जर आम्हीं प्रायश्चित्त घेतलें आणि ही खुनाच्या कबुलीची बातमी जर सर्व देशभर पसरली. तर झोंपड्यांतील, खेड्यांतील, शहरांतील सर्व जिवंत माणसें पिशाच्चें होतील; आणि ह्या खवळलेल्या लोकसमुदायाच्या समंधाला गाडतां येणें अशक्य होऊन देहान्त प्रायश्चित्ताची पाळी आम्हांवर येईल. नाहीं. मी प्रायश्चित्त नाहींच घेऊं द्यायची !

कृ० प्र० खाडीलकर
(भाऊबंदकी)

### प्रश्न व सूचना

( १ ) [ अ ] पुढील शब्दांचा अर्थ सांगून त्यांचा वाक्यांत उपयोग करून दाखवाः—गजघंटा, कज्जेदलाल, नांवानें खडे फोडणें.

[ आ ] पुढील समासांचा विग्रह कराः—देहान्त (प्रायश्चित्त), अपशकुन, बोलाचाली.

[ इ ] शान्त व प्रायश्चित्त यांत फरक काय ?

( २ ) खाडीलकरांची भाषा रंगभूमीवर फार परिणामकारक होते असें म्हणतात. या उताऱ्यांतील उदाहरणें देऊन या वचनाचें समर्थन करा.

(३) नारायणरावाचे वधाचे बाबतींत आनंदीबाईचा दोष सिद्ध होत नाहीं असें म्हणणारा सरदेसाई, वाकसकर वगैरेंचा पक्ष आहे. या पक्षाचें मत काय आहे हें त्यांच्या लेखांवरून सवडीनुसार समजावून घ्या.

---

# माझा पहिला डुकर

[ मराठीमध्यें शिकारीसंबंधाचे वर्णनपर असे लेख फारसे नाहींत. जनरल नानासाहेब शिंदे यांनीं कांहीं थोडेसे लेख लिहिले आहेत तेवढेच. नानासाहेब हे धंदेवाईक लेखकवर्गापैकीं नाहींत, तथापि विषयाची पूर्ण माहिती व त्यांत रंगून जाण्याची पात्रता, या दोन गोष्टींमुळें वर्णन सुरस होऊं शकतें हें पुढील उताऱ्यावरून दिसून येईल. ]

हत्ती, गेंडा, सिंह, वाघ, अस्वल, टेंडवा वगैरे जातींच्या हिंस्र पशूंची शिकार बंदुकीनें केली जाते. या शिकारीमध्यें धैर्यापेक्षां निशाणबाजीलाच फार महत्त्व दिलें जातें. उत्तम गोळी मारणारा वाटेल त्या हिंस्र जनावराची शिकार सहज लीलेनें करूं शकतो. याशिवाय या जनावरांपासून आपणांस अपाय होणार नाहीं अशा सुरक्षित जागीं अगर मैदानावर बसून ही शिकार केली जाते. रानडुकराची शिकारहि बंदुकीनें केली जाते. परंतु घोड्यावरून भाल्यानें रानडुकर जमिनीवर लोळवण्याची 'मजा कुछ और है'. ज्यानें ही शिकार स्वतः केली आहे, त्यासच यांत काय मजा आहे व किती जोखम आहे याची चांगली कल्पना करतां येईल. इतरांस तशी


ज. नानासाहेब शिंदे

कल्पना केव्हांहि करितां येणार नाहीं. रानडुकरासारखा जवानमर्द, साफ लढणारा दुसरा प्राणी नाहीं. पोटांतील आंतडीं बाहेर पडून जमिनीवर लोळत असलीं, तरी तो शिकाऱ्याबरोबर व त्याच्या घोड्याबरोबर सारखा पळत, लढत असतो. त्याच्या आटोक्यांत शिकारी अगर त्याचा घोडा आला, कीं त्यानें त्याला जमिनीवर लोळवलेंच म्हणून समजावें; आणि शिकारी एकदां घोड्यावरून खालीं आला, व त्याच्या मदतीस त्याचा कोणी साथीदार नसला, कीं त्या शिकाऱ्याचीं शंभर वर्षें पुरीं भरलींच म्हणून समजावें. जखमी झालेला डुकर तीनचार शिकाऱ्यांच्या भाल्यांबरोबर कशी टक्कर घेत असतो ही पाहण्याची फारच मौज असते.

रानडुकराची शिकार करण्याकरितां उत्तम तयार केलेला घोडा पाहिजे, त्यावर पटाईत बसणारा पाहिजे व त्या स्वारास पुष्कळ धैर्य व समयसूचकता पाहिजे. त्यानें जरा चूक केली, तर डुकराला लोळवण्याऐवजीं स्वतःलाच जमिनीवर लोळावें लागतें; अगर घोडा कायमचा जायबंदी होतो. या कारणाकरितांच सर्व शिकारी जनावरांमध्यें रानडुकराची शिकार घोड्यावरून भाल्यानें करण्यामध्यें खरा मर्दपणा समजला जातो. युरोपिअन लोक या शिकारीस फार महत्त्व देतात. या शिकारीमध्यें दोनचार अपघात तर सहज होतात. कादीर क्लब, गुजराथ क्लब, दिल्ली क्लब, कानपूर क्लब, याप्रमाणें हिंदुस्थानांत या शिकारीचे खास क्लब आहेत. या क्लबांच्या मार्फत दरवर्षीं ठरलेल्या मोसममध्यें डुकराची शिकार करण्यांत येते. पूर्वीं महाराष्ट्रामध्यें नगर क्लब, भीमा क्लब या नांवाचे क्लब होते; परंतु हल्लीं महाराष्ट्रामध्यें कोणीहि शिकारी या शिकारीचा षोकिन नसल्यानें हे क्लब बंद झाले आहेत. दुर्दैव बिचाऱ्या महाराष्ट्राचें आणि त्याबरोबर महाराष्ट्रांतील मराठ्यांचें !

तीस वर्षांपूर्वींची गोष्ट आहे. कॉलेज सोडून फौजेंत नोकर होऊन मला पुरतें एक वर्षहि झालें नव्हतें. उमर विशीच्या आंत. घोड्याचा फार षोक. माझ्या रिसाल्यांतील कांहीं जुन्या अंमलदारांनीं मला डुकराच्या शिकारीसाठीं डबक्यास बरोबर नेलें, संक्रांतीनंतर दरवर्षीं डबक्यास डुकराच्या शिकारीसाठीं मोठा जलसा होत असे. डबका बडोद्यापासून १८ मैल आहे. या ठिकाणीं मही नदीच्या कांठीं डुकरांसाठीं खास जंगल राखून ठेवलेलें आहे. या जंगलाचा बंदोबस्त शिकारखान्याकडून ठेविला जातो. या जंगलांत कोणासहि बंदुकीनें शिकार करूं देत नाहींत. या जंगलांतील डुकराची शिकार घोड्यावरून केली जाते. श्रीमंत खाशांशिवाय इतरांस या जंगलांत शिकार करण्याची बंदी आहे. शिकारीसाठीं दरवर्षी युरोपिअन मेहमान[1], लष्करी अंमलदार, सरदार, मानकरी, आप्तस्वकीय मंडळी व सर्व खाशांच्या स्वाऱ्या जनान्यासहित डबक्यास जात असत. तेथें एक आठवडाभर मुक्काम पडत असे; दोन हेक्के[2] करीत असत. पहिल्या दिवसाचा मोठा हक्का होत असे व नंतर लहान हक्का होत असे.

शिकारीच्या आदल्या दिवशीं निरनिराळ्या पार्ट्या वांटण्यांत आल्या. आमच्या पार्टीत माझ्यासारखीच दुसरी नवीन तरुण मंडळी होती. आम्ही नवशिके. कधीं जंगल पाहिलें नाहीं, किंवा डुकराची शिकारहि केलेली नाहीं, म्हणून आमच्या पार्टीस अगदीं एका कोपऱ्यांत ठेवण्यांत आलें होतें. हक्का सुरू झाला. डुकर जंगलांतून बाहेर पडून त्यांच्यामागें दुसरे लोक घोडे पळवूं लागले; परंतु आमच्या बाजूस एकहि डुकर निघाला नाहीं. शिकार करण्यास आम्ही सर्वजण अतिशय उतावीळ. परंतु दिलेली जागा न सोडण्याबद्दल शिकार-सुपरिंटेंडेंट यांचा सक्त हुकूम असल्यामुळें

---

१ पाहुणे. २ हांका, हकाटी, जनावर उठविण्यासाठीं केलेली आरडाओरड.

जागेवरच आम्ही डुकराची मार्गप्रतीक्षा करीत उभे होतों. बारा वाजले तरी आमचा कांहीं योग आला नाहीं.

आम्ही अगदीं निराश झालों होतों, इतक्यांत कर्मधर्मसंयोगानें श्रीमंत सयाजीराव महाराजसाहेब हे त्या बाजूनें शिकार करून हत्तीवरून परत जात असतां, त्यांनीं आम्हांस पाहिलें. हत्ती उभा करून विचारलें कीं, "का हो मंडळी, शिकार केली कीं नाहीं?" आम्हीं डुकरच पाहिला नाहीं म्हणून सांगितलें. त्यावरून महाराजांनीं हत्ती मागें फिरविला व म्हणाले कीं, "चला, मी तुम्हांला डुकर दाखवितों." असें म्हणून त्यांनीं आम्हांस एका पिलूमध्यें[1] बसलेला मोठा डुकर दाखविला. तो बाहेर पडतांच आम्हीं सर्वांनीं त्याचे-मागें घोडे घातले. आमच्यापैकीं एका गृहस्थास घोड्यावर चांगलें बसतां येत नव्हतें, म्हणून ते सर्वांबरोबर न निघतां आपल्या घोड्याचा लगाम दोन्ही हातांनीं खेंचून त्यास थांबवीत होते. परंतु दुसरे घोडे पुढें गेल्यानें त्यांचाहि घोडा त्यांस घेऊन जोरानें निघाला व लौकरच ते खालीं आले. दुसऱ्याचा घोडा खाडचांत पडल्यानें कायमचा लंगडा झाला. मीं डुकरास भाला मारण्याचा प्रयत्न केला; परंतु भाला डुकराच्या अंगांत न शिरतां जमिनींत शिरला, व त्याचें दुसरें टोंक माझ्या छातीस लागल्यानें व घोडा पळत असल्यानें भाल्याचे तुकडे झाले. माझ्या छातीस बराच मोठा धक्का बसला, तरी त्यास न जुमानतां दुसरा भाला घेऊन मी त्याच्यामागें लागलों. आम्ही दोन तीन मैल डुकराच्या मागें गेलों; परंतु तो महीच्या कोतरांत[2] घुसला. आम्ही या शिकारीस अन्‌वाकब असल्यामुळें आम्हीं-हि आमचे घोडे त्याच्यामागें कोतरांत घातले. पुढें तो कोतरांत

---

१ पिलू = करवंदीच्या झुडपांसारख्या जुडपांची जाळी. २ (गुजराथी) नदीच्या किनाऱ्याला प्रवाहानें पडलेले खोल खाडे.

दिसेनासा झाल्यावर आम्हीं आमचे घोडे मागें फिरवूं लागलों, तेव्हां समजलें, कीं घोड्यास फिरविण्यास ही पुरी जागा नाहीं. तेव्हां सर्वजण घोड्यावरून खालीं उतरलों व हातांत घोडे धरून हळुहळू कोतर उतरलों. या आमच्या मूर्खपणाबद्दल मुक्कामावर परत आल्या-वर आम्हांस जुन्या शिकारी मंडळींनीं फार ठपका दिला. "ऐसी शिकार करोंगे तो कुत्तेके मोत[1]से मर जावोंगे." असें ते म्हणाले. आमची शिकारहि झाली नाहीं, आणि वर ही दक्षिणा, यामुळें मी फार खजील झालों होतों.

दुसऱ्या दिवशीं पुनः हक्का झाला. पहिल्या दिवशीं आमच्या पार्टीस अपयश आलें असल्यामुळें दुसऱ्या दिवशीं आज डुकर खास मारावयाचा असा आमच्या पार्टीनें निश्चय केला होता. माझ्या छातीस लागल्यानें ती सुजली होती, तीस रात्रीं शेक वगैरे करून मी तयार झालों होतों. कर्मधर्मसंयोगानें आम्हांस शिकारी-ची वाट पाहण्यास जागाहि चांगली मिळाली होती. हक्का सुरू झाला. हक्केवाल्यांचें ओरडणें लांबून ऐकूं येत होतें. हक्का जसजसा जवळ येऊं लागला, तसतसे आमचे घोडे कान टंवकारून थैमान करूं लागले. अशा संधीस आमच्या जवळील झाडींतून डुकरांचा एक टोळा बाहेर पडला. त्यास पाहतांच आम्हीं सर्वांनीं आपले घोडे त्याच्यामागें घातले. टोळ्यापैकीं एक मध्यम असा डुकर पाहून मी त्याचेमागें लागलों. बऱ्याच अंतरावर त्याचेमागें गेल्यावर माझा पहिला भाला लागून तो डुकर जमिनीवर पडला; परंतु लगेच उठून पुनः पळूं लागला. मी त्याचे पाठीवर होतोंच; इतक्यांत माझे दुसरे साथीदारहि तेथें आले. आम्हीं सर्वांनीं मिळून अखेर

---

१ मरणानें.

त्यास एका गव्हाच्या शेतांत ठार केला. त्या वेळीं आम्हीं मोठें शूरपणाचें कृत्य केलें असें वाटून आम्हांस जो आनंद झाला तो वर्णन करतां येत नाहीं.

इतर पार्ट्यांतील मंडळींनीं आमच्यापेक्षांहि मोठमोठे डुकर मारले होते, व आमचा डुकर त्यांच्या मानानें जरी लहान होता, तरी आम्हांस त्याची किंमत त्या वेळीं फार वाटली. पुढें श्रीमंत सरकार महाराजसाहेब व कैलासवासी श्रीमंत युवराज फत्तेसिंगराव यांच्या पार्ट्यांत राहून चांगल्या तरबेज केलेल्या घोड्यावरून मोठमोठे डुकर मारण्याचे मला पुष्कळ प्रसंग आले. तरी पण माझ्या पहिल्या डुकराइतका आनंद मला केव्हांहि झाला नाहीं.

डुकराच्या शिकारीमध्यें पहिला भाला ( First Spear ) ही एक महत्त्वाची बाबत समजली जाते. प्यारा २ मध्यें या शिकारीचे जे क्लब दिले आहेत, त्या क्लबचे जेव्हां शिकारीचे सामने होतात, तेव्हां अखेर ज्याचा पहिला भाला ठरविण्यांत येईल त्यासच बक्षिसाचा प्याला मिळतो. निष्णात शिकाऱ्यास व उत्तम तरबेज केलेल्या घोड्यासच हा मान मिळतो. या शिकारीचा सर्व खेळ घोड्यावर अवलंबून आहे. चांगला तरबेज केलेला घोडा डुकरानें कितीहि झुकांड्या दिल्या तरी त्याची पाठ सोडीत नाहीं. वरील स्वाराचें काम प्रसंगावधान ठेवून नुसता सफाईनें भाला मारण्याचें असतें. घोड्यानें दगा दिला कीं, वरील स्वार जखमी झालाच म्हणून समजावें. या शिकारीमध्यें भाला मारण्याचे दोन प्रकार आहेत. पहिला प्रकार म्हणजे वरून पाठीमधून काळजाचे आरपार जाईल असा उभा भाला मारणें हा होय; यास इंग्रजींत Overhand Spear असें म्हणतात. हा भाला आंखुड असतो, व मारणारा फार निष्णात लागतो व त्यास डुकरास अगदीं आपल्या घोड्याजवळ येऊं

द्यावें लागतें. भाल्याचा हात चुकला तर घोड्याच्या पायांत भाला घुसण्याची भीति असते. दुसरा प्रकार म्हणजे डुकरास आपल्या घोड्याचे उजवे बाजूस थोड्या अंतरावर घेऊन त्याच्या डाव्या बरगडींतून काळजाच्या आरपार भाला मारणें हा होय. यास इंग्रजींत Underhand Spear असें म्हणतात. हा भाला ८ फूट लांब असतो.

मराठेशाहीच्या अमदानीमध्यें डुकराची शिकार करण्याची हौस महाराष्ट्रांत व कोंकणांत सर्व मराठ्यांस होती. संक्रांतीच्या करीच्या दिवशीं डुकराची शिकार करून ती खाल्ल्याशिवाय परत यावयाचें नाहीं असा कित्येक गांवच्या मराठ्यांचा प्रघात असे. मराठ्यांच्या साम्राज्याबरोबर मराठ्यांच्या खालचे घोडेहि गेले, व हातांतील भाले-हि नाहींसे झाले. तरी पण एकादा रानडुकर गांवाजवळील जंगलां-तून उठल्याची हूल लागतांच पांचपन्नास मंडळी हातांत कुऱ्हाडी, कोयते व दंडे घेऊन डुकराच्या मागें अद्यापहि जातात. इतकी या शिकारीची मराठ्यांस आवड आहे. रजपूत लोकहि या शिकारीस फार मान देतात. रजपूत संस्थानांमध्यें ही शिकार दरवर्षी नेमानें केली जाते. जोधपूरचे कै० महाराजा प्रतापसिंह हे डुकराचे शिकारींत फार निष्णात म्हणून त्यांची प्रसिद्धि होती. त्यांच्या वेळीं जोधपुरांत डुकराची शिकार घोड्यावरून तलवारीनें करीत असत. भाल्यापेक्षां तलवारीनें शिकार करण्यामध्यें जास्त चलाखी व जोखम असते.

बडोद्याप्रमाणें कोल्हापुरासहि डुकराच्या शिकारीचा फार षोक आहे. कोल्हापूरचे राजपुत्र डुकराचे शिकारींतच घोड्यावरून पडल्यानें कैलासवासी झाल्याचें सर्वांस माहीत आहेच. मराठा संस्थानांमध्यें व खालसा मुलखांतहि या शिकारीचा षोक तरुणांस

व्हावा याच हेतूनें हा लेख लिहिण्यांत आला आहे. शेवटीं या मर्द जनावरास सलाम करून मी हा लेख पुरा करतों.

ज. नानासाहेब शिंदे
(रत्नाकर–जुलै १९२६)

**प्रश्न व सूचना**

(१) [अ] " पार्ट्यांतील लोकांनीं आमच्यापेक्षांहि मोठमोठे डुकर मारले व आमचा डुकर त्यांच्या नामानें जरी लहान होता तरी आम्हांस त्याची किंमत त्या वेळीं फार वाटली."–किंमत फार कां वाटली याचें पांच ओळींत विवेचन करा.

[आ] " शेवटीं या मर्द जनावरास सलाम करून मी हा लेख पुरा करतों."—या सलाम करण्यांत काय अर्थ भरलेला आहे याचें पांच ओळींत विवेचन करा.

(२) 'शिकारीपासून फायदे व तोटे' काय यावर निबंध लिहा. शिकारीमध्यें जीविताला धोका असला तर ती त्याज्य आहे. बरें धोका नसला तर तींत मौज नाहीं.–या शृंगापत्तींतून (पेंचांतून) बाहेर कसे पडाल?

(३) [अ] शंभर वर्षें पुरीं भरणें, घोड्यावरून खालीं येणें—यांचा वाक्यांत उपयोग करून दाखवा व त्यांचा अर्थ सांगा.

[आ] शब्दांवर टीपा द्याः—अन्नशाकब, षोकीन, मार्गप्रतीक्षा.

[इ] व्युत्पत्ति द्या—पटाईत.

---

# शिवाजी

[ शिवाजीला आपण 'अवतारी पुरुष' म्हणतों हें सामान्य बोलण्याच्या दृष्टीनें ठीक आहे, पण 'अवतारी पुरुष' म्हणजे काय याचा अभ्यासकांनीं विचार केला पाहिजे. तसेंच शिवाजीसारख्यांचे उत्सव आपण करतों यांत कांहीं वावगें नाहीं; पण असले उत्सव कां करावेत, कसे करावेत याचाहि आपण विचार केला पाहिजे. या प्रश्नांसंबंधीं प्रो० लट्टे यांचे कांहीं विचार खालीं दिले आहेत ते विद्यार्थ्यांना उद्बोधक होतील यांत शंका नाहीं. ]

शिवाजीमहाराजांचा त्रिशतसांवत्सरिक उत्सव हिंदुस्थानांत अनेक ठिकाणीं करण्यांत आला ही अभिनंदनीय गोष्ट होय. शिवाजीमहाराज हे केवळ महाराष्ट्रांतीलच नव्हे तर साऱ्या जगांतील श्रेष्ठतम व्यक्तींत प्रामुख्यानें गणण्यासारखे अलौकिक कर्तृत्वाचे पुरुष होऊन गेले याबद्दल आधार दाखवीत बसण्याची आवश्यकता आतां उरलेली नाहीं. मात्र दोन महिन्यांपूर्वीं झालेल्या उत्सवावरून एक विचार सुचतो, तो नमूद केल्यावांचून राहवत नाहीं. एखाद्या व्यक्तीच्या ठिकाणीं पराक्रम दिसला म्हणजे त्या व्यक्तींत देवपण कल्पिण्याची आणि त्या व्यक्तीचें मोठेपण समजून घेण्याऐवजीं तिची पूजाअर्चा करण्याची आम्हां हिंदु लोकांत नैसर्गिक प्रवृत्ति आहे. ही प्रवृत्ति शिवाजीमहाराजांच्या बाबतींतहि दिसून येते. आमच्या अंगीं असाधारण कृतज्ञताबुद्धि वसत असल्याचें या प्रवृत्तीवरून सिद्ध होत असेल; परंतु त्याबरोबर आमच्या बुद्धीचें हीनत्वहि त्यावरून स्पष्ट दिसल्यावांचून राहात नाहीं. या आमच्या पूजाप्रवृत्तीचा सर्वांत मोठा दुष्परिणाम हा, कीं ज्या थोर व्यक्तींच्या चरित्रांचा प्रकाश वास्तविक आजच्या आमच्या हातांतील कार्यावर पडून आम्हांस आमचा मार्ग स्वच्छ दिसावयास मदत व्हावयाची त्या व्यक्तींची स्थापना उंच स्वर्गांत झाल्यामुळें त्यांचा आमचा कसलाच संबंध उरत नाहीं. उंच आकांक्षांतील तेजोगोल ज्याप्रमाणें आम्हांला परके वाटतात, त्याप्रमाणें आमच्या राष्ट्रांत होऊन गेलेल्या थोर पुरुषांचा आमच्या आयुष्याशीं कसलाच जिव्हाळ्याचा संबंध नाहीं अशी भलती भावना आम्ही उराशीं धरून बसतों. लांब क्षितिजावर असलेले प्रचंड मेघ जसे आम्हांला मोठे पण पुसट दिसतात, तशींच या थोर पुरुषांचीं चरित्रें आम्हांला पुसटपुसटच दिसलीं पाहिजेत, अशी आम्ही आपली कल्पना करून घेतों. त्यामुळें

आमच्या राष्ट्रीय परंपरेवर आणि आकांक्षांवर या थोर चरित्रांचा परिणाम व्हावा तसा मुळींच होत नाहीं. इतिहासाचें शुद्ध स्वरूप बदलून त्याचें पुराणांत रूपांतर होतें. आणि मानवी व्यवहार अधिकाधिक सुज्ञतेचा व्हावा हें जें इतिहासाचें खरें कार्य त्याला अवकाशच राहात नाहीं. शिवाजी हा महादेवाचा अवतार होता, त्याचें अवतारकार्य आधींपासून निश्चित झालेलें होतें व भवानी-देवीच्या आशीर्वादामुळें त्यानें आपल्या शत्रूंचें निर्दालन केलें, असें म्हटल्यानें शिवाजीची थोरवी खरें पाहतां आपण कमी करतों. जगत्सूत्रचालक अशा परमेश्वराच्या कृपेमुळेंच शिवाजीनें महत्कार्य केलें असें समजल्यास शिवाजीची कर्तबगारी ती कोठें उरली ? व मग देवाच्या पायांशीं लोटांगण घालण्यापलीकडे दुसरा कोणता बोध आपल्याला त्याच्या चरित्रापासून घेतां घेईल ? मला कोणी नास्तिक म्हटलें तरी तो दोष पत्करून मी असेंच म्हणेन, कीं आमच्या थोर थोर व्यक्तींच्या चरित्राभोंवतीं गूढतेचें आवरण घालण्याची, आकाशां-तील धुक्यांत त्यांची स्थापना करण्याची, आणि त्यांचा थोरपणा पराक्रमाऐवजीं ईश्वराच्या प्रसादावर अवलंबून होता असा भ्रम मनाशीं धरण्याची संवय आमच्या देशबांधवांनीं सोडली पाहिजे. शिवाजी हा शिवाचा अवतार होता असें समजण्यापेक्षां मानवी सामर्थ्याच्या जोरावर मानवी संकटांशीं झगडणारा, मानवी शरीरा-चीं व बुद्धीचीं व्यंगें अंगीं असूनहि महत्कार्य करून दाखविणारा असा एक जबरदस्त कर्तृत्वाचा पण तुमच्या-आमच्यासारखाच एक मनुष्य, या दृष्टीनें त्याच्या चरित्राचा अभ्यास करण्यांतच त्याचा खरा गुणगौरव होईल. तो परमेश्वरी अवतार असें म्हटलें म्हणजे मग त्याच्या चरित्रावरून आपल्याला शिकण्यासारखें काय उरलें ! आणि अनंत विश्वाचा पसारा उभा करण्याचें किंवा त्याचा संहार

करण्याचें सामर्थ्य ज्या ईश्वरी शक्तींत खरें पाहतां आहे त्या शक्तीनें महाराष्ट्राच्या दऱ्याखोऱ्यांत एक चिमुकलें राज्य स्थापिलें असें मानण्यांत त्या शक्तीची स्तुति तरी कोठें राहिली ! शिवाजीला ईश्वरी अवतार मानण्यापेक्षां मानवी प्रकृतीचा, मानवी गुणावगुणांनीं युक्त असा एक पुरुष समजणेंच राष्ट्रीयदृष्टया अत्यंत अगत्याचें व हिताचें आहे.

याबद्दल विशेष कटाक्षानें लिहिण्याचें कारण असें, कीं शिवाजी-सारख्या राष्ट्रीय महात्म्यांची स्मृति ज्या रीतीनें आपण ठेवावयास पाहिजे त्या रीतीनें आपण ठेवलेली दिसत नाहीं. त्यांच्या स्मृती-साठीं आपण मंदिरें उभारीत आहोंत, पण त्यांनीं जो आपला राष्ट्रीय इतिहास घडविला त्याचा चिकित्सक अभ्यास करण्याचें भान आप-ल्याला राहिलेलें नाहीं. आदिलशाहीचा इतिहास लिहिणारा प्रत्येक मुसलमान इतिहासकार विजापुरच्या तख्तावर आलेल्या प्रत्येक राजाचें वर्णन परमेश्वरी अवतार म्हणूनच करतो. पण या अवतारविभूषित तख्ताचेहि शेवटीं तुकडे होऊन आदिलशाही बुडाली याची संगति लावण्याचें तो मनावर घेत नाहीं. आदिलशाही बुडाली याची खरी मीमांसा काय ? तर तो म्हणणार, आदिलशाही नष्ट व्हावी, विजापुर शहर उजाड व्हावें आणि आदिलशाहीचा वंश नामशेष व्हावा असें जगन्नियंत्याच्या मनांत आलें म्हणून तसें झालें. आपणहि या असल्या इतिहासकाराचें अनुकरण करणार कीं काय हा प्रश्न आहे. अनुकरण करणार असलों तर सत्यविपर्यासानें कलंकित झालेला इतिहास वाचण्यापेक्षां त्या इतिहासाचे सारे ग्रंथ नाहींसे केलेले अधिक बरे ! शिवाजीसारख्या थोर पुरुषाचें चरित्र म्हणजे सामान्य मनुष्यालाहि ज्यापासून स्फूर्ति मिळेल असा जिवंत झरा असला पाहिजे, सामान्य व्यवहारांतहि ज्यापासून बोधरत्नें मिळतील अशी खाण असली

पाहिजे. मोंगलांसारख्या अजिंक्य शत्रूवर शिवाजीनें विजय कसा संपादिला, विजापुरकर मागच्या दारीं असल्याइतके जवळ असूनहि त्यांना कौशल्यानें चार हातांच्या अंतरावर त्यानें नेहमीं कसें ठेविलें, अफझुलखानासारख्या बलाढ्य सेनापतीवर त्यानें कशी मात केली, जावळीचे मोरे त्याचे आप्त असूनहि त्यांचा निःपात त्यानें कां केला, आपल्या शिपाईगड्यांची अढळ स्वामिनिष्ठा आणि भक्ति त्यानें कोणच्या सद्गुणांच्या जोरावर संपादन केली, सरंजामी पद्धतीच्या विरुद्ध तो कां होता, मोंगल सत्तेची सेवा ज्यांनीं पिढ्यान्पिढ्या केली त्यांच्यावर हल्ला करणें अगत्याचें आहे असें लहानपणीं आलेल्या कोणत्या कटु अनुभवांवरून त्यानें ठरविलें, शिवाजीची हिंदु-स्वराज्याची कल्पना पुराणमताची होती व आत्मनाशाचीं बीजें त्या स्वराज्यांत जन्मतःच होतीं या प्रो० सरकार यांच्या टीकेंत कितपत सत्य आहे, हिंदुस्थानासारख्या अफाट खंडावर एका एकलकोंड्या व अंतःकुष्टपीडित विवक्षित ज्ञातीचें राज्य स्थापण्याचा शिवाजीचा खटाटोप वाळूच्या कणांचे दोरखंड वळण्याइतकाच हास्यास्पद व अशक्य कोटींतील होता, हें बंगाली कविवर्य रवींद्रनाथ टागोर यांचें विधान कितपत सत्यास धरून आहे, जन्मभर प्रयत्न करून शिवाजीनें स्वराज्याची इमारत उठविली ती त्याच्या पश्चात् थोड्याच अवधींत कां कोसळून पडली, साम्राज्य चालविणें हें बुद्धिबळाच्या डावासारखेंच घरबसल्या करण्याचें काम होय अशा भ्रामक समजुतीनें अखेरअखेरच्या मराठ्यांनीं मुत्सद्दीपणावरच सारा भार दिला हें प्रो० सरकार यांचें विधान मान्य करतां येईल काय इत्यादि अनेक प्रश्न मनन करण्यासारखे आहेत. त्यांचीं खरीं उत्तरें आपल्याला मिळावयाचीं असतील तर शिवाजीचें राज्य म्हणजे ईश्वरी संकल्पानें विश्वसंसाराच्या सागरावर उठलेला व कांहीं काळानें

याच संकल्पामुळें विरून गेलेला एक तरंग होता ही कल्पना सोडून शिवचरित्राकडे चिकित्सक दृष्टीनें पाहावयासच आपण शिकलें पाहिजे. तसें करण्यांतच आपल्या राष्ट्राचें अंतिम कल्याण आहे हें कधींहि विसरतां कामा नये !

अ० बा० लट्टे
(रत्नाकर–जुलै १९२७)

### प्रश्न व सूचना

(१) 'विभूतिपूजा'प्रवृत्तीपासून सुपरिणाम केव्हां होतात व दुष्परिणाम केव्हां होतात तें सांगा.

(२) राष्ट्रीय महात्म्यांची स्मृति आपण कशी ठेवावी याबद्दल प्रो० लट्टे यांचें काय म्हणणें आहे ? तुम्ही त्यांत कांहीं भर घालूं शकाल काय ?

(३) पुढील शब्दांवर टीपा द्याः––श्रेष्ठतम, जबरदस्त, नामशेष, बलाढ्य.

(४) खालील वाक्यांचें स्पष्टीकरण कराः––

[अ] "इतिहासाचें शुद्ध स्वरूप बदलून त्याचें पुराणांत रूपान्तर होतें."

[आ] "हिंदुस्थानासारख्या अफाट खंडावर......अशक्य कोटींतील होता."

(५) [अ] 'शिवाजीचें राज्य......एक तरंग होता' या शेवटच्या वाक्यांत 'होता' याबद्दल 'होतें' घालाल काय !

[आ] 'मात करणें' यासारखे बुद्धिबळाच्या डावावरून घेतलेले २।३ वाक्प्रचार सांगा.

(६) पानें २१५-२१६ यांवर एका वाक्याच्या पोटांत अनेक गौण प्रश्नार्थक वाक्यें आहेत त्यांचे शेवटीं प्रश्नचिन्हें द्यावीं, का स्वल्पविराम द्यावेत, का दुसरें एखादें चिन्ह द्यावें, यासंबंधीं शिक्षकाशीं चर्चा करा.

---

# विभूति व परिस्थिति

[ थोर लोकांच्या आठवणी लिहून ठेवल्यानें भावी पिढीचा कसा फायदा होतो, व थोरांचें थोरपण कशांत आहे हें यथार्थत्वानें समजण्यास या आठवणी कश्या साहाय्यभूत होतात हें माधव श्रीहरि अणे यांनीं "लो० टिळक यांच्या आठवणी व आख्यायिका—भाग २" या पुस्तकाला लिहिलेल्या प्रस्तावनेंत सांगितलेलें आहे. रा. अणे हे स्वतः मोठे विद्वान् व नांवाजलेले वक्ते असून जुन्या संस्कृतीचे अभिमानी आहेत, आणि याचा पुरावा या लहानशा उताऱ्यांतहि दिसून येईल. ]

श्रेष्ठ विभूति व सामान्य व्यक्ति यांतील मोठा भेद हा कीं, सामान्य व्यक्ति ही आपणांस कालवश समजते आणि परिस्थितीस अनुकूल असा कार्यक्रम आंखून गोडीगुलाबीनें आपली इहलोकीची यात्रा आक्रमण्यांतच स्वतःची कृतार्थता आहे असें मानून घेते. परंतु श्रेष्ठ अथवा लोकोत्तर विभूतींचें सर्व कर्तृत्व एका अनिष्ट वाहणाऱ्या परिस्थितीचा नाश करून दुसरी परिस्थिति निर्माण करण्यांतच प्रकट झालेलें दृष्टीस पडतें. म्हणजे श्रेष्ठ विभूति व प्रचलित परिस्थिति यांमधील संबंध शत्रुत्वाचा असतो व श्रेष्ठ विभूती-



मा. श्री. अणे

चा प्रधान व्यवहार म्हणजे तत्कालीन परिस्थितीशीं सुरू केलेला कलह असेंहि म्हणतां येईल. तेव्हां श्रेष्ठ विभूतींचें संपूर्ण चित्र वाचकांसमोर दाखवितांना प्राचीन चित्रकार ज्याप्रमाणें दशावतारांचें चित्र काढीत, त्याचप्रमाणें तें काढणें अवश्य आहे. नारसिंहाचे चित्रांतच त्याचे मांडीवर नखाग्रांनीं ज्याचें उदर विदीर्ण झालें आहे असें हिरण्यकशिपूचें चित्र हेंहि असतेंच. वामनाचे चित्रांत त्याच्या लत्ताप्रहारामुळें बळी हा पाताळांतीळ खोल गर्तेंत जात आहे हें नेहमीं दृष्टीस पडतें. प्रभु रामचंद्राचे चित्रांत रामबाणानें दशकंठ रावणाच्या शिरकमलांचें दाही दिशांस बलिदान केलेलें आहे हें पाहण्यांत येतें. भगवान् श्रीकृष्णांचे प्रतिमेंत कंसाची शेंडी हातांत धरून कराल करवालानें त्याचा भगवान् शिरच्छेद करीत आहेत हा देखावा दाखविण्यांत येतो. किंवा धनुर्धर पार्थाचें चित्र म्हटलें म्हणजे रथारूढ होऊन कौरव-सेनेवर शस्त्रसंपात सुरू आहे हें आलेख्य काढलेलें आढळतें. चित्रकलेंतील या संप्रदायपरंपरेवरून देखील हीच गोष्ट सिद्ध होते, कीं ज्या परिस्थितीचें निर्दालन करण्यांत एखाद्या श्रेष्ठ विभूतीचें कर्तृत्व प्रकट झालें तिचें चित्र डोळ्यांसमोर आल्याशिवाय अवतारी पुरुषाचे चित्राची पूर्तताच होत नाहीं. इतकेंच नव्हे तर तें चित्र प्रेक्षकांस कोणत्याहि प्रकारें उद्बोधक, उत्साहवर्धक आणि कर्तव्यप्रेरक होऊं शकत नाहीं. चरित्रलेखनाचा चित्रकलेशीं सहोदरसंबंध नसला तरी सगोत्र व सपिंडसंबंध खास आहे असें प्रत्येकास कबूल करावें लागेल. उभयतांचा उद्देश एकच. एकाला आपलें कार्य रंगादि सामुग्रीचे साह्यानें करावें लागतें. परंतु चरित्रनायकाचें उत्साह-वर्धक व उद्बोधक शब्दचित्र काढणें हाच चरित्रलेखनाचा मूळ हेतु असतो. त्यासाठीं तत्कालीन परिस्थिति-निदर्शक असें शब्द-

चित्र त्याला पूर्णत्वानें काढून दाखवितां आलें नाहीं व त्यावर विजय मिळविण्याकरितां चरित्रनायकानें योजलेल्या निरनिराळ्या शस्त्रास्त्रप्रहारांचें दिग्दर्शन करतां आलें नाहीं तर तें चित्र इतर दृष्टींनीं कितीहि नयनमनोहर व रम्य दिसत असलें तरी त्यांत सत्प्रेरणा व उद्‌बोधन या दृष्टीनें भयंकर वैगुण्य राहिल्यामुळें गतभर्तृका युवतीप्रमाणें निष्फल व निष्प्रयोजन आहे असेंच म्हणणें प्राप्त होतें. विभूतिचा उत्कर्ष अथवा प्रभाव याचाच अर्थ विशिष्ट परिस्थितीचा अपकर्ष व तिरोभाव. यामुळें तत्कालीन परिस्थितीच्या यथार्थ स्वरूपाचें आणि तन्निरसनार्थ योजण्यांत आलेल्या प्रयत्नाचें साकल्यानें ज्ञान होण्याचीं जितकीं साधनें उपलब्ध होतील तितकीं तीं विभूतींच्या कार्यक्षेत्राची संपूर्णत्वानें कल्पना येण्यास अधिक उपयोगी होतील. विभूतिसमकालीन लोकांस या प्रयत्नांचें कदाचित् विशेष महत्त्व वाटणार नाहीं; परंतु भावी पिढीस त्याचा फार मोठा उपयोग आहे यांत बिलकुल संशय नाहीं.

मा० श्री० अणे

( टिळकांच्या आठवणी–भाग २ )

### प्रश्न व सूचना

( १ ) विभूति ही परिस्थितीमध्यें कशी क्रांति घडवून आणते हें एकदोन ऐतिहासिक उदाहरणें देऊन स्पष्ट करून सांगा.

( २ ) सर्वसामान्य माणसाचे दृष्टीनें सामान्य व्यक्तींचीं चरित्रें अधिक उपयुक्त का असामान्य व्यक्तींचीं, याबद्दल चर्चा करा.

( ३ ) [ अ ] पुढील शब्दांचे अर्थ द्याः—गर्ता, कराल, करवाल, सहोदरसंबंध,

[ आ ] पुढील शब्दांवर व्याकरणदृष्टया टीपा द्याः—लोकोत्तर. दशकंठ, तिरोभाव.

( ४ ) पुढील वाक्यांचा अर्थ विशद करून सांगाः—

१ " म्हणजे श्रेष्ठ विभूति व प्रचलित परिस्थिति यांमधील संबंध शत्रुत्वाचा असतो."

२ " श्रेष्ठ विभूतींचें संपूर्ण चित्र वाचकांसमोर दाखवितांना प्राचीन चित्रकार ज्याप्रमाणें दशावतारांचें चित्र काढीत त्याप्रमाणें तें काढणें अवश्य आहे."

३ " चरित्रलेखनाचा.........सपिंडसंबंध खास आहे."

(५) समकालीन लोकांना विभूति ही 'विभूति' कां वाटत नाहीं ?

---

# अकलेचा आणि देशाभिमानाचा मक्ता एका पक्षासच दिलेला नाहीं

[ हल्लीं आपल्या देशांत अनेक पंथ व अनेक वाद उत्पन्न झाले आहेत. अशा परिस्थितींत सामान्य नागरिकांची इतरांकडे पाहण्याची वृत्ति कोणत्या प्रकारची असावी हें पुढील उताऱ्यांत प्रो० वा० म० जोशी यांनीं सांगितलें असून तें मननीय आहे. सदरहू लेख त्यांच्या 'विचारविलास' नामक लेखसंग्रहांतून घेतला आहे. ]

पूर्वीच्या लेखांत दोनतीन प्रश्न उदाहरणादाखल घेऊन निरनिराळ्या लोकांचीं मतें कशीं भिन्न असतात हें दाखविलें. प्रत्येक मनुष्याचा कल कोणत्या ना कोणत्या तरी एका पक्षाकडे अधिक झुकत असतो, यामुळें एका पक्षाकडे सत्यता, समंजसपणा इत्यादि गुण अधिक आहेत असें मानण्याची प्रवृत्ति असते. ही प्रवृत्ति साहजिक आहे; किंबहुना इष्ट आहे; पण तिचा अतिरेक झाला म्हणजे ती दोषार्ह होते. राजकारणांत काय किंवा दुसऱ्या बाबतींत काय, मतभेद हा प्रकृतिभेदावर व परिस्थितिभेदावर बऱ्याच अंशांनीं अवलंबून असतो.

देशसुधारणेचीं हजारों अंगें आहेत, मनुष्याची शक्ति मात्र मर्यादित आहे. तेव्हां देशहित करूं पाहणारास कोणतें ना कोणतें तरी एक अंग किंवा फार तर दोनतीन अंगें घेऊन त्या बाबतींत देशाची प्रगति कशी होईल, या दिशेनें स्वशक्त्यनुसार खटपट करावी लागते. 'कोणत्या दिशेनें आपण खटपट करावी' याचा ज्याचा त्यानें आपल्याशीं विचार करावा व आपली आवड, आपला कल, आपला स्वभाव, आपली परिस्थिति व आपली शक्ति इत्यादि गोष्टी पाहून त्याप्रमाणें काय तें ठरवावें. मला राजकीय सुधारणा अधिक महत्त्वाची वाटली म्हणून ती दुसऱ्यास तशी वाटेलच असें नाहीं. बरें, दुसऱ्यासहि जरी ती अधिक महत्त्वाची वाटली तरी तेवढ्यामुळें, इतर गोष्टी अनुकूल नसल्यास, त्यानें राजकारणांत पडावें असें होत नाहीं. सारांश, ज्याची ज्याला आवड असेल आणि ज्याची ज्यांत गति असेल, तें त्यानें उत्साहानें व स्वार्थत्यागपूर्वक करावें, म्हणजे कोणत्याहि देवाला केलेला नमस्कार जसा केशवाला जाऊन पोंचतो तसा त्याचा प्रयत्न राष्ट्रकार्याच्या गंगेला जाऊन पोंचेलच पोंचेल.


वा. म. जोशी

सामाजिक सुधारकानें राजकीय सुधारकास पाण्यांत कां पहावें हें समजत नाहीं. एखाद्याला विधवाविवाह आवडत नसला म्हणून तो स्वार्थी व निष्ठुर समजावयाचा काय? एखाद्याला महाराच्या

पंक्तीला बसणें कसेंसेंच वाटत असलें म्हणून त्याची राजकीय कामगिरी कुचकामाची ठरते कीं काय? विधवांचे विवाह लावणें, महारांमांगांच्या पंक्तीला बसणें, सहकारी संस्था स्थापणें, ठराव पास करणाऱ्या राजकीय परिषदा व सभा भरविणें या व अशाच गोष्टी—कांहीं मतलबी अधिकाऱ्यांच्या पसंतीस उतरतात म्हणून तेवढ्याच गोष्टी करणारा तो खरा व 'जबाबदार' देशाभिमानी व बाकीचे सर्व बेजबाबदार देशबुडवे म्हणावयाचे? देशसेवेचा मार्ग एकच आहे काय? हल्लीं रेलवे झाल्यामुळें कांहीं मुलांना जसें वाटतें, कीं पुण्याहून मुंबईला जाण्याचा एकच मार्ग—खडकी, तळेगांव, वडगांव, लोणावळें कर्जत वगैरे स्टेशनें वाटेंत आहेत तो—तसेंच कांहीं सामाजिक सुधारकांना वाटतें, कीं देशसुधारणेचा मार्ग एकच आणि या मार्गांतील वाटेंतलीं स्टेशनें म्हटलीं म्हणजे विधवाविवाह, मिश्रजातीभोजन, सहकारी संस्था, स्त्रीशिक्षण, वर्षांतून तीन दिवस तोंड उघडणारी राष्ट्रीय सभा वगैरे वगैरे. पण पुण्याहून मुंबईला जाण्याला रेलवेचा तेवढाच काय तो एक मार्ग असें नाहीं. ज्याला घाटावरची वनश्री व सृष्टिशोभा पाहावयाची असेल, पायीं चालण्याची मेहनत केल्यानें आपली शक्ति वाढेल असें ज्याला वाटतें, वाटेंतलीं खेडीं दुरून बाहेरून पाहण्यापेक्षां त्यांत प्रत्यक्ष राहून तेथील रहिवाश्यांशीं निकट संबंध यावा अशी ज्याची इच्छा असेल, घाटावरचे कडे, तेथील निसरड्या वाटा, तेथील कांटेकुटे इत्यादिकांना न डगमगतां खडतर मार्गानें चालण्यास जो तयार असेल, त्यानें देखील पायरस्त्यानें न जातां रेलवेनेंच जावें, व रेलवेअधिकारी ज्या डब्यांत बसवतील त्या डब्यांत मुकाट्यानें बसावें, हा आग्रह कां?

राष्ट्राची प्रगति एका तऱ्हेच्या प्रयत्नानेंच होते असें नव्हे. राष्ट्र ही नाव आहे असें कल्पिल्यास कोणाला हातांत वल्हें घ्यावें लागेल

तर कोणाला सुकाणूं धरावें लागेल, तर कोणाला भेगेंतून येणारें पाणी टंबरेलानें बाहेर टाकून द्यावें लागेल, कोणाला बांबू पाण्यांत घालून त्याच्या नेटानें प्रसंगविषेशीं नावेची दिशा फिरवावी लागेल तर कोणाला वल्हें उलटें मारावें लागेल ! राष्ट्रनौका पैलतीरावर न्यावयाची असल्यास या सर्व गोष्टी केलया पाहिजेत; आणि या जर केल्या पाहिजेत, तर ज्या कामाला जो योग्य असेल व ज्याची ज्याला विशेष हौस असेल त्यालाच तें देण्यांत आलें तर त्यांत सर्वांचाच फायदा नाहीं काय ?

आतां कोणी म्हणतील, कीं नावेला जर मोठें भोंक पडलें, तर सुकाणूंवाल्यानें,वल्हें मारणारानें, डोलकाठीवरच्या माणसानें—सर्वांनीं —एकच काम करण्यास आरंभ केला पाहिजे—अर्थात् पाणी काढून टाकून भोंक बुजविण्याच्या कामास लागलें पाहिजे. तद्वतच राष्ट्रावर असा एखादा प्रसंग येतो, कीं त्या वेळीं सर्वांनीं आपले धंदे व आपापलीं आवडीचीं कामें सोडून देऊन त्या प्रसंगास तोंड देण्या-संबंधानें जें बरें-वाईट काम पडेल तें केलें पाहिजे. शहराला शत्रूचा वेढा पडला असतां भास्कराचार्यांनीं आपली गणिताची पाटी बाजूस सारावी, पाणिनीनें 'ख फ छ ठ'मधून आपलें डोकें काढावें, तुकारामानें टाळ सोडावी, तानसेनानें ताना बंद कराव्या आणि सर्वांनींच शहराच्या रक्षणास धांवून जावें, हें तत्त्वतः खरें मानलें तरी वेढा कोणी व कशा प्रकारें घातला, याविषयीं मतभेद होण्याचा संभव आहे. प्रस्तुतच्या उदाहरणांत एक म्हणणार दारिद्य हाच हिंदुस्थानचा शत्रु; दुसरा म्हणणार धर्मग्लानि हाच खरा शत्रु; तिसरा म्हणणार शरीरसंपत्तीचा ऱ्हास; चवथा म्हणणार विधवा-विवाहप्रतिबंध; पांचवा अस्पृश्य जाति; सहावा शिक्षणाचा अभाव; सातवा राजकीय परतंत्रता; आठवा स्वाभिमानाचा व कर्तव्य-

दक्षतेचा अभाव; इत्यादि, इत्यादि, इत्यादि; अशी किती तरी ही यादी लांबवितां येईल !

राष्ट्राला कधीं कधीं शरीराची उपमा देतात. आपणांला साधा ताप आला तरी देखील निरनिराळे डॉक्टर किंवा वैद्य लोक त्याची निरनिराळी चिकित्सा करतात व निरनिराळी औषधयोजना करतात; आणि यदाकदाचित् रोगाची चिकित्सा एकच होऊन एकच औषधयोजना झाली, तरी औषधाच्या प्रमाणांत, अनुपानांत, पथ्यांत, हरएक बाबतींत निरनिराळ्या डॉक्टरांची व वैद्यांची निरनिराळी प्रवृत्ति ! ही झाली एका तापासंबंधानें गोष्ट; आणि एखाद्याला जर एकाच वेळीं दोन तीन रोग असले व त्यांपैकीं कांहीं जुनाट असले, मग तर विचारावयासच नको. आपलें हें आर्यावर्तरूपी राष्ट्रशरीर केवढें अवाढव्य, आणि त्याला कितीक तरी रोग आहेत ! अशा स्थितींत समाजशरीरचिकित्सकांत मतभेद नाहीं झाला तरच नवल ! आपल्या देशाला कोणता रोग नाहीं ? त्याचा एक तरी अवयव निकोप आहे का ? आर्यावर्ताला त्रिदोष नव्हे तर शतदोष झाला आहे असें कधीं कधीं वाटतें. व्यापार नाहीं, पैसे नाहींत, खाण्यापिण्यास पुरेसें नाहीं; देशांतरीं जाण्याची उमेद नाहीं व त्याला अवसर नाहीं; देशांतल्यादेशांत मान नाहीं; मानहानि पुष्कळ वर्षें होत गेल्यामुळें तेजाहि कमी झालेलें; नीतिधैर्य बेताचेंच; धर्माचा उत्साह तात्पुरताच; विद्येची आवड परंपरागत, पण तीहि अवसर नसल्यामुळें मंदावलेली; शास्त्रीय शोध नाहींत; ललितकलांमध्यें प्रगति नाहीं; जुन्या कलाहि बऱ्याच विसरलेल्या; सर्व गोष्टींत परावलंबित्व—उष्टें खाण्याशिवाय गत्यंतर नाहीं; शाळेंतलीं बीजगणिताचीं वगैरे क्रमिक पुस्तकें सुद्धां दुसरीकडून आणावयाचीं; स्त्रिया अशिक्षित आणि कोत्या दृष्टीच्या

म्हणजे अर्धांग विगलित झालेलें; शूद्रादि वर्गांना पायाचा दाखला दिला तर हे पाय कमजोर झालेले, व पोटाशीं आणि डोक्याशीं भांडण्यास तयार झालेले; बाहू लुले; डोकें गांगरून गेलेलें; बरें परिस्थिति अशी कीं, स्वतःला जें औषध घ्यावेंसें वाटतें तें घेण्याची सोय नाहीं, कारण हें अवाढव्य राष्ट्रशरीरच पराधीन. अशा अर्धांगविगलित, अनेकरोगग्रस्त, आंधळ्या, लुल्या, पांगळ्या, थोट्या, दरिद्री, परावलंबी शरीराला कोणतें औषध किती प्रमाणांत द्यावयाचें हें मलाच तेवढें समजतें, दुसऱ्या कोणाला समजत नाहीं; हें म्हणणें किती धाडसाचें आहे आणि तसें म्हणवतें तरी कसें ! यास्तव एखाद्याला विटकुरानें पाय शेकावेसें वाटलें तर त्याला तें खुशाल करूं द्यावें, एखाद्याला डोकें चेंपावेंसें वाटलें तर त्यानें तें करावें; ज्याला जो उपाय सुचेल त्यानें तो करावा. पाहिजे तर आपणाला मदत करण्यास इतरांना बोलवावें; रोग्याची शुश्रूषा करण्याबद्दल चुकार किंवा आळशी लोकांची 'दादा-बाबा' करून विनवणी करावी; आडमुठेपणानें सेवा करणारास प्रसंगीं दाबावें; पण सद्बुद्धीनें सेवा करणाऱ्याची कधींही अवहेलना करूं नये, द्वेष करूं नये; रोग इतके आहेत आणि रोग्याची स्थिति इतकी भयंकर आहे कीं, चिकित्सक कितीही हुशार किंवा दूरदर्शी असला तरी अमुक उपचार आणि अमुक औषधच लागू पडेल, असें म्हणणें समंजस होणार नाहीं; व एखादी म्हातारी आई किंवा भोळसर भाऊ किंवा प्रेमळ मित्र हीं जर हातपाय चेंपीत असलीं किंवा शेकीत असलीं तर 'अहो, तुम्ही वेडे आहांत, हातपाय चेंपून काय होणार आहे, रोग पोटांत, नाहीं तर डोळ्यांत, नाहीं तर डोक्यांत आहे, माझेंच औषध घ्या, आणि मी सांगेन तीच सेवा करा' असे शब्द त्याच्या तोंडून निघूं नयेत ! आणि रोग्याच्या हिताकरितां असलीं

भोळसर सेवा करूं देणें योग्य नसलें तर कठोरपणा त्यानें स्वीकारावा, पण आईचा किंवा बापाचा दांडग्या मुलासंबंधानें जो क्षणिक व अंशतः कृतक कठोरपणा असतो, तो स्वीकारावा; कसायाचा निष्ठुरपणा नसावा व सूड घेण्याची इच्छा तर मुळींच नसावी.

एका फ्रेंच प्रहसनांत असें दाखविलें आहे कीं, नुकत्याच श्रीमंत झालेल्या एका गृहस्थाचे मनांत 'शिष्ट' (Gentleman) बनण्याचें आलें व त्यानें 'शिष्टता' शिकविणाऱ्या गुरूबद्दल वर्तमानपत्रांत जाहिरात दिली. त्याबरोबर दुसरे दिवशीं अनेक लोक त्याचेकडे 'गुरु' म्हणून आले. नृत्य शिकविण्याचा नेहमीं धंदा करणारा त्याचेकडे गेला व म्हणाला कीं, "वागणुकींत केव्हांहि पाऊल न चुकणें— वांकडें पाऊल न पडणें— याच्यांतच शहाणपण व शिष्टता आहे. पाऊल कसें टाकावें हें नृत्यकला शिकल्यानें समजतें; तेव्हां तुमचा गुरु होण्यास मीच योग्य." पण गवई त्याला पुढें बोलूं देईना. तो म्हणाला, "गायनाशिवाय शिष्टता यावयाचीच नाहीं. गायनकलेंत सर्व जीवितरहस्य आहे; कारण मेळ किंवा मिलाफ ( Harmony ) ही गायनाची गुरुकिल्ली आहे, व तीच व्यवहाराची, राजकारणाची, किंबहुना सर्व आयुष्याची गुरुकिल्ली आहे. तेव्हां तुम्ही मजजवळ गायन शिका म्हणजे तुमचें काम होईल." गवयाचें म्हणणें पुरें होतें तोंच एका विद्वान् पण दरिद्री ग्रन्थकारानें त्याला अडविलें व त्या श्रीमंत गृहस्थाकडे वळून म्हटलें, "या सगळ्यांना सोडून मलाच तुम्ही गुरुस्थानीं नेमा; कारण जगांत आपलें म्हणणें काय आहे तें उत्तम रीतीनें सांगतां येणें व लोकांवर आपल्या भाषणानें छाप बसवितां येणें, हें फार उपयुक्त आहे आणि हें ज्ञान शास्त्रग्रन्थांचें परिशीलन केल्यानें येतें. मी तुम्हांला काव्य, अलंकार वगैरे सर्व शिकवितों; तेव्हां मला तुम्ही गुरु नेमा, इतर सर्व लोक कुचकामाचे आहेत."

इतर धंदेवालेहि तेथें आलेच होते. जो तो आपलें घोडें पुढें ढकलूं लागला. तेव्हां त्यांचें एकमेकांमध्यें मोठें भांडण जुंपलें. इतक्यांत एक लष्करी अंमलदार तेथें आला. त्यानेंहि आपल्या कलेची थोरवी गाइली व शिष्टतेचे गुरु होण्यास आपण लायक असें प्रतिपादिलें. लगेच इतर सर्वजणांनीं त्याच्याविरुद्ध आरडाओरड केली; पण त्यानें गवयाला, ग्रंथकाराला, नर्तकाला व इतरांना घालवून दिलें व शिष्टतेचें गुरुत्व बळजबरीनें आपलेकडे घेतलें !

स्मरणावरून वर्णन केलेल्या या प्रहसनप्रसंगाचें तात्पर्य विस्तारानें सांगण्याची विशेष जरूर नाहीं. हिंदुस्थानची सुधारणा करूं पहाणारी अशीच नानाविध मंडळी पुढें येते. विधवाविवाहनिषेधाच्या विरुद्ध बंड करणारी मंडळी म्हणते कीं, राष्ट्राचा उद्धार या चालीचा बींमोड झाल्याशिवाय होणार नाहीं. आपल्या पक्षाला जो येऊन मिळणार नाहीं तो समाजाचा शत्रु असें यांपैकीं कांहींजण समजतात. राजकीय चळवळवाला, शारीरिक सुधारणावाला, उद्योगधंद्देवाला, अस्पृश्योद्धारवाला, इतिहाससंशोधनवाला, पैसाफंडवाला, गोरक्षणवाला इत्यादि मंडळी लोकांच्या परिचयाचीच आहेत.

आपल्या आवडीच्या विषयाचा अभिमान बाळगणें, किंवा त्याविषयीं विशेष उत्साहानें व कळकळीनें काम करणें कांहीं वावगें नाहीं, पण त्याच्याशिवाय दुसरा महत्त्वाचा विषयच नाहीं हा समज चुकीचा आहे. पण हा समज एक वेळ पत्करेल; परंतु आमच्या पक्षाच्या बाहेर खरा देशाभिमान नाहीं, खरी दूरदृष्टि नाहीं. खरा स्वार्थत्याग नाहीं अशा प्रकारचा समज फारच घातुक आहे. हा दोषहि कदाचित् चालूं शकेल, पण 'माझ्या मताचे जे नाहींत ते माझे शत्रु' अशा प्रकारची भावना मात्र सर्वांत वाईट. स्वतःचें मत खरें समजणें साहजिक आहे. प्रत्येक मनुष्याला आपण स्वतः फार

शहाणे असेंच वाटत असतें; पण दुसऱ्याचे मतांत दोष आहे असें समजणें आणि त्या मनुष्याचा द्वेष करणें याच्यांत फार अंतर आहे. दुसरा पक्ष सदोष आहे असें समजणें स्वाभाविक नव्हे तर इष्टहि असेल,–'आहे' असेंहि एक वेळ म्हणण्यास हा लेखक तयार होईल; परंतु 'सदोष' पक्ष 'द्वेषार्ह' असलाच पाहिजे असा कांहीं कोठें न्याय नाहीं. जो तो मनुष्य स्वतःला शहाणाच समजतो; पण शहाणेपणाचा सर्व मक्ता आपल्याकडेच आहे, स्वार्थत्याग आपल्याच घरीं पिकतो, देशाभिमान आपल्या हृदयांतच स्फुरतो, राष्ट्राच्या प्रगतीची मख्खी आपल्यासच ठाऊक आहे, इतर सर्वांनीं माझ्या मार्गानेंच चालावें, नाहीं तर ते स्वतः खड्ड्यांत पडतील व देशाला रसातळाला नेतील, अशा प्रकारची भावना अस्वाभाविक व अनिष्ट आहे. आपलीं मुलें व आपलीं मतें जशीं आपणाला प्रिय असतात तशीं लोकांनाहि आपापलीं मुलें व मतें प्रिय असतात. आपणाला जसा स्वाभिमान व देशाभिमान आहे तसा लोकांनाहि असतो इत्यादि साध्या गोष्टी देखिल महाराष्ट्र विसरला असें कांहींजणांस वाटतें. याच्यांत पाहणाऱ्यांच्या दृष्टीचा दोष आहे का दुसरीच कांहीं तरी याची उपपत्ति आहे ?

वा० म० जोशी
( विचार-विलास )

**प्रश्न व सूचना**

( १ ) आपल्या मताबद्दल व पक्षाबद्दल उत्कट अभिमान बाळगून इतरांचे मताबद्दल किंवा पक्षांबद्दल आदर वाटणें कितपत शक्य आहे ?

( २ ) मनुष्य स्वपक्षीयांनाच नव्हे तर अन्यपक्षीयांनाहि आदरणीय होईल असें वागणें शक्य आहे काय ? असल्यास त्या मनुष्याचे अंगीं कोणते गुण असणें आवश्यक आहे ?

(३) दृष्टान्त, गोष्टी इत्यादींच्या साह्यानें लेखाच्या सुबोधतेंत, सौंदर्यांत व सामर्थ्यांत कशी भर पडते हें या व रा. अणे यांच्या लेखांतील उदाहरणें घेऊन सांगा.

(४) आपलें म्हणणें लोकांना पटेल असें मांडणें ही एक कला आहे. ही कला प्रो० जोशी यांना कितपत साधली आहे ?

(५) [अ] प्रकृतिभेद, मतभेद, परिस्थितिभेद, पक्षभेद यांचें एकेक उदाहरण द्या.

[आ] पिकणें, शुश्रूषा व चिकित्सा यांचे मूळार्थ व रूढार्थ द्या.

[इ] व्याकरणविषयक टीपा द्याः—दोपाई, शक्त्यनुसार, खडतर, निकट, उत्तम.

[ई] पुढील वाक्यांचें स्पष्टीकरण कराः—

(१) "त्याचा प्रयत्न राष्ट्रकार्याचे गंगेला जाऊन पोंचेलच पोंचेल."

(२) "पाणिनीनें 'ख, फ, छ, ठ'मधून आपलें डोकें काढावें."

[उ] पुढील वाक्प्रचारांचा वाक्यांत उपयोग करून दाखवा, व अर्थ सांगाः—

पाण्यांत पाहणें, गति असणें, वांकडें पाऊल पडणें, घोडें ढकलणें.

[ऊ] पुढील शब्दांचे अर्थ द्याः—कुचकामाची, मतलबी, पैलतीर, अनुपान, कृतक, परिशीलन.

---

## 'हक्क' का 'प्रेम'

[प्रो० वा० म० जोशी यांच्या 'रागिणी अथवा काव्यशास्त्रविनोद' या कादंबरींतून पुढील उतारा घेतला आहे. या कादंबरींत वर्णिलेली उत्तरा, रागिणी, शास्त्रीबुवा, नानासाहेब वगैरे सर्व मंडळी सुशिक्षित असून विवाद-प्रिय आहेत. सदरहू मंडळी प्रवासानिमित्त हिमालयाकडे गेली असतां तेथें

एका रम्य ठिकाणीं त्यांचें सामाजिक, धार्मिक, राजकीय वादविवाद चालत असत. पुढील उताऱ्यांत अशा एका वादविवादप्रसंगाचें वर्णन केलें आहे. ]

'स्त्रीशिक्षणा'चा व 'स्त्रियांच्या कर्तव्या'चा एक दिवस सहज प्रश्न निघून त्या दिवशीं उत्तरेला मोठा आवेश चढला, व "आम्ही तत्त्वाकरितां भांडतों, सुखाकारितां नाहीं," असें ती म्हणाली.

"पुरुषांनीं आम्हांला प्रेमानं जरी वागवलं, तरी जोंपर्यंत ते आम्हांला बरोबरीच्या नात्यानं वागवीत नाहींत, तोंपर्यंत आमचं समाधान व्हायचं नाहीं. पुरुषांशीं बरोबरीच्या नात्यानं वागून आम्हांला त्रास झालेला पत्करेल; पण दासीसारखं राहून खायला-प्यायला चमचमीत अन्न व ल्यायला उंचीउंची लुगडीं मिळालीं तरी सुद्धां तीं आम्हांला नकोत! आम्ही हक्कांकरितां भांडतों सुखा-करितां नाहीं!"

"मग तुम्हांला काय पाहिजे?" शास्त्रीबुवा हंसून म्हणाले! "लुगडीं नकोत तर आमच्यासारखीं धोतरें नेसायचीं आहेत?"

"आम्हांला वाटलं तर तसं करण्याचाहि आम्हांला अधिकार आहे!" उत्तरेनें उत्तर दिलें.

"नाहीं म्हणतो कोण पण?" शास्त्रीबुवा म्हणाले. "तुमचे अधिकार कधीं कोणीं काढून घेतले आहेत?"

"'न स्त्री स्वातंत्र्यमर्हति' असं लिहिणाऱ्या मनूनं!" उत्तरेनें उत्तर दिलें.

'मनुस्मृती'चा प्रश्न मुद्दाम सोडून विषय थट्टेवारीच नेण्याच्या उद्देशानें शास्त्रीबुवा म्हणतात, "मग तुझें म्हणणें काय? पुरुषांनीं उद्यांपासून स्वयंपाकाला लागावें, असें का तुझें म्हणणें आहे? बायकांनीं फौजेंत शिरावें आणि त्यांच्या नवऱ्यांनीं घरीं भाकऱ्या भाजाव्यात, अशी का तुझी इच्छा आहे?"

"एखाद्या पुरुषाची योग्यता भाकऱ्या बडवायचीच असली, तर त्यानं तेंच काम करावं! आणि झांशीच्या राणीसारख्या स्त्रीला जर सेनापतीची जागा मिळाली, तर तिनं ती खुशाल स्वीकारावी. प्रत्येक व्यक्तीला स्वतःच्या आवडीचं काम करण्याचा अधिकार आहे!"

"अधिकार आहे; पण साधारण बायकांची योग्यता कोणतें काम करण्याची असते?"

"हें ठरविण्याचा पुरुषांना अधिकार नाहीं! आम्हांला जर वाटलं कीं, आम्ही सैंपाकाच्याच योग्यतेच्या आहोंत, तर आम्ही सैंपाक करूं; पण 'अमुक कर' म्हणून जोरानं बायकोला सांगण्याचा पुरुषांना अधिकार नसावा. हल्लीं पंधरा रुपयांच्या कारकुनाला एखादी सुशिक्षित बायको मिळाली, तरी तिच्या नशिबीं चूल नि तवाच! आणि एखादे दिवशीं सैंपाकाला उशीर झाला, तर या खरडेघाश्यांना तिला मारण्याचाहि अधिकार! असं कां? त्या दोघांना बरोबरीचे हक्क कां नसावेत?"

"असावेत," रागिणी म्हणते, "पण सैंपाक कुणीं करायचा, याबद्दल वादविवाद करून मतं का त्यांनीं घ्यायचीं? आणि दोघांचीं मतं विरुद्ध पडलीं, म्हणजे मग काय करायचं? का त्या दिवशीं कुणींच सैंपाक करायचा नाहीं?"

"हे आक्षेप आजचे नाहींत! दोन पुरुष एके ठिकाणीं राहिले म्हणजे कोण सैंपाक करतो? त्यांच्यापैकीं ज्याला फुरसत असेल, किंवा त्यांपैकीं जो कमी दर्जाचा असेल किंवा सैंपाकांत अधिक कुशल असेल तो सैंपाक करतो; तसंच नवराबायकोमध्यें होईल. बायकोला वाटलं कीं आपण सैंपाकच केलेला बरा तर ती सैंपाक करील; पण तिला 'तूं अमुकच काम कर' असं सांगण्याचा नवऱ्याला हक्क नसावा."

" जाऊं द्या हा विषय ! " नानासाहेब म्हणाले. या वादांत उत्तरेला संतापविण्यापेक्षां दुसरा कांहीं लभ्यांश नाहीं. आज रागिणीची एखादी गोष्ट ऐकूं या. बरेच दिवसांत तिची गोष्ट ऐकली नाहीं आपण."

" माझ्या गोष्टीपेक्षां एखादा निबंधच घ्यावा वाचायला." रागिणी म्हणाली. " माझ्या गोष्टी नेहमींच्याच आहेत. शास्त्रीबुवा एवढे लोकांवर टीका करतात पण स्वतः एकसुद्धां निबंध लिहीत नाहींत किंवा गोष्टहि लिहीत नाहींत."

" खरेंच शास्त्रीबुवा, तुम्ही एखादा निबंध लिहा ! " नानासाहेब म्हणाले.

" तुम्ही लोकांवर नेहमीं टीका करतां; तुमच्यावर चांगली खरमरीत टीका करण्याची माझी इच्छा आहे ! "

" आम्ही निबंध लिहायचे नाहीं नि बायकी गोष्टी तर मुळींच लिहायचे नाहीं ! पाहिजे असेल तर काल मला स्वप्न पडलेलें तुम्हांला सांगतों."

" हरकत नाहीं ! तुमचें स्वप्न येऊं द्या." आनंदराव म्हणाले. " पण बायकांच्या व पुरुषांच्या हक्काचा प्रश्न नको ! "

आनंदरावांचें हें बोलणें उत्तरेला किती लागले असेल याची वाचकांनीं कल्पना करावी.

" म्हाताऱ्या बायकांसारखीं स्वप्नें कसलीं सांगतां शास्त्रीबुवा?" भाऊसाहेब म्हणाले. " त्यापेक्षां आनंदरावांचा एखादा निबंध ऐकूं या."

" ऐका तर खरें माझें स्वप्न ! तुम्हांला जरी तें आवडलें नाहीं तरी उत्तरेला फार आवडेल. तिचा आवडता विषय आला आहे माझ्या स्वप्नांत."

" काल रात्रीं मी याच विषयासंबंधानें विचार करीत पडलों असतां मला एक बालमित्र भेटला. त्यानें मला अंथरुणावरून उठविलें व माझ्या कानांत म्हटलें, " शास्त्रीबुवा, चला. तुम्हांला अधिकारनगरींत घेऊन जातों. तेथील लोक मोठे बुद्धिवान् स्वाभिमानी व कायदेपंडित आहेत. त्यांच्यामध्यें कायद्याचें ज्ञान इतकें वाढलें आहे कीं, त्यांच्यांतल्या आठ वर्षांच्या मुलाला जें कायद्याचें ज्ञान आहे, तें तुमच्या येथील न्यायाधीशालासुद्धां नसेल ! " असें म्हणून तो माझा हात धरून मला घेऊन जाऊं लागला. " मला झोंप येत आहे, मी येत नाहीं " असें मीं म्हटलें तरी तो ऐकेना. त्यानें मला लांडग्यांच्या गाडींत बसविलें. या गाडीला साप हे दोऱ्यांसारखे बांधलेले होते. गाडींत बसल्यावर कांहीं वेळानें माझ्या बालमित्रानें गाडी थांबविण्याला सांगितलें व तो आणि मी एका पानवाल्याच्या दुकानांत गेलों.

" पैशाला पानें किती ? " असें विचारल्यावर 'दहा' म्हणून त्यानें सांगितलें. मी एक पैशाची तंबाखू व दोन पैशांचीं पानें मागितल्यावर त्यानें वीस घाणेरडीं पानें माझ्या हातांत ठेवलीं, व तंबाखूची भुकटी माझ्या मित्राच्या हातांत ठेवली.

" हीं घाणेरडीं पानें नकोत ! " मीं म्हटलें.

" तुम्हांला माझ्या दुकानांत येऊन माझ्या पानांना 'घाणेरडीं' म्हणण्याचा अधिकार नाहीं ! " पानवाला म्हणाला.

" अधिकार आहे ! " माझा मित्र संतापानें म्हणाला. " हीं पानें परत घेतलीं पाहिजेत ! "

" पानांची किंमत ठरवितांना तुम्हीं मला माझ्या दुकानांतील पानांचा भाव विचारलांत मीं तो सांगितला, आणि त्याप्रमाणें पैसे

घेऊन तुम्हांला कायद्याप्रमाणें वीस पानें दिलीं आहेत. आतां पैसे परत मागण्याचा तुम्हांला 'अधिकार' नाहीं ! "

" झालें ! माझ्या मित्राचें डोकें उठलें. 'जाऊं दे, या मूर्ख दुकानदाराशीं काय हुजत घालायची आहे' असें मीं मित्राला म्हटलें, पण तो ऐकेना.

" मी दोन पैशांकरितां भांडत नाहीं, तर तत्त्वाकरितां भांडत आहें." तो म्हणाला, " हा गिऱ्हाइकाच्या व दुकानदाराच्या अधिकाराचा प्रश्न आहे. मी ही गोष्ट फौजदारापुढें नेणारच."

असें म्हणून माझा मित्र त्या दुकानदाराला फौजदाराकडे चलण्यास सांगूं लागला. " तुम्हांला फौजदाराकडे नेण्याचा अधिकार नाहीं." असें दुकानदारानें उत्तर दिलें. भांडण अखेर मारामारीवर जाण्याची पाळी आली. इतक्यांत तेथें एक पोलीस आला व त्यानें आम्हां तिघांनाहि फौजदाराकडे नेलें.

फौजदारांनीं चौकशी केल्यावर 'खटला उद्यां ऐकूं' असें त्यांनीं ठरविलें, व आम्हांला ते म्हणाले, " तुम्हांला चौकींत अडकवून ठेवणें किंवा न ठेवणें माझ्या अधिकारांतलें आहे; पण तुम्ही इभ्रतदार लोक दिसतां, तेव्हां तुमचा जामीन घेतल्याशिवाय तुम्हांला मी सोडून देतों."

हे शब्द ऐकून एकदांचा संकटांतून सुटलों असें वाटून मला आनंद झाला; पण माझा कायदेपंडित, अधिकारवादी बालमित्र म्हणाला, " आम्हांला तुमची दया नको फौजदारसाहेब ! तुम्हांला या आरोपावर चोवीस तासांच्यावर आम्हांला अटकेंत ठेवण्याचा मुळीं अधिकारच नाहीं ! "

" असें आहे का ? " फौजदारसाहेब रागानें म्हणाले. " मग पाहूंच या अधिकार आहे का नाहीं तो ! " असें म्हणून त्यांनीं

जवळच्या पोलिसांना खूण केली. तत्क्षणीं आमच्या हातांत बेड्या पडल्या व आम्हांला एका कोपऱ्यांत बसविण्यांत आलें.

" हें काय केलेंस ? " मीं आपल्या मित्राला म्हटलें.

" तुम्हांला समजत नाहीं, शास्त्रीबुवा ! " तो म्हणाला. " मी हक्काकरितां व तत्त्वाकरितां भांडत आहें. आमच्या या गांवांत आम्ही पैशाकडे, किंवा सोयीकडे, किंवा प्रेमाकडे, किंवा कशाकडे पहात नाहीं ! तर एकमेकांचे कायदेशीर अधिकार कोणते आहेत,याविषयीं आम्ही फार जपून असतों ! "

यावर मी कांहींच बोललों नाहीं. माझ्या मित्राच्या तत्त्वाभिमानाचें कौतुक करावें, का त्याचा निषेध करावा, हेंच मला समजेना; याविषयीं विचार करीत तेथें बसलों असतां चौकीच्या समोरच्या घराकडे माझें लक्ष्य गेलें. तेथें नवराबायकोचें कडाक्याचें भांडण चाललें होतें.

" मी पाण्याचा तांब्या आणायची नाहीं ! तुम्हांला मला काम सांगण्याचा अधिकार नाहीं ! " बायको म्हणत होती.

" घरगुती काम तूं करायचें व मीं पैसे मिळवायचे, असा मॅजिस्ट्रेटपुढें ठराव झाला आहे." नवरा म्हणाला, " व घरगुती काम सांगण्याचा मला कायदेशीर हक्क आहे " असें तो प्रतिपादूं लागला.

" बायको म्हणे " मी तांब्या आणीन, पण आणलाच पाहिजे अशी तुम्हीं आज्ञा केलीत, तर मुळींच आणायची नाहीं ! "

नवरा म्हणे " तुझी दया नि कृपा नको आहे मला ! तुला हें काम केलेंच पाहिजे ! "

भांडण हमरीतुमरीवर आणि अखेर झोंबाझोंबीवर गेलें. नवऱ्यानें बायकोचा बुचडा धरला व बायकोनें नवऱ्याची शेंडी धरली. गोष्ट

या थराला आलेली पाहून शेजारचा एक गृहस्थ भांडण सोडविण्याकरितां त्या घरांत गेला. त्याबरोबर तीं दोघेंजणें एकमेकांना सोडून त्या शेजाऱ्यावर कुत्र्याप्रमाणें तुटून पडलीं !

"तुम्हांला या घरांत येण्याचा 'अधिकार' काय?" तीं एकसारखीं भुंकूं लागलीं. 'परवानगीशिवाय आंत येऊं नये' अशी पाटी लावलेली दिसत नाहीं का तुम्हांला !"

"शेजारच्या घरांत प्राणघातक मारामारी, दंगा किंवा खून होत असल्यास परवानगीशिवाय घरांत जाण्याचा कोणत्याहि नागरिकाला 'अधिकार' आहे !" तो शेजारी म्हणाला.

"अधिकार आहे तर चला समोरच्या चौकींत," असें म्हणून त्या गृहस्थाचा त्या बायकोनें एक हात पकडला; व नवऱ्यानें दुसरा हात पकडून त्याला आमच्या चौकींत खेंचीत आणलें."

स्वप्न सांगतां सांगतां शास्त्रीबुवांनीं मुद्दाम दोनतीनदां "हं हं हं" असें खाकरून उत्तरेकडे व नंतर मंडळीकडे अर्थपूर्ण दृष्टीनें पाहिलें. उत्तरेच्या पायाची आग मस्तकाला गेली होती ! हें सर्व स्वप्न अगदीं बनावट आहे, आणि शास्त्रीबुवा त्याच्या द्वारें आपल्यावर खरमरीत टीका करून आपणाला हास्यास्पद करून टाकीत आहेत हें तिच्या ध्यानांत आलें; पण तिनें आपला संताप आवरून धरला व स्वप्न संपल्यावर शास्त्रीबुवांचा समाचार घेऊं असें ठरवून ती चूप राहिली. स्वप्न सांगतांना सगळी मंडळी तिच्याकडे पाहात असल्यामुळें ती अगदीं क्षुब्ध झाली होती; आणि आपला दाबून धरलेला अंतःक्षोभ पाहून सर्व मंडळीला आपल्यावरील या टीकेनें गुदगुल्या होत आहेत या भावनेनें, तसेंच रागानें व लज्जेनें तिचें तोंड अर्धवट चिडल्यासारखें, अर्धवट रडकुंडीला आल्यासारखें झालें होतें.

दोनतीनदां खाकरून मध्यें पाणी पिऊन शास्त्रीबुवांनीं स्वप्न-कथासूत्राचा धागा पुन: हातांत घेतला.

" त्या शेजाऱ्याला त्या नवराबायकोंनीं फौजदारापुढें नेल्यावर खटल्याची अनौपचारिक सुनावणी सुरू झाली; ती सुनावणी संपते न संपते तोंच एक मनुष्य आपल्या मुलाला एका हातांत व त्याच्या एका तरुण मास्तराला दुसऱ्या हातांत धरून फौजदाराकडे आला.

" फौजदारसाहेब, मला मास्तरांनीं हातावर पांच छड्या मारल्या, मुलगा म्हणाला. " असा छड्या मारण्याचा तुम्हांला 'अधिकार' नाहीं असें मीं म्हटल्याबरोबर त्यांनीं माझ्या पायावर आणखी दोन छड्या लगावल्या फौजदारसाहेब ! यांना हातावर छड्या मारण्याचा 'अधिकार' आहे काय ?"

" अलबत आहे ! " मास्तर म्हणाले. " मीं यांत आपल्या अधिकाराचें मुळींच अतिक्रमण केलेलें नाहीं ! "

" तुम्हाला मारायचें असल्यास ढुंगणावर मारावें असें कायद्यांत कलम आहे ! " मुलगा म्हणाला.

" पण मुलगा मारामारी करूं लागला किंवा गुरूचें मुळींच ऐकेनासा झाला, तर पाहिजे तेथें छड्या मारण्याचा अपवादात्मक अधिकार आम्हांला दिलेला आहे. शिवाय मीं मारलें तें तुझ्या हिताकरितांच मारलें."

" मास्तर ! मी तुमच्या माराला भीत नाहीं; किंवा तुम्ही माझें अहित व्हावें म्हणून मला मारलेंत असेंहि म्हणत नाहीं. तर मी तत्त्वाकरितां भांडत आहें ! गुरुशिष्याचे अधिकार निश्चित असावेत. आम्हांला गुरूची दयामाया नको. तर आमचे जे हक्क असतील, त्याप्रमाणें त्यांनीं आम्हांला वागवावें."

" माझ्या मुलाचें म्हणणें अगदीं चुकीचें आहे." मुलाचा बाप

म्हणाला. "माझ्याशीं तो असें म्हणाला नाहीं. हा अगदींच मूर्ख दिसतो आहे!"

"बाबा, कायदेशीर रितीनें तुम्ही माझे पालक असाल, पण मूर्खबीर्ख म्हणण्याचा तुम्हांला अधिकार नाहीं! तुम्ही शिव्या देऊं नका, नाहीं तर मला पालक बदलण्याबद्दल कोर्टांत अर्ज करावा लागेल!" हें ऐकून त्या बापानें "या पोराला असें बोलण्याचा अधिकार आहे का?" असें फौजदाराला विचारलें.

फौजदार म्हणाले, "तुम्हांला एवढें जर समजत नाहीं, तर तुम्हांला या मास्तरांना इकडे आणण्याचा आणि माझा वेळ घेण्याचा काय अधिकार? तुम्हांला सगळ्यांनाच अटकेंत ठेवण्याचा मला कायद्यानें अधिकार दिलेला आहे."

"प्रत्येक नागरिकाला तक्रार करण्याचा अधिकार आहे." "अधिकार आहे." सर्वजण ओरडले, व त्यांच्या 'अधिकार' 'अधिकार' शब्दांचा इतका गोंगाट झाला कीं, मी एकदम जागा झालों आणि डोळे उघडून पाहतों, तों अधिकारनगरी हें सगळें स्वप्न आहे, माझ्याजवळ माझा बालमित्र नसून तुम्ही सर्व मंडळी बसलेली आहांत, आणि उत्तरा स्त्रीपुरुषांच्या समसमान अधिकाराबद्दल वाद करीत आहे असें माझ्या दृष्टीस पडलें. या स्वप्नाचा अर्थ काय हें एखाद्या ज्योतिष्याला विचारलें पाहिजे." *असें म्हणून शास्त्रीबुवांनीं आपली स्वप्नकथा संपविली.*

"झालं एकदां मनाचं समाधान?" उत्तरा रागानें म्हणाली. "स्वप्नांतला एखादा भाग विसरलां असलांत तर सांगून टाका! नाहीं तर मीं टीका केली म्हणजे मग पुन: स्वप्नाची आठवण होईल; आणि—"

“ पुनः आठवण झाली तर पुनः स्वप्न सांगण्याचा त्यांना अधिकार आहे.” आनंदराव हंसत म्हणाले.

“ अधिकार शब्द उच्चारण्याला आतां कोणालाच अधिकार नाहीं ! ” रागिणी विनोदानें म्हणाली.

“ कोणाला नसला तरी मला आहे ! ” उत्तरा तिरसटपणानें म्हणाली. “ मला माझ्या अधिकाराची लाज वाटत नाहीं ! ”

उत्तरा वादामध्यें चिरडीला आली आहे असें पाहून नानासाहेबांनीं तिची बाजू घेतली व म्हणाले, “ उत्तरेच्या शब्दांची किती जरी तुम्हीं टर उडविली, तरी तिचेंच म्हणणें खरें आहे. नवराबायकोचें नातें बरोबरीचें असावें हा तिच्या म्हणण्याचा अर्थ आहे. आणि तिचें हें म्हणणें बरोबर आहे.

“ अगदीं बरोबर आहे.” रागिणी म्हणाली; पण अधिकार कोणाचा अधिक आहे याचा नवराबायकोनं विचार करण्यापेक्षा प्रेम कोणाचं अधिक आहे याचा विचार केला तर वाईट का ? *आपलं जीवित आपल्या नवऱ्याकरितां नि मुलांबाळांकरितां* असं ज्या बायकोला वाटतं तिला बरोबरीचे अधिकार काय करायचे आहेत ? आणि आपली बायको ज्याला सहधर्मचारिणी, अर्धांगी वाटते तो बायकोवर कसला अधिकार गाजवील ! आणि गाजवलान् म्हणून काय वाईट ? ”

“ कसें बोलली रागिणी ! ” शास्त्रीबुवा म्हणाले. “ हिंदुधर्माचें खरें रहस्य तूं आतां सांगितलेंस ! ”

वा० म० जोशी
( रागिणी )

## प्रश्न व सूचना

(१) शास्त्रीबुवांनीं सांगितलेल्या स्वप्नांत गर्भित असलेला युक्तिवाद सरळ भाषेंत सांगा.

(२) शास्त्रीबुवांना उत्तरेच्या विचारसरणींत कोणते दोष दिसले व ते त्यांनीं कोणत्या पद्धतीनें दाखविले?

(३) रागिणीनें आपल्या उत्तरांत व्यक्तीव्यक्तींतल्या अधिकारांची एक-वाक्यता करण्याचा प्रयत्न कसा केला आहे? तो तुम्हांला कितपत मान्य आहे?

(४) विनोद उत्पन्न करण्याचीं कोल्हटकर यांचीं साधनें व जोशी यांचीं साधनें यांतील साम्य व भेद त्यांच्या त्यांच्या उताऱ्यांच्या आधारें स्पष्ट करा.

(५) अर्थ सांगाः—लभ्यांश, हमरीतुमरीवर येणें, डोकें उठणें, हुजत घालणें, थराला येणें.



# विभाग ४



## महानुभावीय मराठी वाङ्मय

[ यवतमाळचे यशवंत खुशाल देशपांडे यांनीं 'महानुभावीय मराठी वाङ्मय' या नांवाचें जें पुस्तक लिहिलें आहे त्यांतून खालील उतारा घेतला आहे. मराठी गद्याला आरंभ महानुभावीय ग्रंथकारांनींच केला व पद्यग्रंथांत देखील त्यांचे ग्रंथ आद्यापैकींच गणले जातात. यांचें वाङ्मय सांकेतिक लिपीमध्यें लिहिलेलें असल्यामुळें तें असून नसल्यासारखेंच होतें. परंतु १९१५ चे सुमारास ही सांकेतिक लिपी वाचण्याचीं साधनें उपलब्ध होऊन मराठी वाङ्मयमंदिराचें एक नवीन व महत्त्वाचें दालन उघडलें गेलें. सामाजिक व धार्मिक इतिहासाचे दृष्टीनें देखील महानुभावीयांचें फार महत्त्व आहे; अर्थात् महानुभावीयांची माहिती असणें जरूरीचें आहे; पुढील उताऱ्यांत महानुभावीयांसंबंधींची अगदीं त्रोटक माहिती दिलेली आहे. जास्त माहितीकरितां रा० देशपांडे यांचें मूळ पुस्तकच वाचणें इष्ट आहे. ]

सन १९१५ चे सुमारास श्री० विनायकरावजी भावे यांनीं आपला 'महाराष्ट्र सारस्वत' हा ग्रंथ प्रसिद्ध केला. यामध्यें महंत श्रीदत्तलक्षराज यांच्या कृपेनें महानुभावांच्या गुप्तलिपींपैकीं महत्त्वाच्या ज्या दोन लिपी सगळ लिपी व सुंदरा लिपी यांच्या किल्ल्या प्रसिद्ध केल्या व लीलाचरित्र वगैरे २।३ ग्रंथांचा उल्लेख करून त्यांतील तत्कालीन मराठीचे त्या ग्रंथांतून २।३ उतारेहि प्रसिद्ध केले होते.

तत्पूर्वीं एका गृहस्थाच्या येथील जुन्या कागदपत्रांच्या गठ्ठ्यां-मध्यें मला एक चमत्कारिक लिपींत लिहिलेली पोथी मिळाली. ती एक कुतूहल म्हणून आपल्या संग्रहास ठेविली होती. त्यानंतर ४-५

वर्षांनीं श्री० भावे यांचें 'महाराष्ट्र सारस्वत' हें पुस्तक वाचण्यांत आलें तेव्हां अचानकपणें त्या पुस्तकांत दिलेली सगळ लिपीची किल्ली मजजवळच्या पोथीस लावतांच तींतील अर्थज्ञान उघड झालें. परिश्रमपूर्वक त्या ग्रंथाचें वाचन केल्यावर हा ग्रंथ म्हणजे महानुभावांचा धर्मविषयक आद्यग्रंथ होय असें कळून आलें. कांहीं विद्वान् महानुभावांना ही पोथी दाखविली असतां आपल्या पंथाच्या पद्धतीस अनुसरून त्यासंबंधानें माहिती देण्याचें त्यांनीं नाकारलें. तथापि मीं जेव्हां त्यांना ही पोथी वाचून दाखविली तेव्हां त्यांनीं मग त्या पोथीसंबंधानें साग्र हकीकत सांगितली. त्या पोथीस परासिद्धान्त सूत्रपाठ असें म्हणतात; व तींत महानुभाव पंथाचा आद्यप्रवर्तक अवतारी पुरुष सर्वज्ञ श्रीचक्रधर स्वामी याच्या मुखांतून निघालेलीं सूत्रें त्यांच्या शिष्यांनीं एकत्र ग्रथित केलीं आहेत व त्या सूत्रांवर दृष्टान्त आणि भाष्य, महाभाष्य इत्यादि विवरणात्मक व विस्तृत टीकाप्रकारहि त्यानंतर झालेले आहेत.


य. खु. देशपांडे

सर्वज्ञ श्रीचक्रधर स्वामी आणि त्यांनीं स्थापन केलेल्या महानुभाव पंथाची त्रोटक माहिती श्री० भावे यांनीं आपल्या मुंबईच्या निबंधांत दिली आहे. त्यावरून व महानुभावांच्या लीलाचरित्र आणि इतर ग्रंथप्रामाण्यावरून श्रीमच्चक्रधर स्वामी हे पूर्वाश्रमींचे हरिपाळदेव होत. पूर्वी गुजराथेंत त्रिमल्लदेव नांवाचा राजा होता. त्यानें संतानहीनत्वामुळें आपलें राज्य अंतसमयीं विशाळदेव

नांवाचा सामवेदी नागर ब्राह्मण त्याचा प्रधान होता त्यास दिलें. त्या विशाळदेवास त्याच्या माल्हणदेवी नांवाच्या पत्नीपासून दत्त-प्रसादें पुत्र झाला तोच हरिपाळदेव होय व हा हरिपाळदेव मृत झाला असतां शके १०७५ मध्यें त्याचे देहांत बदरीकाश्रमाहून नारायण अवतारांनीं प्रवेश केला व तेथूनच अवतारकृत्यास आरंभ झाला. हरिपाळदेवानें शके ११०७ पर्यंत संसारसुख, राजकारण इत्यादि करून मग तीर्थाटनास सुरुवात केली व त्या सालीं वऱ्हाडांत रिद्धपूर येथें त्यास ईश्वरअवतारी गोविंद प्रभु नांवाच्या काण्वशाखी साधुपुरुषाचें दर्शन झालें व त्यांचा त्यांनीं उपदेश घेतला. श्रीगोविंद प्रभूंनींच हरिपाळदेवाचें श्रीचक्रधर हें नांव ठेविलें. श्री-चक्रधरांनीं आपल्या वयाच्या ११० वे वर्षापर्यंत संसारपथ आक्रमून संन्यासदीक्षा शके ११८५ मध्यें घेतली व तेव्हांपासून महानु-भावांचा पंथ स्थापून सरासरीं ८ वर्षें पंथप्रसाराचें कार्य केलें व शेवटीं शके ११९३ चे सुमारास त्यांनीं बदरीकाश्रमीं प्रयाण केलें.

श्रीचक्रधरकालीं चातुर्वर्ण्यव्यवस्थेंत जातिभेदामुळें आपसांत बराच गैरसमज व यादवी माजल्यामुळें समाज बराच विस्कळित झाला होता. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे श्रीच्चमक्रधरांनंतर पाव शतकांतच ज्या कारणाकरितां श्रीज्ञानेश्वरांना भागवत धर्माचा प्रसार करावा लागला त्याच कारणाकरितां श्रीमच्चक्रधराला महानु-भाव पंथ स्थापावा लागला. सनातन धर्मास आधारभूत धरून त्यांनींहि श्रीमद्भगवद्गीता हाच मुख्य धर्मग्रंथ मानिला व श्री-दत्तात्रेय व श्रीकृष्ण या देवता उपासनेस घेतल्या; व जनतेस निवृत्तिमार्गास लावावयाकरितां अहिंसातत्त्वाचा अवलंब केला व संन्यासदीक्षा, ब्रह्मचर्य व भिक्षोपजीविका इत्यादि साधनांनीं सर्व वर्णांना मोक्षमार्गास लावण्याचा उपक्रम केला.

श्रीमच्चक्रधरांनीं आपल्या आयुष्यांतील शेवटचीं ९-१० वर्षेंच काय तीं पंथप्रसाराच्या कार्यांत घातलीं. त्या अवधींत त्यांचें कार्यक्षेत्र जें महाराष्ट्र व विशेषतः विदर्भ, तेथें सरासरी ५०० शिष्य झाले. त्यांत ( १ ) नागदेवाचार्य, ( २ ) महिंद्र, ( ३ ) जनार्दन, ( ४ ) रामदेव, ( ५ ) विप्र नामदेव व ( ६ ) भांडारेकर दामोदर हे प्रमुख होत. त्यांत महदंबा नांवाची श्रीमच्चक्रधरांची एक शिष्यीणहि प्रमुख होती. ही सर्व मंडळी महाराष्ट्रीय असल्यामुळें पंथप्रसाराचें कार्य महाराष्ट्रांतच व त्यांतूनहि विशेषतः मराठींतूनच झालें. मुख्यतः पंथप्रसाराचें कार्य श्रीमच्चक्रधरांचा पट्टशिष्य नागदेवाचार्य यांनींच केलें. नागदेवाचार्यांचेहि पुष्कळ शिष्य होते. त्यांत १३ शिष्य प्रमुख असून कमळांबा नांवाची एक विदुषीहि होती. या तेरा शिष्यांच्या तेरा निरनिराळ्या परंपरा झाल्या असून त्यांना आम्नाय असें म्हणतात. बहुतेक आम्नाय हल्लीं परंपरागत आले असून त्यांचा श्रीमच्चक्रधरांपासून आजपर्यंतचा इतिहास लिहिणें श्रमसाध्य झालें आहे.

पंथाच्या स्थापनेपासून सुमारें ३०० वर्षेपर्यंत सरासरी हा पंथ विशेषतः ब्राह्मणवर्गांत पसरला होता; व त्यानंतर इतर वर्णांचाहि समावेश संन्यासीवर्गांत होऊं लागला. हल्लीं या पंथाचा प्रसार मद्यमांसत्याग इत्यादि उपदेशमात्रेंकरून अस्पृश्य वर्गांतहि झालेला आहे. मात्र त्या वर्गाची अस्पृश्यता त्यांनीं नाहींशी केली नाहीं. हा पंथ स्थापन झाल्यापासून आजपर्यंत त्यांत अनेक विद्वान् गृहस्थ होऊन गेले व अकराव्या शतकापासून आजपर्यंत अनेक ग्रंथ या पंथांतील विद्वानांनीं, विदुषींनीं मराठी भाषेंत गद्यांत व पद्यांत निर्माण केले आहेत. याशिवाय हिंदी व संस्कृत भाषेंतहि त्यांनीं बरीच ग्रंथरचना केली. महानुभाव पंथ स्थापन होण्यापूर्वीचा एकहि मराठी ग्रंथ उपलब्ध नसल्यामुळें त्या पंथीयांनींच मराठींत ग्रंथ-

रचना करावयास सुरुवात केली असें म्हणावयास आज तरी कांहीं प्रत्यवाय नाहीं. श्रीमत् ज्ञानेश्वरांनींच मराठींत प्रथम ग्रंथरचना केली हें मत आतां तत्पूर्वींचे महानुभावपंथी अनेक मराठी गद्य व पद्य ग्रंथ उपलब्ध झाल्यामुळें बदलणें भाग आहे.

महानुभावांचा पंथ श्रीमद्भगवद्गीतेंतील अहिंसातत्त्वावर स्थापिलेला असून ते भगवद्गीता व श्रीमच्चक्रधरस्वामींचे मुखांतून निघालेले सूत्ररूप पाठ हे आद्य धर्मग्रंथ मानितात. तसेंच श्रीदत्तात्रेय आणि श्रीकृष्ण हे अवतार मानीत असल्यामुळें श्रीकृष्णलीलावर्णनपर श्रीमद्भागवत दशम आणि एकादश स्कंदहि पूज्य मानितात. वरील कारणांमुळें चरित्रपर, स्थळवर्णनपर, टीकारूप व तदनुषंगिक विषयांवर अनेक ग्रंथ निर्माण झाले आहेत. ग्रंथ निर्माण झाल्यामुळें पूर्वकालीन ग्रंथाध्ययनासाठीं शब्दकोश व व्याकरणेंहि तयार करावीं लागलीं आहेत. श्री. भावे आपल्या निबंधांत म्हणतात त्याप्रमाणें ६००० ग्रंथ महानुभावांनीं तयार केले आहेत असें म्हणणें अतिशयोक्तिरूप आहे असें मानलें तरी हा ग्रंथसमूह बराच मोठा आहे ही गोष्ट निर्विवाद आहे.

य० खु० देशपांडे

( महानुभावीय मराठी वाङ्मय )

**प्रश्न व सूचना**

( १ ) महानुभाव चक्रधरांसंबंधीं तुम्हांस काय माहिती आहे ?

( २ ) [ अ ] मानभाव हा शब्द कसा आला ? त्याला वाईट अर्थ कां प्राप्त झाला ?

[ आ ] 'तदनुषंगानें', 'विस्खलित', 'भिक्षोपजीविका', 'आम्नाय' यांचा अर्थ काय ?

[ इ ] 'यादवी' शब्दाचा रूढार्थ काय ? तो त्याला कसा प्राप्त झाला ?

(३) पुढील वाक्यांत भाषेचे दृष्टीनें कांहीं ढिलेपणा दिसत असल्यास दाखवाः—

[अ] चक्रधरस्वामी व महानुभाव पंथाची माहिती इ०

[आ] महानुभाव पंथ स्थापन......त्या पंथीयांनींच इ० इ०

[इ] ही सर्व मंडळी.........मराठींतूनच झालें.

(४) सांकेतिक लिप्या कशा असतात व त्या लावण्याच्या 'किल्लया' म्हणजे काय हे तुम्हांस रा० भावे यांच्या 'महाराष्ट्र सारस्वता'च्या पहिल्या भागांत ( पानें ७८–७९ ) पहावयास सांपडेल.

---

# कवितेचें कर्तृत्व !

[ सदरहू उतारा 'कवींचा कारखाना' या विनोदी लेखांतून घेतला आहे. रा० गडकरी यांनीं या लेखांत कवि, काव्य, वाचक व टीकाकार यांत आढळून येणारे दोष आपल्या विशिष्ट विनोदी पद्धतीनें दाखविले असून त्यांत कोणत्याहि विशिष्ट काव्याचा किंवा व्यक्तीचा उल्लेख केलेला नसल्यामुळें दोषाविष्करणाचें कार्य तर झालें आहेच, परंतु दोषाविष्करणाबरोबर येणारा बोंचकपणा मात्र आलेला नाहीं. गडकऱ्यांचा कल्पनाविलास व त्यांचें भाषाप्रभुत्व हींहि पाहण्यासारखीं आहेत. ]

कवितेच्या उपकारांचें साकल्यानें वर्णन करावयाचें असल्यास आजपासून काळाच्या शेवटापर्यंत सर्व भावी काव्यें या एकाच विषयावर करावीं लागतील. कवितेनें जगावर उपकारांचें ब्रह्माण्डच्या ब्रह्माण्ड करून ठेविलें आहे. गद्याच्या गबाळ अमर्यादपणाला कवितेनें आटोपशीर आकारांत आणून मनुष्यजातीच्या स्थळकाळाची विलक्षण बचत केली आहे. एका समग्र गद्य ग्रंथाच्या मोकाट मैदानांत एखाद्याला आपल्या एका घटकेचा मूर्खपणासुद्धां नीटसा फिरवून दाखवितां येणार नाहीं, तेंच कवितेच्या एका श्लोकाच्या बंदिस्त चौकांत तो आपल्या आजन्म मूर्खपणाचें प्रदर्शन करून

मोकळा होईल ! तसेंच, गद्यांतल्या लेखांतून भल्याबुऱ्यांची सेळ-भेळ असल्यामुळें बरेंवाईटपणाबद्दल खात्री करून घेण्यासाठीं प्रत्येक लेख आपल्याला बहुधा निम्माअधिक तरी वाचावाच लागतो. आणि बराच वेळ गेल्यावर त्यांतील फोलपणा आपल्या लक्षांत येत जातो. मासिक पुस्तकें वाचतांना कित्येकदां तरी आपली अशी फसगत होऊन उगाच वेळ फुकट जातो. कवितेच्या बाबतींत अशी फसवणूक बहुतेक होत नाहीं ! कविता दिसली कीं आपण तिकडे मुळीं पहातच नाहीं ! त्याचप्रमाणें गद्याच्या नियमशून्यतेमुळें 'आव जाव घर तुमारा' अशांतला त्याचा प्रकार होऊन बसला आहे. गद्य लेखकाच्या मनांत आलें, कीं तें कसेंबसें तरी कागदावर उतरतेंच; आणि त्यामुळेंच गद्याचें गांठोडें मर्यादेबाहेर फुगत जात असतें. परंतु गणमात्रायमकांसारख्या अडचणींमुळें आजवर किती तरी लोकांच्या कविता करण्याच्या कल्पना वाऱ्यावर विरून जगाच्या मागचा जंजाळ चुकलेला आहे. तात्पर्य, गद्यापेक्षां काव्याचा मनुष्य-जातीला अतोनात जास्त फायदा होत आलेला आहे.



रा. ग. गडकरी

वस्तुतः पहातां प्रस्तुत लेखकासारख्या सामान्य मनुष्याला सदरहू विषयावर अधिकारयुक्त वाणीनें बोलतां येणें अशक्य कोटीच्याहि पलीकडचें कार्य झालें असतें. परंतु अलीकडे कविता-देवीच्या शिखरावर,—नव्हे, कवितामंदिराची लागवड,—तसेंहि नाहीं, काव्यामृताची स्वैर लकेरी—, छेः, नाहीं साधत ! कवितेची

रचना व टीकांचा भडिमार हीं दोन्हीहि इतक्या अमर्याद प्रमाणा-वर वाढत चाललीं आहेत कीं, नियतकालीन वाङ्मयाकडे नुसतें धांवतां धांवतां पहाणारालाहि तद्विषयक बरीचशी माहिती झाल्या-वांचून राहणार नाहीं. त्यांतून मला तर मित्रत्वाच्या नात्यानें उभयपक्षीच्या वाग्भटांच्या जिवंत वार्णाचाहि लाभ होत असल्यामुळें 'अधिकस्याधिकं फलम्' होऊन बसलें आहे. आणि म्हणूनच आप-

*ल्या तावडींत सांपडलेल्या हरिणीला जसा चित्ता।
बघतो, तशा प्रकारें तत्परतेनें व पूर्ण समचित्ता—॥ १ ॥
नें वाचक जर माझा प्रस्तुतचा लेख नीट बघतील।
तर त्यांना कवितेचें पुष्कळसें ज्ञान खास होईल ॥ २ ॥

जगांतील एका काव्यसंपदेकडे निरखून पाहणाराला तिचे दोन अगदीं ठळक भाग करतां येण्यासारखे आहेत. एक जगांतील लहान-मोठ्या घडामोडींमुळें सुचलेली कविता, व दुसरी अशा प्रकारची कविता वाचल्यामुळें किंवा एखाद्या कवीशीं बराच परिचय झाल्यामुळें केलेली कविता. पहिल्या प्रकारची कविता व्हावयाला एखाद्या 'कवी'खेरीज दुसरें कांहीं लागत नाहीं. दुसऱ्या प्रकारच्या एखाद्या कवितेचे सोळा सोपस्कार व्हावयाला मात्र पहिल्या प्रकारची एखादी चांगलीशी कविता, तिचा अर्थ न समजणारा आणि स्वतःला 'कवि' समजणारा एखादा ब्रह्मदेव, त्या काळीं एखादी लोकप्रिय

---

* गद्य व पद्य यांचे परस्परभिन्न रचनानियम बहुतेक कांटेतोल सावधगिरीनें संभाळून हें 'काव्यगद्य' निर्माण केलेलें आहे. गद्य व कविता—अतएव निसर्ग व कला यांच्या एकजीव तादात्म्याचें हें पहिलें उदाहरण आहे अशी उमेद आहे. लांबलांब संस्कृत समास व कोंवळे कोंवळे शब्द यांच्या जाळ्यां-तील शाब्दिक उपमांची जी एक गुंतावळ अलीकडे 'एक गद्यकाव्य' म्हणून लोकांसमोर मांडण्यांत येते, तिच्यावरून या काव्यगद्याची कल्पना सुचलेली आहे. —बाळकराम

झालेली चाल, कवितेंत नेहमीं दिसून येणारें कांहीं संस्कृत शब्द, 'जनिं', 'जगीं,' 'खचिताचि', 'ग', 'या काळीं' यांसारखे कांहीं उडाणटप्पू शब्द, कांहीं बेकार शुद्धशब्दयोगी अव्ययें, हव्या त्या ठिकाणीं सांपडणाऱ्या थोड्याशा उज्ज्वल उपमा, या सर्वांचा अचुक उपयोग करण्याची हातोटी, धाडस व अज्ञान, असल्या काव्य-निष्पत्तीच्या परिणामाबद्दल बेफिकीरपणा, वाटेल त्या ढोबळ चुकीला दुर्बोध गुणांच्या कोटींत ढकलण्याइतका निस्सीम आत्म-विश्वास, हा एकंदर खटाटोप उरकण्याला पुरेसा रिकामपणा, प्रसिद्ध मासिक पुस्तकांतील परतवाणाला मतभेदाच्या गंभीर स्वरूपाखालीं ऐसपैस जागा देणारें एखादें मासिक पुस्तक, या कर्त्याचें नुसतें नांव किंवा फार तर दोन ओळींचा मासला पाहिल्याबरोबर तें पान बदलणारे थोडेसे वाचक, पुढें कांहीं तरी कारणामुळें जुन्याच्या अभिमानाचें सोंग घेऊन कुठल्या तरी वृत्तपत्रांत तिच्यावर खरमरीत थोबाडसुख घेणारा त्याच किंमतीचा एखादा टीकाकार, त्या टीकेवर कविराजांच्या तोंडच्या असंबद्ध शिव्यागाळीचा भडिमार, भाविक अजागळपणानें ऐकणारे त्यांचे सलगींतले सोबती, त्याच मुक्ता-फळांतल्या तुटपुंज्या तयारीनें प्रतिटीका करणारा एखादा जानी-दोस्त, आणि अखेरीला बारा महिन्यांतून केव्हां तरी एखाद्या सभेंत या कवीचा त्याच्या जातगोतासकट वर्षश्राद्ध करणारा त्याच्याच देशांतला दुसरा उपटसुंभ, इतकी सामुग्री असावी लागते !

याप्रमाणें दुसऱ्या प्रकारच्या कवितेसाठीं साधनबाहुल्याची गरज असल्यामुळें तिची निष्पत्ति मर्यादित प्रमाणावर होते असें मात्र मुळींच नाहीं. भरण्याच्या ( Quantity ) दृष्टीनें पाहिलें असतां मिठाईच्या पुड्यांत पेढ्यांचें बत्ताशांशीं, मोरीसाठीं केलेल्या मिश्रणांत फिनाइलचें शुद्ध पाण्याशीं, माळ्याच्या पुड्यांत गुलाबाचें

कण्हेर फुलांशीं, पूना मेलच्या प्रवासांत थांबावयाच्या स्टेशनांचें न थांबावयाच्या स्टेशनांशीं, मोठमोठ्या ऑफिसांतून वरिष्ठ अधिकाऱ्यांचें कारकुनांशीं, क्लबांच्या बैठकींतून त्या बाटल्यांचें सोडालिमलेटच्या बाटल्यांशीं, प्रेमयाचनेच्या संवादांतून रमणीच्या शब्दांचें वल्लभाच्या शब्दांशीं, किंवा एकंदर समाजांत शहाण्यांचें मूर्खांशीं जें प्रमाण असतें तेंच पहिल्या प्रकारच्या कवितेचें दुसऱ्या प्रकारच्या कवितेशीं असतें.

रा० ग० गडकरी
( कवींचा कारखाना )

**प्रश्न व सूचना**

( १ ) पुढील वाक्यांचा अर्थ सांगाः—

[ अ ] तेंच कवितेच्या एका श्लोकाच्या बंदिस्त चौकांत तो आपल्या आजन्म मूर्खत्वाचें प्रदर्शन करून मोकळा होईल.

[ आ ] पहिल्या प्रकारची कविता करण्यास एखाद्या कवीखेरीज दुसरें कांहीं लागत नाहीं.

[ इ ] गणमात्रायमकांसारख्या अडचणींमुळें आजवर किती तरी लोकांच्या कविता करण्याच्या कल्पना वाऱ्यावर विरून जगाच्या मागचा जंजाळ चुकला आहे !

( २ ) [ अ ] पुढील शब्दांना प्रचलित अर्थ कसा आला तें सांगाः— अजागळ, जानीदोस्त, बेफिकीर.

[ आ ] गडकऱ्यांनीं 'बेकार शुद्धशब्दयोगी अव्ययें' म्हटलेल्या अव्ययांचीं उदाहरणें द्या.

[ इ ] कवितेंत येणाऱ्या 'जनिं', 'जगीं', 'खचिताचि' या शब्दांना गडकऱ्यांनीं 'उडाणटप्पू' कां म्हटलें आहे ?

( ३ ) [ अ ] सदरहू उताऱ्यातील कांहीं ठिकाणचा विनोद, कल्पनाविलास सुचविणाऱ्या उपमा, मार्मिक उपरोध, आणि

अतिशयोक्ति यांवर कसा आधारलेला आहे हें उदाहरणें देऊन सांगा.

[ आ ] दुसऱ्या परिच्छेदामधील दुसऱ्या वाक्यांत गर्भित असलेला विनोद विशद करून सांगा.

( ४ ) या उताऱ्यांतील अनुप्रासाचीं उदाहरणें देऊन त्यांतील गुण-दोषांची चर्चा करा.

---

## एका अस्पृष्टाच्या डायरींतील पानें

[ ज्यांना आपण 'अस्पृश्य' मानतों ( किंवा मानीत होतों ) त्यांचे कसे हाल होत असतात, त्यांवर कसा जुलूम होत असतो, त्यांचे कसे अपमान होत असतात, याची स्पष्ट कल्पना असणारे 'स्पृश्य' वर्गांत फार थोडे. अशा थोड्या लोकांपैकीं रा० माटे हे एक आहेत. त्यांनीं अस्पृश्यांमध्यें स्वार्थत्याग-पूर्वक काम केलेलें आहे व त्यांचें हृदय कोमल आणि सहानुभूतिपूर्ण असल्यामुळें अस्पृश्यांचीं दुःखें व त्यांच्या हालअपेष्टा यांची कल्पना त्यांना जशीं आली आहे तशी स्पृश्यांपैकीं थोडयांनाच आलेली असेल. मार्मिकता, भाषाप्रभुत्व व वर्णनकुशलता यांची जोड त्यांच्या अनुभवाला मिळाल्यामुळें त्यांनीं अनुभवाच्या आधारावर लिहिलेलीं काल्पनिक शब्दचित्रें वाचकांना हृदयस्पर्शी वाटल्याशिवाय राहणार नाहींत. माटे आपल्या लेखाच्या प्रस्ता-वनेंत म्हणतात—" माझ्या माहितीच्या एका अस्पृष्टानें मीं विचारल्यावरून एका दिवसाची हकीकत सांगितली ती जरूर ते फेरफार करून खालीं दिली आहे."

"........ साहेबांनीं खटले रात्रीचे चालविण्याची पद्धत ठेवल्यामुळें निजावयास उशीर झाला होता. नऊ वाजल्यापासून पहांटे तीन वाजेपर्यंत हातांतलि खुळखुळा वाजवीत गांवांत नऊ हेलपाटे घातले. चार वाजतां घरीं जाऊन पडलों. जरा डोळा लागतो तों दारावर थाप बसली. बुध्याच ओ दिली नाहीं. हाका-



श्री. म. माटे

हाक ऐकून बायको कुजबुजली, "महंमदभाई आल्याती जनु." महंमदभाईचें नांव ! ताडकन् उठलों. लंगोटीवरच्या कापडाचा त्रिकोण सावरीत पुढें आलों. शिपाई म्हणाला, "लेका पिऱ्या, त्यो महंमदभाई बोंबलत आलाय ना !" इतक्यांत महंमदभाई स्वतःच आले व म्हणाले, "ल्येका पिऱ्या, आतां [1]रास्सार निजला हैस, जरा भाईर चल." कारभारीण आंतून गुरगुरून म्हणाली, "अन् आतां तर आलं; जरा वाइच डोळा लागतुया त्यो तुमी आला; अन् रातसार कोन निजलया जी ?" मी खोट्याच रागानें तिला टाफरलों "अग म्हाउं दे ! उगाच कां त्वांड करतीयास ? मानूस बगून बोलावं ! दुसरं, तिसरं कुनी हाइ का ? आपल महंमदभाई हाइती." वास्तविक हा महंमदभाई आहे हें मला प्रथम तिनेंच सांगितलें होतें. जाणूनबुजूनच तिनें ही ढुशी दिली होती; पण सावरण्यासाठीं ती आतां म्हणाली, "आं, कोन महंमदभाई ! मेल्यानु [2]पाठेचं दिसतया कुटं ! जा, जा, मंग जा बेगी बेगी." दरम्यान महंमदभाईनीं आपला फेटा चार बोटें मागें सारून आपली टाळू कुर-

---

१ रातसर, रात्रीपासून. २ पहांटेचें.

वाळावयास सुरुवात केली होती. बायकोनें सावरलें म्हणून ठीक, नाहीं तर 'साल्या'पासून सुरुवात होऊन बेचाळीस कुळांचा उद्धार सूर्योदयाच्या आंतच व्हावयाचा ! मीं कांबळें खांद्यावर टाकलें. पागोट्याचीं सगळीं वेटोळीं डोक्यावर ठेवून एकाच विळख्यानें तीं मीं घट्ट केलीं व निघालों. मीं चूळहि भरली नव्हती व सकाळचें सगळेंच व्हावयाचें होतें. पण थोरांचीं कामें पडलीं, गेलें पाहिजे.

चालूं लागल्यावर महंमदभाई म्हणाला, " लेका पिऱ्या, " —कोणास वाटेल कीं मी महंमदभाईचा फार लाडका म्हणून मला ते अशी हांक मारीत असावे. पण तसें नाहीं. कोणाचेंहि नांव निघो; त्याच्यामागें 'लेक' हा उपसर्ग हा यांचा असावयाचाच ! त्यो 'लेकाचा' मामलेदार; त्यो 'लेकाचा' फौजदार,—हें महंमदभाईचें पालोपदच होतें.—" लेका पिऱ्या, आतां साहेबाला पुढल्या गांवाला जायचं आहे. तुला वर्दी द्यायला गेलं पाहिजे." मुजरा करून मी म्हणालों, "मी जातों जी." महंमदभाई म्हणाले, " आठ वाजायच्या आंत म्हसोबाच्या वडाखालीं ये; मी तिथं बसलों आहें. काय होतं तें सांग." मीं मनांत ओळखलें, कीं पुढील गांवाला वर्दी देण्याचा हुकूम साहेबांनीं यालाच केला असावा; पण हा सुस्तावला असल्यामुळें यानें ही गोणी माझ्यावर लादली. म्हसोबाच्या वडाखालीं मीं याला काय होतें तें सांगावें म्हणजे मग जणूं कांहीं आपणच जाऊन आलों या ऐटीनें हा साहेबापुढें उभा रहाणार ! अजून फटफटलें नव्हतें. नाईकसाहेब दोंद हलवीत एका बोळाकडे कोठेंसे निघून गेले. थोडासा गेल्याचा देखावा करून मीं पिरगळा मारला अन् घरीं परत आलों. सगळे विधी उरकले. तुकडा खाऊन जावें असें वाटलें; पण घरांत कांहीं नव्हतें. पुन्हा निघालों, आणि पलीकड-च्या गांवच्या वेशीवर जाऊन येसकराला सांगितलें, " साहेब येतो

या. पाटलाला सांग." दोनचारदां ढोसल्यावर येसकर खेंकसून म्हणाला, " आर व्हय; सांगतु, सांगतु जा."

मी परत आलों. म्हसोबाच्या वडाखालीं महंमद भाई गवसला नाहीं. बोळाकडे गेलों. विजारीच्या नाडच्या आंवळीत आंवळीत लालबुंद डोळे करून भाई म्हणाले, " लेका पिऱ्या, काय रे झालं?" मी म्हणालों, " आलों वर्दी देऊन." भाई निघाले ते एकठोक साहेबाच्या तंबूकडे. चोपदारानें विचारलें, "काय काम आहे? साहेब आतां मिळायचे नाहींत." इतक्यांत साहेब जांभया देत बाहेर आले. भाईनीं रिपोर्ट दिला. साहेब म्हणाले, " अच्छा नाइकसाब, तुम्हांला फार जाग्रण झालं आहे. आतां जाऊन निजा जा." खोटेंच हंसून भाईनीं सलाम केला. परतात तों पलीकडच्या राहुटींतून हपीसचे हेड क्लार्क आले व भाईस म्हणाले, " वा नाईक, आमच्या हपीसला तुमच्या गांवांत लाकडंसुद्धां मिळूं नयेत? भाई म्हणाले, " हां सांब, लाकडाला काय तोटा गेला आहे?" भाईनीं खूण करून मला बरोबर चालविलें. आम्ही दोघे गांवांतल्या एका घरापाशीं आल्यावर ते थांबले व एका तुळवंटावर चपलचा पाय देऊन इकडे तिकडे पाहूं लागले. भिंतीच्या आसऱ्यानें मी पलीकडे उभा होतों. इतक्यांत स्वारींतला शिपाई आला. भाई म्हणाले, " लाकडं आहेत; पण फोडायला कोण आहे!" दरम्यान मी मधल्या खिडारांतून घरीं निघून गेलों. शिपाई साहेबांच्या स्वारींतला, गुरगुरूं लागला. महंमदभाई संतापला. घरीं येऊन दारावर लाथा मारूं लागला. कडकन् मोडून दार उघडलें. " साल्या, लाकडं तुझ्या बानं फोडायची काय? अरे, उत्पन्न खातां सरकारचं, का फुकट काम करतां?" कारभारीण त्रासानें म्हणाली, " मडं गेलं त्या सरकारचं, उत्पन्न असतं तर तुकड्यासाठीं पोरं कां धाडलीं असतीं गांवभर?" " हं, ज़ास्त बोलूं नको चंद्रे!"

भाई म्हणाले, " राजेद्रों[1] होईल." मीं मुकाट्यानें कुऱ्हाड उचलली. पण ती शेवटायेला[2] हवी होती. भाई म्हणाले, " जा पळत सुलतानजी-कडे, त्याला म्हणावं शेवटून दे." जातां जातां नाईकसाहेबांनीं मला डोळ्यांनीं खूण केली. मी उमगलों कीं, भाईनाहि थोडीं लाकडें हवीं आहेत. सुलतानजीकडे गेलों, पण त्याची बायको बाळंतीण होत होती. तो म्हणाला, " काय ल्येका शेवाटतुइस ! घरामंदी सर्वी गडबड आन्—" खांडाळल्या कुऱ्हाडीनेंच काम चालू केलें. दहा वाजतां स्वारींतला माणूस आला आणि म्हणाला, " ल्येका तकडं ब्वांब झाली ना ? " घाम निरपून मी म्हणालों, " झालं दादा ! " लाकडांचा बिंडा बांधून हपीसच्या दाराशीं टाकला. लाकडांकडे पाहून आचारी म्हणाला, " लेका ! लाकडं जरा बारीक फोडलीं असतीस तर तुझ्या बाचं काय खरचलं असतं का ? " माफीसाठीं मीं खोटेंच हसलों व सलाम केला. हपीसच्या तंबूंत खूप खोकाळा चालला होता. मामलेदार, फडणीस यांनीं फराळाचें करून आणलें होतें. आंतून डराडर ढेंकरा ऐकूं येत होत्या. आचाऱ्यानें तक्रार केली. शिरस्तेदार बाहेर आले आणि अनुनासिक आवाजानें म्हणाले, " काय रे ! कोण तूं ? हं. सर-कारचीं कामं अशींच करतां का ? तुम्हांला फुकट खायला हवं अं ! " इतकें बोलून त्यांनीं मला चालतें केलें.

हा वेळपर्यंत दिवस अगदीं डोईवर आला होता. मी घरीं गेलों. बायकोला विचारलें, " शिद्या कुठं हाय ? " ती म्हणाली, " शिद्या अन् रक्मी गांवांत गेल्याती." " अन् तानी ? " " तानी गेलीया पान्याला. येरवाळी गेली या. अजून न्हाई आली." भुईला अंग टेंकतांच हें ऐकलें. तट्कन् उठून पाणवथ्याकडे गेलों. पाहतों तों

१ राजद्रोह. २ शेवटाला ( टोंकाला ) धार लावायला.

पाण्याचा घडा पुढें ठेवून तानी उकिडवी बसली आहे. झाड होतें, पण त्याच्या सावलींत साहेबाचा घोडा धुवावयाला उभा केला होता. माझी तानी शेराच्या सावलींत बसली होती ! "दादा, पानी वाडता का व ?" "बया, माजं मला काम हाय." "दादा, पानी वाडतां का व ?" "बया, मला लई वकत झालाय." "बया, पानी वाडतां का व ?" "इश्श ! आम्ही का तुला पाणी वाढायचं ?" असें सारखें चाललें होतें. बराच वेळ तारतळ्या[1] दिल्यावर महंमदभाईची बहीण बाहेरून कल्हई केलेला हंडा घेऊन आली. पाण्यांत उतरलेले कुणबीलोक खोट्याच रागानें एकमेकांस म्हणाले, "दूर व्हा लेको ! बेगमला पानी न्हेऊं द्या." बेगम उंच, सरळ व वयस्कर झालेली अशी होती; तिची विजार काळी झाली होती आणि तिनें आपले केस मागच्या आठवड्यांत विंचरलेले होते. बेगम हेळांत शिरली. ओंजळीनें पाणी घेऊन तिनें आपलें तोंड साफ केलें व दोन चुळाहि थुंकल्या. तानी म्हणाली, "बेगमबाई, पाणी वाडा व." बेगमनें हंडा भरला व बाहेर येऊन तिनें तो तानीच्या घड्यांत ओतला. घडा भरून जाऊन पाणी इकडे तिकडे वाहवलें. ब्राह्मणिणी, कुणबिणी किंचाळून म्हणाल्या, "अग ए ! तुझं विटाळाचं पाणी इकड येतंय ना." मी थट्टेनें म्हणालों, "आमचा इंटाळ झाला ! अन् त्या बेगमसाबानं चुळा थुकल्या त्याचं काय ?"

तानीचा घडा मींच डोईवर घेतला. ऊन म्हणजे मी म्हणत होतें. काथ्यानें बांधलेला माझा जोडा तानीच्या पायांत घातला. तो फरकटत असल्यामुळें तानी हळुहळू चालली होती. मीं डावा हात घड्याला दिला होता. तानीनें माझा उजवा हात आपल्या

---

१ बराच वेळ, कंटाळा येईतों वाट पाहत बसणें.

काखेंत विळखून घेतला. भुकेनें, श्रमानें, उन्हानें तापलेला माझा देह तानीच्या लडिवाळ स्पर्शानें शांत झाला. घराजवळ आलों, तों रक्मी व शिद्या कळवंडतांना ऐकलीं. आंत येऊन पहातों तों रक्मीच्या पदरांत हपीसच्या लोकांनीं टाकलेले करंज्यांचे उष्टे तुकडे होते. शिद्याला नुसतीच भाकर मिळाली होती. त्याच भांडणांत तानी जाऊन मिसळली. मी विहिरीवर गेल्यापासून एक गोष्ट बरी झाली. कारभारीण मोकाशाच्या घरीं गेली आणि दोन शेर दाणे त्यांच्याकडून घेऊन आली. तिचा रस्ताझाडणीचा अडीच रुपये पगार उद्यां व्हायचा होता. उद्यांपर्यंत तग धरायला हवा म्हणून तिनें चांगल्या पातळ कण्या केल्या. आम्ही सगळींजणं त्या प्यायलों. पितांच त्या हातींपायीं आल्या. पोरांना आणि मला गर्कन झोंप आली. कारभारीणहि थोडी वांकडी झाली. इतक्यांत नायकाचा गिरो[1] पुन्हा आला. "लेका, माझ्या नडींला नख लावलंस; लेका, माझ्या पोटावर पाय आणलास. तूं तरी आतां कसा जगतोस तें पहातों. ध्यों[2] दिवसां लेका सवास्त पडलाइस ढोरावाणी घोरत! ऊठ! ऊठ!" अशा शिव्याशापांची आणि धमक्यांची गर्दी उसळली. मी खरोखरच ढोरासारखा अगदीं स्वस्थ पडलों होतों. बायको पुढें झाली. दोन्ही हातांनीं नमस्कार करून अस्तुरी[3] म्हणाली, "पाया पडतें महाराज! मालिक निजल्यात, जिवाला वाइच ग्वाड वाटत नाहीं." "काय धाड बडवली आहे त्याला! कापला तर दोन होतील!" "जरा वाइच जाळ आलाया!" "अरे, सकाळीं पांच मण लांकडं फोडलीन् भर उन्हांत! अन् ताप यायला काय झालं?" "माझ्या गळ्याच्यान् त्यास्नी जाळ आलाया."

---

१ ('ग्रह' या शब्दापासून) राशीस लागलेला दुष्ट मनुष्य. २ भरदिवसां. ३ स्त्री, पत्नी.

"बया! तुझ्या नवऱ्याला सांगितलं कीं........पूरच्या पाटलाला साहेब येतोय म्हणून वर्दी दे, मला म्हणाला वर्दी दिली; अन्—" "भाईसाब; तुमच्या गळ्याची आन्; त्ये ग्येल हुत." "बया, माजा गळा तुम्हीं कापला, आतां तो माझं डोकं मारल्याबगार राहील का?"

आरडाओरडा ऐकून बाहेर आलों. मी म्हणालों, "मीं वर्दी दिली होती." "मग उलट रपोट कसा आला र?" मीं मनांत ओळखलें कीं, येसकरानें माझा निरोप झोंपेंत ऐकला, आणि तो पाटलास सांगावयाचें विसरला. पण मीं आतां त्याला काय करावें? नाईक रागारागानें इकडेतिकडे पाहून फुसफुसत होता. इतक्यांत फौजदाराकडून त्याला बोलावणें आलें. पांचपन्नास शिव्या हंसडून भाई चालते झाले. बोलवावयास आलेल्या शिपायास मीं विचारलें, "काय झालं हो?" तो म्हणाला, "अरे हें बघं, पाटलाला कांहीं वर्दी मिळाली नाहीं, साहेब जो घोड्यावरनं गांवांत शिरतो तों सगळा शुकशुकाट! चावडीवर एकठोक गेला तों कोल्हाटणीचें गाणें चाललेलं. संबू पाटील, नारू पाटील, बाळोबा देसपांड्या, सगळे खुलल्यात!" मीं विचारलें, "आतां काय होईल र?" "काय होईल? दिवेलावणीच्या आंत महंमदभाईला आतां लांब नेऊन घालत्याल!" बायको म्हणाली, "लई वंगाळ झालं." "अन् बढती बंद होईल." "लई कसनुसं झालं." "अन् पगार तोडत्याल!" "लई वंगाळ झालं!" तानी म्हणाली, "अन् भाई जायाचं मंजी बेगम बी जायाची का ग?" "व्हो तर, ती त्याची भन नव्ह का?" तानीनें विचारलें, "आय्, मंग आपल्याला पानी कोन वाडील ग?" शिपाई निघून गेला.

हा वेळपर्यंत सूर्य मावळलाच होता. साहेब व त्याचें हपीस गांव

सोडून गेलें होतें. मामलेदार, फौजदार इत्यादि मंडळी मोकळयानें श्वास सोडूं लागली होती. 'आपलें कांहीं येणें राहिलें नाहीं' अशा पावत्या वाण्याकडून, लाकूडवाल्याकडून घेण्यास हपिसांतली मंडळी विसरली नव्हती. गांवांत हरिबोवांचा उत्सव होता. संध्याकाळीं कीर्तन होतें. हरिदासबोवांची वाणी मोठी प्रासादिक म्हणून प्रसिद्ध होती. संध्याकाळ होतांच मांडवाकडे मंडळी जमूं लागली. मंडप शृंगारण्यांत गांवचे कसबी सोनार लोक आणि आळींतल्या उत्सवाचें निमित्त करून शाळेंतून गैरहजर राहिलेलीं पोरें दुपारभर खपत होतीं. कोणी कांहीं, कोणी कांहीं असें सामान पुरवून मोठा सुंदर थाट केला. पाटलानें मेढी दिल्या. भिकणभाईनीं पत्रे दिले. गणू हलवायानें बत्तासे दिले. फौजदारांनीं परवानगी दिली. बापूशास्त्री पुराणिकानें अक्षता दिल्या. वरल्या घरच्या सावकारानें हंड्याझुंबरें दिलीं. मीं दवंडी दिली. कासमनें बुक्का दिला. गेन्या मांगानें चराटें दिलीं. आज गांवांत जिकडे तिकडे आनंदीआनंद होता. साहेब व हपीस हीं गेलीं होतीं व हरिबोवांचा उत्सव होता. दुपारीं गांवांत तुकडे मागतांना शिद्या आणि रक्मी यांनीं ही वार्ता ऐकलीच होती. तिकडे वाजंत्रीं सुरू होतांच शिद्या आणि रक्मी आनंदानें इकडेतिकडे नाचूंउडूं लागलीं. 'आज आपल्या गांवांत उच्याव, आज आपल्या गांवांत उच्छाव! बाबा, आपण कवा जायचं?' म्हणून पोरें मागें लागलीं. कारभारणीनें महंमदभाईचा विषय काढला. मी म्हणालों, "आपल्याकडे काय आहे? मी जायचा तो जाऊन आलों." वाजंत्रीं जोरानें चालू झालीं. 'बाबा आतां केव्हां जायचं' म्हणून पोरें बोटें ओढूं लागलीं. आम्हींहि तयारी केली. अस्तुरी कोरें लुगडें नेसली. तिच्या मुंबईच्या मावळणीनें तिला तें दिलें होतें. शिद्यानें बिनबाह्यांचा कोट घातला. श्रमाचा योग्य तो मोबदला

मिळण्यासारखा नसल्यामुळें चोर लोक आपल्या आळीला फिरकत नाहींत म्हणून मोडकें कवाड नुसतें ओढून घेतलें व निघालों. मंडपापाशीं पोंचतों तों जिकडे तिकडे 'उत्तम' लोकांची गर्दी चालली होती. दिव्यांचा चकचकाट झाला होता. माझीं माणसें दिपलीं. बाजूस उभीं राहिलीं. बोवा आले. पखवाज वाजविणारा गांवचाच होता. बोवा इकडे तिकडे जिज्ञासेनें बघत होते. इतक्यांत 'आले, आले' असा कल्ला झाला. मामलेदार, फडणीस, फौजदार आले. पहिले दोघे उंच गाद्यांवर लोडाशीं टेंकून बसले. फौजदार मुसलमान होते. मंडपांत येतांना ते बिचकूं लागले. मामलेदार म्हणाले, "या, या, हरकत नाहीं. अहो, हरिबोवा सगळ्यांचेच होते! या, या!" त्यांना खुर्ची देऊन शेजारीं बसविलें. बसाबस सुरू झाली. मंडपाच्या टोंकापाशीं कोणी बसलेले, कोणी उभे, त्यामुळें दिसेना. आम्ही दूर फुपाटच्यांत उभे होतों. कोणी झळक-फळक गृहस्थ आले म्हणजे आजूबाजूचे लोक म्हणत, "पिऱ्या बाजूला हो! त्यांना लागशील ना!" आज हरिबोवांचा उत्सव होता. ते सर्वांना सारखं लेखीत! पोरें म्हणालींच, "बाबा, मंडपांत चला कीं! बाबा, मंडपांत चला कीं?" मीं नुसताच खेंकसलों व त्यांना चूप बसविलें. आज गांवचा उत्सव होता. हरिबोवा सर्वांना सारखें लेखीत!! खरोखर गांवचा उत्सव होता. ते सर्वांना सारखें लेखीत.

कथा उभी राहिली. पहिलें नमन झालें. बोवांनीं अभंग म्हटला, "जे का रंजले गांजले। त्यांसि म्हणे जो आपुले॥ तोचि साधु ओळखावा। देव तेथेंचि जाणावा॥" इत्यादि. ज्या हरिबाबांचा हा उत्सव होता ते फार विरागी संत होते. त्यांचें वर्तन सर्वांशीं समत्वाचें असे. अर्थात् त्यांच्या चरित्राचें आख्यान लावावयाचें तर पूर्वरंगाहि त्याला जमेसा पाहिजे, म्हणून या अभंगाची योजना

बोवांनीं केली असावी. बोवांचा शब्दप्रवाह चालू झाला. अभंगाची खुलावट करतां करतां बोवा एकनाथाच्या गोष्टीवर आले. एकनाथांची कावड काशीहून आली. पुढें ती रामेश्वराला जावयाची ! आंतील गंगा जर रामेश्वरावर पडली तर कावड आणल्याचें सार्थक व्हावयाचें. पण वाटेंत एक गाढव तान्हेनें व्याकुळ होऊन पडलेलें होतें. गाढवाच्या तोंडांत गंगा टाकावी ही नाथांची इच्छा. शिष्य म्हणाले, " महाराज ! गंगा खांद्यावरून आणिली आणि रामेश्वरास घालावयाची आहे." नाथ म्हणाले, " माझा रामेश्वर गाढवाच्या अन्तरात्म्यांत आहे." इतकी कथा सांगून बुवा म्हणाले, " काय थोरवी ही ! केवढें साधुत्व ! केवढी भूतदया ही ! आपणा सर्वांना मार्ग दाखविणारे नाथमहाराज त्या व्याकुळ झालेल्या गाढवाच्या तोंडांत गंगा ओतते झाले ! गाढवाचा अन्तरात्मा तृप्त झाला. नाथमहाराजांना परम हर्ष झाला, कीं अरे, गाढवाची तृषा शांत झाली. गाढवाचा अन्तरात्मा माणसाच्याहून कांहीं निराळा आहे का हो ? प्राणिमात्र येथूनतेथून सारे एकच आहेत. काय सांगावं, तुम्हांआम्हांला माणसांचा अन्तरात्मा तेवढा कळतो, पण साधु-पुरुषांना पशुपक्ष्यांचे अन्तरात्मेसुद्धां कळतात. अहो, कळतात नव्हे आपल्यासारखे वाटतात." तानी लहानच, पण कळण्याइतपत मोठी होती. तिनें माझ्याकडे साभिप्राय पाहिलें. बोवा म्हणाले, " सर्व चराचर विश्वांत तो परमात्मा भरला आहे. म्हणून भूतमात्रांचे ठायीं त्याचा साक्षात्कार ओळखून सज्जन लोक सर्व प्राण्यांवर दया करतात. संसारी लोकांनासुद्धां महान् भगवद्भक्त तुकाराम उपदेश करतांना काय म्हणतात ? 'उत्तम गति तो एक पावेल।' कोण पावेल ? 'भूतदया गाईपशूंचें पालन ॥ तान्हेल्या जीवन वनामाजीं ॥' "काय सांगावें महाराज ? रानांवनांतैसुद्धां माणसांसाठीं, पशूंसाठीं पाणपोया

घातल्या पाहिजेत." तानीनें माझ्याकडे पाहिलें. "हा माणसाचा साधा धर्म आहे. बरें वैश्वदेव झाल्यावर कोणी अतिथि आहे का हें ब्राह्मणानें पहावें व मग जेवावें असें सांगितलें आहे. नगरांतील सर्व प्रजा जेवल्या आहेत कीं नाहीं हें पाहून राजानें जेवावें असें सांगितलें हा गृहस्थधर्म झाला. हा पाळील तो साधूच. देव तेथेंच आहे. म्हणून महान् भगवद्भक्त तुकाराममहाराज म्हणतात, "जे का रंजले गांजले........" "बोला पुंडलीक वरदे हारिविठ्ठल !"

बोवांनीं कंबर बांधली. पखवाजवाला कोंबड्यासारखी मान झुंजवूं लावला. बुक्का आला, बोवांना लावला. अधिकाऱ्यांच्या पुढें तबक धरलें. पेंगणारीं पोरें पाठमोरीं असलीं तर त्यांच्या कपाळांवर तो मागून चोळण्यांत आला. बुक्केवाला निघून गेला. तानीनें माझ्याकडे पुन्हा पाहिलें. शिद्या अन् रक्मी तेथेंच पायाशीं पसरलीं होतीं. बायकोहि पेंगूं लागली. मीं म्हटलें, "चल आतां, पोरं निजलीं." कीर्तनाकडे तोंड करून बायको धीटपणानें ओरडली, "ववाळणीचा पैसा न्या व !" कोणसें खेंकसलें, "आतां कसली ववाळणी ? माझ्यापाशीं देऊन ठेव, आरतीच्या वेळीं मी देईन." तिनें पदराच्या गांठींतला पैसा त्या गृहस्थाच्या हवालीं केला. मंडपांत 'राम राम सीताराम, दीनांचा कैवारी राम'चा धडाका चालू होता. पोरें खांद्यावर घेऊन आम्ही एकटेच घराकडे चाललों, वाटेनें तानी म्हणाली, "बाबा ! त्या गाढवाच्या पोराला बामनानं कावडीचं पानी पाजलं, अन् आपल्याला गांवच्या हेळावर कां व भरूं देत न्हाइती ?" मी उद्‌गारलों, "तुला काय सांगूं ! आपला शिद्या मोठा झाला, म्हणजे गांवकऱ्यांना विचारील याचा जाब." घरीं जाऊन निजलों. बऱ्याच वेळानें कथा संपल्याचें ऐकूं आलें. सर्वत्र सामसूम झालें. सर्व लोक ज्या वेळीं झोंपीं जातात त्या वेळीं संयमी

जागा असतो असें म्हणतात. पण आणखी एकजण जागा असतो. हाल, विपत्ति, अवमान आणि काळजी यांनीं पोखरलेला आत्मा जागाच रहातो. पण कांहीं वेळानें चित्तांतल्या वडवानळावर झोंपेची भरती पसरत आली. " भगवाना ! " म्हणून झोंपीं गेलों.

श्री० म० माटे

### प्रश्न व सूचना

( १ ) डायरींतील हीं पानें लेखकानें कोणत्या हेतूस्तव लिहिलेलीं आहेत ? हा हेतु साध्य करण्याकरितां त्यानें कोणकोणत्या वाङ्मयात्मक युक्त्यांचा अवलंब केला आहे ?

( २ ) " खरोखर आज गांवचा उत्सव होता, हरिबोवा सर्वांना सारखं लेखीत " या वाक्याची पुनरुक्ति करण्याचें प्रयोजन काय ?

( ३ ) या लेखांतील भाषा त्या त्या पात्राला अनुरूप अशी लिहिलेली आहे याचीं उदाहरणें द्या. डायरी लिहिणाऱ्या खुद्द अस्पृष्टाची भाषा त्याला अनुरूप आहे काय ?

( ४ ) खालील वाक्यांचें स्पष्टीकरण कराः—

[ अ ] ऊन्ह म्हणजे मी म्हणत होतें.

[आ ] कण्या हातींपायीं आल्या.

[ इ ] पण कांहीं वेळानें चित्तांतल्या वडवानळावर झोंपेची भरती पसरत आली.

( ५ ) [ अ ] पुढील वाक्प्रचारांचा वाक्यांत उपयोग करून त्यांचा अर्थ सांगाः—

डोळा लागणें, गोणी लादणें, साभिप्राय पहाणें.

[आ ] 'फडणीस' हा शब्द फड+नवीस (लेखक) असा झाला आहे. 'नवीस' शब्द लागून बनलेले आणखी ४–५ शब्द सांगा.

[ इ ] वक्त, वेळ, काळ, समय, टाइम या बहुतेक समानार्थक शब्दांच्या उपयोगामध्यें तुम्हांला कांहीं फरक दिसत असल्यास उदाहरणें देऊन दाखवा.

(६) 'त्यो' (वैदिक संस्कृत–'त्यत्'), 'बेगी बेगी' (सं० वेगेन), 'सर्वी' सं० 'सर्वे') हे शब्द संस्कृतच्या जवळ असून सुसंस्कृत लोकांच्या बोलण्यांतून गेलेले आहेत; परंतु अडाणी लोकांच्या बोलींत राहिलेले आहेत हें ध्यानांत धरण्यासारखें आहे.

---

# तीन नाट्यछटा

[ नाट्यछटा म्हणून जो एक मराठीमध्यें नवीन वाङ्मयप्रकार कै० शंकर काशीनाथ गर्गे यांनीं रूढ केला त्याचे तीन नमुने पुढें दिले आहेत; व ते तिन्हीहि श्री० गर्गे यांचेच लेखणींतून उतरलेले आहेत. या प्रकारामध्यें सामान्यतः कोणी तरी एक काल्पनिक पात्र आपल्याशींच बोलत आहे, किंवा जवळच परंतु अदृष्ट असलेल्या पात्राशीं बोलत आहे असें दाखविलेलें असतें; व त्यांत थोडक्या अवकाशांत परंतु अतिशय परिणामकारक रीतीनें एखाद्या विशिष्ट भावनेचा किंवा तत्त्वाचा परिपोष केलेला असतो. शेवटले दोन उतारे–( पंत वारले–राव चढले ) एकत्र वाचावयाचे असून ते दोन्हीहि एकाच कल्पनेचीं दोन अंगें आहेत. या प्रत्येक नाट्यछटेंत कोणत्या एका भावनेचा अगर कल्पनेचा किंवा विचाराचा उत्कटतेनें परिपोष केला आहे हें विद्यार्थ्यांनीं विचारपूर्वक शोधून काढावें. ]

## यांत रे काय ऐकायचंय्!

" पेट्रोल वगैरे आहे ना रे भरपूर ?– ठीक आहे ! तबेल्यांतून आणलीस कीं निघालोंच आम्ही !–छे हो ! नाहीं जमलें बोवा आज सकाळीं फिरायला जायचं ! सगळा वेळ त्या बक्षिससमारंभांत मोडला ! आठ वाजल्यापासून जें सुरू झालं, तें दहा साडेदहा पर्यंत चाललं होतं आपलं ! अस्सा कंटाळा आला होता, कीं ज्याचं नांव तें ! नकोसं झालं होतं अगदीं ! बरं, मधेंच उठून येईन म्हटलं, तर तिकडूनही


शं. का. गर्गे

पंचाईत ! कारण समारंभाची मुख्य देवता .... अध्यक्षच पडलों आम्ही, तेव्हां थोडंच कुठं हालतां येतं आहे ?– हें म्हणा रे, तें म्हणा रे, स....गळं कांहीं होईपर्यंत मग–शीः ! कसली व्यवस्था अन् काय ?........ चाललं होतं आपलं कसं तरी !– अहो, मुळीं हेडमास्तरांनाच कुणी विचारीना, तिथं कोण जुमानतो अध्यक्षाला अन् फद्यक्षाला ! मारे जोरजोरानं ओरडून बिचारा सांगत होता, कीं 'हें पहा ! हे जे आपले आजचे सन्माननीय पाहुणे आहेत कीं नाहीं, ते या शाळेचे माजी विद्यार्थी आहेत ! फार त्यांना शाळेचा अभिमान आहे !'– झा....लं ! असं म्हणतांच जो कांहीं टाळ्यांचा, अन् बांकावर हातपाय आपटण्याचा धडाका सुरू झाला, तो कांहीं.... राम ! राम !.... पुसूं नका ! म्हटलं आतां शाळा पडते, कीं काय होतंय् तरी काय ! पुढं हीच रड आमच्याहि भाषणाच्या वेळीं !– अहो, कारटीं आवरतां आवरेनात ! हा उठतो आहे, तो ओरडतो आहे, गोंधळ सगळा इथून तिथून ! अन् जरा कांहीं झालं कीं नाहीं कीं टाळ्या आणि दणदणा हातपाय आपटायचे ! काय हें ! छे बोवा ! आपल्या वेळेला होतं कांहीं असं ? —हॅः ! तऱ्हाच कांहीं वेगळी आजची ! काय पोरं, अन् काय मास्तर ! वा रे वा ! !— जाऊं द्या झालं ! सगळीच जिथें घाण............रॉटन्[१] झालं आहे, तिथं काय आपण तरी—चला ! आली मोटार वाटतं दाराशीं—पण हे.... चिरंजीव कुणीकडे निघाले आहेत आमचे ! फिरायला न्यायचं म्हणतों मी त्याला !– अप्पू, ए अप्पा ! कुणीकडं निघाला आहेस ? ग्राउंडांत ?– काय असतं रे रोज उठून तिथं ? चल आज बरोबर फिरायला !—पुरे रे बोवा ! असेल बोलावलं मास्तरांनीं ! आहे

---

१ Rotten.

ठाऊक किती ऐकतां तुम्ही ते ! –हॅत् तेच्या ! एवढंच ना ? म....ग रे काय ? चल ये बैस लवकर !—भिकार स्काउटिंग् तें काय ! अन् त्यांत रे काय ऐकायचं त्यांचं !...."

## चिंगी एक महिन्याची झाली नाहीं तोंच

"....काळी का आहे म्हणावं मी ? कशी गोरी गोरी पान आहे !– हो हो ! आतां आमच्या चिंगीला सरी करायची, बिंदल्या करायच्या, झालंच तर वाळे, सांखळ्या, सगळे दागिने करायचे ते ! –कसा छानदार मग परकर नेसायचा, पोलकें घालायचें अन् ठुमकत ठुमकत शाळेंत जायचें नाहीं बाई ? शहाणी होईल बबी माझी ! मोठीं मोठीं बुकं वाचील ! अन् मग महाराज छोनीचं आमच्या लगीन !— खरंच सोने, तुला नवरा काळा हवा कीं गोरा ?– का....ळा ! नको ग बाई ! छबीला माझ्या कसा नक्षत्रा-सारखा, अगदीं चित्रासारखा नवरा मिळेल हों !–अस्सें थाटाचें लगीन करीन, कीं, नांव तें ! आहांत कुठें ! हजार रुपये हुंडा देईन, हजार ! ताशे, वाजंत्री, चौघडा—हो हो तर ! बेंडबाजासुद्धां लावायचा ! वरात पण वरात निघेल म्हणावें ! नळे, चंद्रजोती, झाडें यांचा काय लकूलकाट होईल !– पण खरेंच गडे चिंगे, तूं मग भांडायसवरायची नाहींस ना ? जर का घरांत भांडलीस तर पहा मग ! माणसाला कसं मुठींत ठेवायला हवं बरं का ? संसार पण संसार झाला पाहिजे ! आणि हें बघ, आपलें आधींच सांगून ठेवतें, पहिलें तुझें बाळंतपण कीं नाहीं, इथं व्हायला हवें ! पुढचीं करा हवीं तर खुशाल आपल्या घरीं !—मोठी दैवाची होईल चिंगी माझी ! पुष्कळ मुलं होतील माझ्या बबीला ! ! पण काय ग, तुला मुलं झालेलीं आवडतील, का मुली ?– नको ग बाई, कारट्यांचा मेला तो जंजाळ !– एकापेक्षां एक असे सगळे मुलगे होतील

म्हणावं, मुलगे ! –तसेंच गाडी-घोडे, कपडा-लत्ता, कश्शा कश्शाला म्हणून कांहीं कमी पडायचं नाहीं ! –बरं-बरं ! इतक्यांतच नको कांहीं चढून जायला ! मोठा दिमाख दाखवते आहे मला ! –पहा, पहा ! फुगते आहे पहा कशी !– पण कार्टे बोलं. तर नको माझ्याशीं, कीं, अस्सा हा गालगुच्चा........अग बाई ! ........हें ग काय ! कसें सोन्यासारखें बोलतें आहें, अन् तूं आपली........नाय नाय........उगी, उगी माझी बाय ती !"

## पंत वारले

"........असें काय ! सोड मला ! चिमणे, असें वेड्यासारखें काय करावें ! रडतेस काय ! जा दार लावून घे– घरांत आपला गोपूबाळ निजला आहे ना ? त्याच्याजवळ जाऊन बैस हं ! रडूं नकोस ! जा !– आई आबासाहेबांच्याकडे भात सडायला गेली आहे, ती आतां इतक्यांत येईल ! जाऊं मी ? रडायची नाहींस ना ? भूक लागली आहे, म्हणून कां तूं रडतेस ?–असें काय ! चिमे मी येई-पर्यंत तूं अगदीं गप्प रहा हो ! आईनें दळून ठेविलेलें हें पीठ यमुना-बाईच्या घरीं पोंचवितों, आणि तसाच माधुकरी मागून लवकरच मी परत येतों ! मग माझ्या ताईला भात, वरण, भाकरी....माधुकरी म्हणजे काय ? ताई, माधुकरी मागणें म्हणजे भीक मागणें. हो– लोक आपल्याला भिकारी म्हणतील ? म्हणूं देत ! बाबा देवाच्या घरीं गेले आहेत त्यांनीं देवाला सांगितलें म्हणजे देव आपल्याला श्रीमंत करील !–बाबा केव्हां येतील ? छे, ते आतां कुठले यायला ! हें बघ ताई, तूं बाबांबद्दल पुनः कधीं आईला विचारूं नकोस हो ! ती कीं नाहीं लागलीच रडायला लागते !– कोण, आई ?– केव्हां आलीस ? हें ग काय ?– आई, आई, कां ग एकदम अशी ओक्साबोक्शीं रडायला लागलीस ? मी माधुकरी मागायला जातों म्हणून

होय ? पण आई, तूं नाहीं का ग लोकांचीं भांडीं घाशीत, दळणें दळीत, धुणीं धुवीत, तसेंच मीं—आई, गोपू उठला वाटतें; जा तूं आतां घरांत. मी आज नको जाऊं म्हणतेस ? कां बरें ? ऊन्ह फार पडलें आहे त्यानें माझे पाय फार पोळतील म्हणून ? असूं दे कीं ! मी पळतपळत जाऊन लवकरच परत येतों ! जर आतां मी गेलों नाहीं तर गोपू, चिमी, तूं, मी सगळेजण आपण भूक लागून रडायला नाहीं का लागणार ? मग आपल्याला कोण बरें खाऊं घालील ? आई ! मी आतां जाऊन येतों; सोड मला !—"

## —राव चढले

[ रावांच्या घरीं ]

"....खाऊ ! अरे पेढे आणले आहेत पेढे ! थांबा, थांबा; अशी घाई करूं नका ! सगळ्यांना देतों बरें मी ! आधीं देवाला नैवेद्य दाखवूं ! आणि मग—हो ! हो ! आधीं तुला देईन सोने मी; मग तर झालें ?....पाणी आणलेंस ? शाबास ! हं, सोने, बापू, देवाच्या पाया पडा, आणि म्हणा '–जय देवबापा ! असेच सुखाचे दिवस आम्हांला वरचेवर दाखवीत जा !'—अस्सें ! शाबास ! हं, हे घे सोने तुला चार आणि हे बापू तुला चार—झालें ना आतां ? —कोण आहे ? रामभाऊ ? अरे वाः ! तुम्ही तर अगदीं वेळेवर आलांत बुवा ! हं हे घ्या. —आधीं खा मुकाट्यानें ! मग कारण विचारा ! मला पांच रुपये प्रमोशन झालें–पगार वाढला, त्याचे हे पेढे ! समजलें ? अरे बापू ! आतां हे आंत घेऊन जा ! आणि इकडे बघ, आपल्या त्या गोविंदरावांना, आप्पासाहेब कर्व्यांना, झालेंच तर माडीवरच्यांना, सगळ्यांच्या घरीं आतांच्या आतां जाऊं द्या म्हणावें ! समजलें ना ! नको, नको, मला नको, अहो हपिसांत मीं पुष्कळ खाल्ले आहेत !—मंडळी ऐकेचनात ! तीन रुपयांचे

पेढे घ्यावे लागले मला! —म्हटलें जाऊं द्या! मंडळी आपली आहेत! आणि पुनः असे आनंदाचे प्रसंग वरचेवर थोडेच येत आहेत? —बरें झालें चला! इतके दिवस आशेनें रात्रंदिवस वाट पाहिल्याचें परमेश्वरानें शेवटीं सार्थक केलें! अहो पंधराचे वीस व्हावयाला सहा वर्षें लागलीं—सहा वर्षें! नुकतेच आमचे ते पंत वारले, अन् त्यांची जागा मला मिळाली बरें!— असो, ईश्वराची कृपा होती म्हणून हे दिवस दिसले! —हो! करतां काय? बरें, आपण आतां मुंबईला कधीं जाणार?—रविवारींच ना! मग हरकत नाहीं. कारण मीं परवांच्या दिवशीं श्रीसत्यनारायणाची पूजा करण्याचें योजिलें आहे! तेव्हां म्हणतों, प्रसाद घेऊन मग मुबईला जा!— ठीक आहे! अहो, परमेश्वराची कृपा असली तर उत्तरोत्तर आपल्याला आणखीहि असेच सुखाचे दिवस येतील! काय? म्हणतों तें खरें आहे कीं नाहीं!........"

दिवाकर—शं० का० गर्गे
(रत्नाकर)

### प्रश्न व सूचना

(१) पालक किंवा शिक्षक मुलांना उपदेश करतात एक, व वागतात त्याचे अगदीं उलट, अशा आशयाची एक नाट्यछटा लिहिण्याचा प्रयत्न करा.

(२) मनोराज्य करणाऱ्या शेख महंमदाची इसापनीतींतील गोष्ट तुमच्या परिचयाची आहेच. वर दिलेल्या दुसऱ्या नाट्यछटेचें अनुकरण करून (शेख महमदी वृत्तीच्या एका व्यक्तीवर) एक नाट्यछटा रचा.

(३) दोन परस्परविरुद्ध स्वरूपाच्या गोष्टी एकत्र ठेवल्यामुळें एका विशिष्ट तत्त्वाचा किंवा भावनेचा प्रत्यय येतो हें उदाहरण देऊन स्पष्ट करा.

(४) पुढील शब्दांचे मूळ अर्थ देऊन त्यांस प्राप्त झालेला हल्लींचा अर्थ सांगाः—पंचाईत, मधुकरी, प्रसाद, सार्थक.

(५) [ अ ] 'छानदार' शब्द फारसी शान ( शोभा ) याला 'दार' हा प्रत्यय लागून झाला आहे. 'दार' प्रत्यय लागून झालेले दुसरे ३–४ शब्द सांगा.

[ आ ] 'कपडालत्ता' यांतील 'लत्ता' हा शब्द फारसी असून त्याचा अर्थ चिंधी–धडपा असा आहे. अशा तऱ्हेचीं समाहारद्वंद्वाचीं दुसरीं कांहीं उदाहरणें सांगा.

---

# कहाण्या

[ आपल्या इकडे जुन्या वळणाच्या बायका कहाण्या सांगत-ऐकत असतात. त्यांचें वाङ्मयदृष्ट्या काय महत्त्व आहे व त्यांत किती माधुरी आहे हें प्रो० दत्तो वामन पोतदार यांनीं आपल्या विशिष्ट पद्धतीनें पुढील उताऱ्यांत सांगितलें आहे. ]

जुन्या गद्यवाङ्मयाची याहूनहि एक निराळी परंतु महत्त्वाची शाखा आतां सांगतों. आपल्याकडे अशी समजूत आहे कीं, आपला भगिनीवर्ग आपण अज्ञानांत ठेवला. हा समज सर्वांशीं यथार्थ नाहीं. जुन्या मराठी अमदानींत पुष्कळ स्त्रिया शिकत असत. गोपिकाबाई, राधाबाई, आनंदीबाई वगैरे स्त्रियांचीं तर अस्सल पत्रेंच प्रसिद्ध झालेलीं आहेत. मातुश्री ताराऊसाहेब किंवा जिजाऊसाहेब यांचींहि पत्रें– स्वलिखित नसलीं तरी– उपलब्ध आहेत. त्यांवरून जरी त्यांस अक्षरविद्या अवगत नसली तरी त्या सुविद्य नव्हत्या असें म्हणतां येत नाहीं. याच स्त्रीवर्गानें जुन्या काळीं आमच्या अनक्षर शाहीरांप्रमाणेंच स्वयंस्फूर्तीनें देवादिकांचीं गोड गाणीं रचलेलीं अद्यापिहि पाठांत आहेत. तसेंच उखाणे, म्हणी वगैरेंचा या वर्गानें निर्माण केलेला व जतन केलेला दांडगा संग्रह पाहिला म्हणजे त्यांच्या बुद्धिमत्तेचें व शहाणपणाचें फार कौतुक

वाटतें. आम्ही विद्वत्तेच्या घमेंडींत राहून अद्यापिहि हा म्हणी-उखाण्यांचा बहुमोल संग्रह शोधपूर्वक उकरून त्याचें ऊर्जित करीत नाहीं ही दुःखाची गोष्ट आहे. याच आमच्या स्त्रीवर्गांत कहाण्या म्हणून गोष्टी प्रसिद्ध आहेत. हें कहाण्यांचें वाङ्मय मराठींत फार नामीपैकीं आहे. वाङ्मयदृष्टीनें अद्यापि कोणीहि तिकडे लक्ष्य पुरविल्याचें आढळलें नाहीं. कहाण्यातील सोपी, सरळ, रसाळ व शुद्ध मराठी भाषा वाचून फार आनंद वाटतो. त्यांतील नीत्युपदेश फारच मार्मिक आहे. तेव्हां या नवीन शाखेचाहि समावेश प्राचीन मराठी गद्यांत अग्रेसरत्वानें करणें अगत्याचें आहे. मला तर कैक वेळां असें वाटतें कीं, या कहाण्या म्हणजे मराठी उपनिषदेंच होत. अशी यांची अव्याजमनोहरता व माधुरी अलौकिक आहे. नमुन्यासाठीं एकच लहानी कहाणी देतों:—

## कहाणी धरित्रीची

ऐका, परमेश्वरा! धरित्रीमाय! तुझी कहाणी. आटपाट नगर होतं; नगरांत एक ब्राह्मण होता. त्या ब्राह्मणाची स्त्री काय करी? धरित्रीमायेचें चिंतन करी, वंदन करी, 'धरित्रीमाय, तूं च थोर, तूं च समर्थ, कांकणलेल्या लेकी दे, मुसळकांड्या दासी दे, नारायणासारखे पांच पुत्र दे, दोघी कन्या दे; कुसुंबीच्या फुलासारखें स्थळ दे.' हा वसा कधीं घ्यावा? आखाड्या दशमीस घ्यावा, कार्तिक्या दशमीस संपूर्ण करावा; किंवा श्रावणी तृतीयेला घ्यावा, माघी तृतीयेला संपूर्ण करावा. सहा रेघांचा चंद्र काढावा, सहा रेघांचा सूर्य काढावा, सहा गाईचीं पावलें काढावीं व त्यांची रोज पूजा करावी. संपूर्णाला काय करावं? वाढा-

घरची सून जेऊं सांगावी; कोरा करा, पांढरा दोरा, चोळीपोळीचं वाण द्यावं; आणि आपल्या वशाचं उद्यापन करावं. ही धरित्रीमायेची कहाणी साठा उत्तरांची पांचां उत्तरीं सुफळ संपूर्ण !!

(वैद्यकृत कहाण्या, भाग १ ला, पृ. ३३, निर्णयसागर.)

किती गोड भाषा ! केवढा साधेपणा ! पृथ्वीपूजेची कल्पना केवढी उदात्त ! भूमातेच्या सेवेचें पथ्य बाळकडू !! हें वाचून अथर्वातल्या पृथ्वीसूक्ताची आठवण कां होऊं नये ?

या कहाणींतील शब्दांचीं रूपें अर्वाचीनलेलीं आहेत यांत संशय नाहीं. या कहाण्या जुन्या आहेत. परंपरेनें आपल्या देवघरांतून, शेजघरांतून, माजघरांतून, व सैंपाकघरांतून स्वच्छंदपपणें वावरलेल्या आहेत ! त्यांचा वेष जरी आपल्या सहवासानें बदलला असला, तरी त्यांच्या शब्दरूपांच्या आंतून जिव्हाळ्याचा शुद्ध मधुर 'शब्द' कानीं येतो व तें त्यांचें अंतःस्वरूप पाहतां हें 'जुनें ठेवणें' असून 'मी'पणानें आपणांस आकळलें नाहीं असें निभ्रान्त मनांत येतें.

द० वा० पोतदार

(मराठी गद्याचा इंग्रजी अवतार)

### प्रश्न व सूचना

(१) कहाण्यांचें एकादें पुस्तक वाचून त्यांतील एकादी कहाणी त्या भाषेचें अनुकरण करून सांगण्याचा प्रयत्न करा.

(२) [अ] पुढील शब्दांचे अर्थ देऊन त्यांचा वाक्यांत उपयोग करा. घमेंड, ऊर्जित, वसा घेणें, निभ्रान्त, उद्यापन, आटपाट, वाढाघरची सून.

[आ] पुढील समासांचा विग्रह करून अर्थ सांगाः—अव्याजमनोहर, अग्रेसर, अनक्षर, शेजघर, माजघर, बाळकडू, मुसळकांडी.

(३) [अ] 'चोळीपोळी करा' म्हणजे काय? 'कहाणी' शब्दाची व्युत्पत्ति सांगा.

[आ] 'मला तर कैक वेळां असें वाटतें कीं, या कहाण्या म्हणजे मराठी उपनिषदेंच होत, अशी यांची अव्याजमनोहरता व माधुरी अलौकिक आहे.' या वाक्याचें स्पष्टीकरण करा.

(४) कांकणलेल्या लेकी दे, मुसळकांड्या दासी दे, नारायणासारखे पांच पुत्र दे, वगैरे वाक्यांतील क्रियापदांची पुनरावृत्ति तुम्हांला सदोष वाटते का निर्दोष वाटते हें कारणें देऊन सांगा.

---

# पश्चात्तप्त भिक्षु

[सदरहू गोष्ट प्रो० चिं० वि० जोशी यांच्या 'संशयाचें जाळें व आणखी कांहीं गोष्टी' या पुस्तकांतून घेतली आहे. रा० जोशी हे विनोदी व गंभीर अशा दोन्ही पद्धतींनीं लिहिणाऱ्या नांवाजलेल्या लेखकांपैकीं आहेत. त्यांच्या विनोदाची एक विशिष्ट तऱ्हा असून त्याचाहि नमुना या पुस्तकांत अंतर्भूत करण्याची इच्छा होती, परंतु स्थलाभावामुळें तसें करतां आलें नाहीं.

या गोष्टींत विद्वत्त्वाच्या जोडीला सद्भावनांची वाढ कशी आवश्यक आहे हें बुद्धकालीन कल्पनांच्या वातावरणांत वाचकांस नेऊन चांगल्या रीतीनें दाखविलें आहे.]

त्या तरुण भिक्षूनें कोरण्डक येथील मोठ्या विहारांतील आपलें अध्ययन उत्तम प्रकारें तडीस नेल्यावर पुढील कर्तृत्वाच्या आशेनें त्याचें अंतःकरण प्रफुल्लित होऊन गेलें होतें. आपल्या आचार्यांनीं व उपाध्यायांनीं वारंवार केलेल्या प्रशंसेमुळें तो गर्वानें फुगून गेला होता आणि हा त्याचा गर्व अनाठायीं होता असें मुळींच म्हणतां येत नाहीं. पाली भाषेंतील सुत्त, विनय आणि अभिधम्म या

तिन्हीं पिटकांचा अट्ठकथांसह पूर्ण अभ्यास करून संस्कृत महायान या वाङ्मयावर सुद्धां त्यानें प्रभुत्व संपादन केलें होतें. आपल्या सहाध्यायांवर तर राहोच, पण गुरूंवर देखील त्यानें विद्येंत ताण केली होती. कितीएक विद्वान् म्हणून नांवाजलेल्या वैदिक ब्राह्मणांचा वादांत पराभव करून त्यानें त्यांस काषाय वस्त्रांचा अंगीकार करण्यास लाविलें होतें. आत्मा नित्य आहे कीं अनित्य, ईश्वर आहे कीं नाहीं, असल्या बौद्धांच्या मतें निरर्थक वादांत पडून वहावत जाणाऱ्या, किंवा आत्मदंडन करून आयुष्य व्यर्थ घालविणाऱ्या अनेक परिव्राजकांस सदुपदेशरूपी हात देऊन त्यानें वांचविलें होतें; उलटपक्षीं ऐहिक विषयकर्दमांत लोळणाऱ्या श्रीमंत कुलपुत्रांसही त्यानें 'उपासक' बनविलें होतें. यामुळें गुरूंचा त्याच्यावर अतिशय लोभ जडला. सहाध्यायांस त्याचें परम कौतुक वाटूं लागलें.

अध्ययन पूर्ण झाल्यावर त्यास 'थेरे'[२] (स्थविर) ही पदवी देण्यांत आली. तो परत आपल्या गांवीं जाण्यास निघाला तेव्हां कोरण्डक विहारांतील सर्व भिक्षुसंघ त्याला निरोप देण्यासाठीं एकत्र जमला. सर्वांचे कंठ वियोगदुःखानें दाटून आले होते, पण त्याचा

---

१ 'त्रिपिटक' अथवा 'तिपिटक' हा पाली भाषेंतील ग्रंथ असून त्यांत बुद्धाच्या तोंडचीं वचनें व भाषणें दिलीं आहेत. (पिटक=पेटी.) 'विनय' पिटकामध्यें संघाचे नियम दिले आहेत. त्यांत भिक्षुभिक्षुणी यांच्या दिनक्रमाबद्दल व आचारांबद्दल नियम दिले आहेत. 'अभिधम्म' पिटकांत नीतितत्त्वांचा मानसशास्त्रदृष्ट्या विचार केला आहे. 'सुत्त' (सूत्र) पिटकामध्यें धम्म (धर्म) या विषयावर विवरणात्मक वाक्यें आहेत. सुत्त पिटकांत ५ निकाय म्हणजे सूत्रसंग्रह आहेत.

२ मराठी 'थेरडा' शब्द यापासूनच आला आहे.

मात्र अभिमानानें ताठला होता. इतके दिवस ज्यांच्या सहवासांत आपण आनंदांत काढिले ते गुरु व मित्र, आणि ते ज्या ठिकाणीं काढिले तो विहार यांस सोडून जातांना त्याच्या नेत्रांतून अश्रूंचा एक सुद्धां बिंदु गळाला नाहीं. त्याचें वय लहानच होतें. त्यांत त्याचा अतुल्य गौरव झाला; मग त्यास विनय कोठून येणार? पुष्कळ दिवस जगाच्या मोकळ्या पटांगणांत घालवून आपल्यापेक्षां अधिक श्रेष्ठ मनुष्याचें दर्शन झाल्याशिवाय स्वतःची खरी किंमत कळत नाहीं; व तसें होईपर्यंत हृदय आपला दरवाजा उघडून विनयाला आंत प्रवेश करूं देत नाहीं.

"माझ्या प्रिय अंतेवासिका," त्याचे आचार्य त्यास निरोप देतांना उपदेशूं लागले, "छे! माझ्या मित्रा! कारण विद्येत तूं आमच्यावर कडी केली असतां तुला अंतेवासिक तरी कसें म्हणावें? तुला उपदेश करण्याची आमची पात्रता नाहीं, तरी कर्तव्य म्हणूनच चार शब्द सांगतों ते ऐकून घे. तुला पुष्कळ ज्ञान प्राप्त झालें आहे; भगवान् गौतमाच्या धर्माचें सार तुला हस्तगत झालें आहे; तुझें अंतःकरण सद्धर्माचा लाभ अज्ञ जनांस करून देण्याच्या इच्छेनें व्यापलें पाहिजे. तुझ्या आचार्य-उपाध्यायांची तुझ्यावर पूर्ण कृपा आहे, तुझ्या सहाध्यायांचें तुझ्या ठिकाणीं पूर्ण प्रेम आहे. ज्या उपासकांच्या घरीं तूं गोचरासाठीं[1] जात होतास त्यांना तुझे ठायीं उत्कट आदर आहे. भगवंताच्या कृपेचें व पूर्वजन्मीच्या सत्कर्माचें हें फळ आहे. याचा दुरुपयोग न होईल असें वर्तन ठेव. स्वतःच्या गौरवाकडे याचा विनियोग न करतां बुद्ध, धर्म आणि संघ यांच्या कार्याकडे याचा व्यय कर. धर्मदेशकाचें कार्य सर्व कामांत अधिक अवघड असतें हें नीट लक्षांत ठेव. सांगतों हें वाक्य लोकांशीं

१ आश्रयाकरितां.

व्यवहार करतांना ध्यानांत ठेवून त्याप्रमाणें आचरण ठेव. 'वेळू-प्रमाणें नम्र हो, शालवृक्षाप्रमाणें ताठ नकोस.' जे तुझा अपमान करतील त्यांचा प्रतिकार करण्याची इच्छा धरूं नकोस. या नियमानें तूं वागशील तर तो तुला नक्षत्राप्रमाणें मार्गदर्शक होईल."

तरुण थेराच्या मनावर त्या वेळीं हा बोध कितपत ठसला तें सांगवत नाहीं. केवळ लोकोपचारार्थ गुरुजनांस अभिवादन करून च सहाध्यायांचा तुटक शब्दांनीं निरोप घेऊन तो आपल्या गांवा-कडे निघाला. भिक्षूंस घालून दिलेल्या नियमाप्रमाणें त्याच्याजवळ त्याची वळकटी, भिक्षापात्र व औषधादि वस्तु ठेवण्याचें गाठोडें यांशियाय कांहींहि नव्हतें. युद्धांत जय मिळून गजारूढ होऊन पुढें-मागें सेवकजनांनीं वेष्टिलेल्या व राजधानीकडे परत येणाऱ्या राजाप्रमाणें त्याला विजयमद चढला होता. आपली कीर्ति किती वेळां तरी गांवापर्यंत पोंचली असेल. आपण गेल्याबरोबर आपला केवढा सत्कार होईल, नंदग्रामांतील एक ग्रामवासी तीन पिटकांत प्रवीण झाला आणि त्यानें पाखांड्यांस वादांत जिंकिलें म्हणून त्यांना किती अभिमान वाटत असेल, या कल्पनांत तो गर्क झाला होता.

प्रातःकाळची ती रम्य वेळ त्याच्या आत्मगौरवयुक्त कल्पनांस उत्तेजित करणारीच होती. रक्तवर्णाचें अर्धवट उगवलेलें सूर्यबिंब पाहून आपण कालांतरानें या सूर्याप्रमाणेंच तेजस्वी व प्रतापी होऊं आणि वैदिकधर्मानुयायी निशाचरांस चंडआतपानें गिरिकंदरांचा आश्रय घ्यावयास लावूं असा स्वपराक्रमजनित दृढ विश्वास त्याला उत्पन्न झाला. वृक्षलता आपले नूतन पल्लव आंदोलित करून, पक्षी आपलें मधुर गायन करून आपल्यासारख्या ज्ञानी भिक्षूचें स्वागत करीत आहेत असा त्याला भास झाला. परंतु वृक्षलता आणि पक्षी

१ आसण्याचें झाड.

हीं आपल्यासारखीं उद्दाम नसून गरीब-श्रीमंत, अविद्वान्-विद्वान्, वृद्ध-तरुण या सर्वांचें सारख्याच आदरानें व प्रेमानें स्वागत करतात हा विचार त्याला शिवला देखील नाहीं. त्या वेळच्या सृष्टिवैभवानें त्याचा ज्ञानमद अधिक चढला. सर्व नंदग्रामांत, राष्ट्रिक देशांत, जंबुद्वीपांतच काय, पण यवन-कंबोजादिक म्लेंच्छ राष्ट्रांत सुद्धां आपला लौकिक पसरेल, अलिकसुंदर, अंतियोक, मिलिंद यांसारखे परकी राजे आपल्या उपदेशामृतानें स्वतःस धन्य मानतील, आणि मांडलिकांच्या मुकुटांच्या घर्षणानें पायांस घट्टे पडलेले सार्वभौम आपल्या चरणांशीं अभिवादन करतील; चीन-श्यांम[1] आदि देशांतील यात्रेकरी शंकासमाधानार्थ—

"भवान्, भवान्" त्याच्या सुखस्वप्नाचा उद्धटपणानें भंग करणारा कोणाचासा आवाज ऐकूं आला.

त्यानें रागानें वळून पाहिलें. सर्वांच्या आदरास पात्र असणाऱ्या तरुण त्रिपिटकधर आगमनिगमसंपन्न[2] स्थविराच्या सुखस्वप्नाच्या सुवर्णमय सूत्राचा भंग करणारा कोण हा उद्धट माणूस? भिक्षूच्या 'समाधीं'त व्यत्यय आणणें हा केवढा घोर अपराध!

तो रस्त्याच्या कडेशीं बसणारा, हातापायांचीं बोटें तुटलेला, नाक गळून पडलेला, विद्रूप चेहऱ्याचा महारोगी होता. आपल्या हांकेसरशीं या प्रख्यात भिक्षूनें आपल्याकडे निदान दृष्टिक्षेप तरी केला हें पाहून त्यास आनंद झाला, व आपले बोटतुटके पंजे जोडून गेंगाण्या आवाजानें त्यानें पुनः 'भवान्' हा शब्द उच्चारला. जो तो या महारोग्याचा तिरस्कार करीत असे. त्याच्या वाऱ्यासहि उभे राहण्याची कोणाची तयारी नव्हती. परंतु आपल्या तरुण

१ सयाम. २ विद्या व वेद.

स्थविराचे पुढें दिलेले शब्द ऐकतांच त्यास जो राग व आवेश आला त्याचें वर्णन कोण करील ?

भिक्षु म्हणाला, " काय रे रोगिष्टा ! तुझ्या गांवचे सगळेच लोक असे घाणेरडे न् पांगळे आहेत काय ? अरेरे ! तुझें दर्शन या सकाळच्या प्रहरीं झालें हें मोठें अमंगळ झालें !"

यःकश्चित् भिक्षा मागून निर्वाह करणारा, केवळ तीन वस्त्रें आणि एका पात्राचा धनी आपला तिरस्कार करतो हें पाहून त्या महारोग्याचा त्वेष अनावर झाला. " जा मुंडका ! " तो ओरडला, " ज्या परमेश्वरावर तुम्ही विश्वास ठेवीत नाहीं त्यानेंच मला महारोगी केलं, त्याला दोष दे. चालता हो ! " असें बोलून अर्धवट खांचा झालेल्या आपल्या डोळ्यांतील अश्रु तो तुटक्या हातानें पुसूं लागला.

त्याची ती दीन मूर्ति पाहून भिक्षूचें हृदय द्रवूं लागलें. आपल्या आचार्यांनीं शेवटीं केलेल्या उपदेशाची आठवण होऊन तोच उपदेश दसपट शक्तीनें त्याच्या स्मृतिपटलावर येऊन ठसला. आचार्यांनीं आपल्याला वेळूप्रमाणें नम्र होण्यास सांगितलें. आपण त्या उपदेशाप्रमाणें वर्तन केलें काय ? नसेल तर त्या उपदेशाचा उपयोग काय ? आपण संपादलेल्या ज्ञानाचा, भगवान् बुद्धाच्या अनुयायित्वाचा आपण अवमान केला नाहीं काय ? नाशवंत शरीराच्या कुरूपतेमुळें ज्या पवित्र आत्म्याचा आपण धिक्कार केला त्या आत्म्यापुढें आपल्या आकुंचित ज्ञानाची थोरवी काय आहे ? आपल्या देहाच्या आंतील भाग या महारोग्याच्या बाह्य देहभागापेक्षां देखील अधिक दुर्गंधियुक्त आहे हें आपण 'कायगता स्मृती'चें अध्ययन करितांना शिकलों असून केवळ शरीराच्या बाह्य कुरूपतेमुळें यास आपण कां दुखविलें ? या विचारांनीं तरुण

भिक्षूच्या अंतःकरणास वृश्चिकदंशाच्या वेदना होऊं लागल्या. ज्या विस्तृत ज्ञानानें त्याच्या डोळ्यांवर अभिमानाचें झांपड पसरलें होतें त्यांच ज्ञानशलाकेनें त्यांत पश्चात्तापाचें अंजन घातलें. त्यानें महारोग्यास साष्टांग दंडवत घातला आणि आपणांस क्षमा करण्याविषयीं परोपरीनें त्याची विनवणी करूं लागला.

" तात, माझ्या हातून उतावळेपणा झाला, माझ्या उद्धट भाषणाची क्षमा कर. मीं तुझा अपराध केला आहे, पण त्याकरितां क्षमेची याचना करितों," तो म्हणाला. परंतु महारोग्याच्या मनांतील क्रोधाग्नि इतक्या थोड्या अश्रुबिंदूंनीं विझणारा नव्हता. लोकांच्या शिव्यांचे व निंदेचे वर्षाव वारंवार सहन कर-करून त्याच्या मनांतलि दुःख व त्वेष अनिवार झालीं होतीं. ज्याच्याशीं कोणीहि आजपर्यंत नम्रतेनें वागत नव्हतें व धडपणें बोलत देखील नव्हतें, त्याला आपल्यापुढें दंडवत घालणारा एक असामान्य भिक्षु पाहून त्याच्यावरच सर्व त्वेषाचें उट्टें काढावें असें वाटल्यास त्यांत नवल नाहीं. तो ओरडून पुन्हा म्हणाला, " जा, चालता हो. माझ्या पंगूपणाबद्दल माझी चेष्टा करूं नको, ईश्वराची चेष्टा कर. त्याला हांस, कदाचित् त्याच्यापेक्षां तूं जास्त कुशल कर्मकार असशील ! "

ईश्वराचें नांव काढल्याबरोबर अंगाचा तिळपापड उडणारा व ईश्वराचें अस्तित्व खंडन करणारा आपला तरुण भिक्षु या वेळीं इतका गहिंवरला कीं, ईश्वर हा शब्द दोनदां ऐकूनहि त्यानें त्याचें अज्ञेयत्व सिद्ध करण्याचा यत्न केला नाहीं. महारोगी आपल्या जागेवरून उठून भिक्षेकरितां गांवाकडे जाऊं लागला. त्याच्या मागून क्षमेची याचना करणारा, काकुळतीस आलेला तो भिक्षु चालूं लागला. प्रत्येक पावलागणिक त्याचा अहंभाव गळत चालला

होता. गुरूचा शेवटचा उपदेश जर आपल्या कृतींत उतरला नाहीं, तर आपल्या विद्येचा आणि जन्माचा तरी काय उपयोग ?

कोरंडक विहारांत वर्षानुवर्ष ग्रंथकीटक[1] होऊन जें ज्ञान त्यानें संपादिलें होतें त्याच्या दसपट ज्ञान जगाच्या उघडचा ग्रंथांतील एकाच धडयानें त्यास मिळालें. त्याच्या शुष्क धर्मज्ञानावर अश्रुबिंदु पडून तें प्रेमार्द्र झालें होतें. स्वतःच्या गौरवापेक्षां इतरांच्या अंतः-करणप्रवृत्तींचा मान त्याला जास्त मोलाचा वाटूं लागला होता. पुस्तकांचा अभ्यास हें आपलें ध्येय नसून मनुष्यांचा अभ्यास हेंच ध्येय आहे याची जाणीव त्याला झालेली होती.

चिं० वि० जोशी

( संशयाचें जाळें व इतर गोष्टी )

**प्रश्न व सूचना**

( १ ) भिक्षु अध्ययन संपवून आपल्या गांवाकडे जाण्यास निघाला असतां त्याच्या गुरूनें केलेल्या उपदेशाचा चाळीस ओळींपर्यंत विस्तार करा.

( २ ) महारोग्यानें निर्भर्त्सना केल्यामुळें भिक्षूच्या मनांत झालेली क्रांति कितपत स्वाभाविक आहे ?

( ३ ) पुढील वाक्यांचा अर्थ सांगाः—

[अ] "पुष्कळ दिवस जगाच्या मोकळ्या पटांगणांत घालवून आपल्यापेक्षां अधिक श्रेष्ठ मनुष्याचें दर्शन झाल्याशिवाय स्वतःची खरी किंमत कळत नाहीं, व तसें होईपर्यंत हृदय आपला दरवाजा उघडून विनयाला आंत प्रवेश करूं देत नाहीं."

[आ] "वैदिक धर्मानुयायी निशाचरांस चंड आतपानें गिरि-कंदरांचा आश्रय घ्यावयास लावूं असा स्वपराक्रमजनित दृढ-विश्वास त्याला उत्पन्न झाला."

---

१ Bookworm चें भाषांतर.

(४) [अ] पुढील शब्दांवर व्याकरणात्मक टीपा द्याः—निशाचर, अनाठायीं, विद्रूप, विषयकर्दम, अंतेवासी, यःकश्चित्.

[आ] 'वर ताण करणें' व 'हात देणें' या वाक्प्रचारांचा वाक्यांत उपयोग करून अर्थ सांगा.

(५) [अ] द्वंद्व समासांत लहान व आटोपशीर शब्द बहुधा आधीं घालतात. असें असून पान २७८ मध्यें 'गरीब-श्रीमंत', 'अविद्वान्-विद्वान्', 'वृद्ध-तरुण' या जोड्यांपैकीं दुसऱ्या जोडींत हा नियम कां पाळला गेलेला नाहीं ?

[आ] अलंकार ओळखा. (१) ज्ञान-शलाकेनें पश्चात्तापाचें अंजन घातलें. (२) आचार्यांनीं आपल्याला वेळूप्रमाणें नम्र होण्यास सांगितलें. (३) गुरूचा शेवटचा उपदेश जर आपल्या कृतींत उतरला नाहीं तर आपल्या विद्येचा आणि जन्माचा तरी काय उपयोग ?

(६) "पुस्तकांचा अभ्यास हें आपलें ध्येय नसून मनुष्यांचा अभ्यास हेंच ध्येय आहे." ह्या वाक्यांतील कल्पनेचा १० ओळींपर्यंत विस्तार करा.

---

## बेगम दिलआरा[1]

[श्री० सौ० आनंदीबाई शिर्के यांनीं 'कथाकुंज' नांवाचें एक गोष्टींचें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे त्यांतून पुढील गोष्ट घेतली आहे. ती वाचकांना चमत्कृतिपूर्ण वाटेल यांत शंका नाहीं. निरीक्षणशक्ति व मार्मिकपणा हे गुण असल्यास विद्यालयीन उच्च शिक्षणाच्या अभावीं देखील चांगल्या गोष्टी लिहितां येणें कसें शक्य असतें हें सौ० शिर्के यांच्या या गोष्टीवरून ( व पुढें येणाऱ्या रा० य. गो. जोशी यांच्या 'सुपारी' या गोष्टीवरून ) दिसून येईल.]

---

१ दिल + आला = सर्वश्रेष्ठ.

वसंतऋतूंतील एका सायंकाळच्या वेळीं सूर्याचीं सौम्य किरणें शहरांतील मुख्य मशिदीच्या घुमटावर पडल्यामुळें त्यावरील सुवर्ण कळस चमकत होता. शहरांतील मुख्य रस्ते, तसेंच दिवाणाच्या महालापासून तों थेट मुख्य मशिदीपर्यंतचा रस्ता ध्वजापताकांनीं शृंगारला होता. दुतर्फा हातांत नंग्या तरवारी घेऊन घोडेस्वार उभे होते. सदर रस्त्यावरून इतर कोणाहि पथिकास जाण्यास ते घोडेस्वार मज्जाव करीत. कारण त्या रस्त्यानें दिवाणसाहेबांच्या बेगमेची स्वारी आपल्या कन्येसह निमाज पढण्यास्तव मशिदींत जाणार होती. दिवाणकन्या दिलआरा हिचा विवाह नबाबसाहेबांबरोबर होण्याचें निश्चित झालें होतें. परंतु मध्यंतरीं नबाब फार आजारी झाल्यामुळें हा विवाह लांबणीवर पडला होता. जर वरील अडथळा न येता तर दिलआरा ही नबाबसाहेबांची बेगम या नात्यानें आज मशिदींत गेली असती. तथापि ईश्वरानें खैर[1] करून नबाबसाहेबांचा पुनर्जन्म केला ही कांहीं थोड्या आनंदाची गोष्ट नव्हे. त्यांचें प्रकृतिमान दिवसेंदिवस सुधरूं लागलें.



सौ० आनंदीबाई शिर्के

वर ज्या दिवसाच्या संध्याकाळचा उल्लेख केला आहे, त्या दिवशीं सकाळीं तर गांवाबाहेरील पहाडी बंगल्याच्या चांदणीवर[2] बसून स्वतः नबाबसाहेबांनीं हकीमांना पारितोषकें दिलीं होतीं. गांवांतहि कोठीसमोर गरिबांना खैरात वांटली जात होती. याप्रमाणें

---

१ कृपा. २ गच्चीवर.

नगरांत आनंदोत्सवाची गर्दी चालली होती. नबाबसाहेबांना आराम वाटला म्हणून बेगमेची स्वारी आपल्या कन्येसह मुख्य मशिदींत अल्लाचें शुक्रगुजारण्यास्तव[1] चालली होती. पौरजन, स्त्रिया —कोणी खिडकींतून, कोणी चांदणीवरून— आपल्या भावी राज्ञीच्या व तिच्या आईच्या आच्छादित पालख्यांवर पुष्पवृष्टि करीत होत्या.

अशा थाटानें ही स्वारी मिरवत मिरवत नदीच्या कांठानें चालली असतां एक भिकारीण मलीन वस्त्र नेसलेली, हातांत तशीच एक मोडकीशी सारंगी घेऊन शिपायांच्या भीतीनें झपझप पावलें टाकीत मुख्य मशिदीकडे चालली होती. स्वारीला मागें टाकून ती थोड्याच वेळांत मुख्य मशिदीजवळ येऊन उभी राहिली. शिपायांनीं विचारपूस केली नाहीं, इच्छित स्थळीं पोंचणें बिनधोक पार पडलें, याबद्दल तिला फार आनंद झाला. तिचें मलीन मुख क्षणभर विलक्षण तेजस्वी बनलें. वेडी बिचारी, तिला वाटलें, वाटेंत कोणी अडथळा करणार नाहीं! या आनंदाच्या भरांत मशिदीच्या पायरीवर पाय ठेवतांच एक स्वार कर्कश स्वरांत ओरडला.

" ए, बाजू. येथें काय आहे ? कोठींत खैरात वांटतात तिकडे जा."

" शिपाईदादा ! मी गरीब भिकारीण चालून चालून फार थकलें आहें. इथंच उभं राहूं द्याल तर मला गरिबाला स्वारीचं दर्शनहि होईल, नी बेगमसाहेब जी खैरात वांटतील तीहि मला मिळेल. माझीं पोरंबाळं दुवा देतिल."

" होय तर ! तुझ्या पोरांच्या दुव्यानें आम्ही निहाल होऊं ! " तुच्छतेनें शिपाई म्हणाला, " चल जा येथून."

" नका हो असं म्हणूं शिपाईदादा." दीनवदनानें भिकारीण म्हणाली, " मला इथं राहूं द्याल तर गरिबावर फार उपकार होतील.

---

१ आभारप्रदर्शन. (शुक्रगुजार = आभारी, कृतज्ञ.)

त्यांची फेड तर माझ्या हातून काय होणार ? परंतु आपणांस आवडेल तर एक दोन गाणीं या सारंगीवर म्हणून दाखवीन दादा ! ”

“ तुला गातां येतें काय ? अच्छा ! त्या कोंपऱ्यांत उभी रहा. स्वारी गेल्यावर ऐकूं तुझें गायन.”

गाण्याच्या आमिषानें शिपायानें तिची विनंति मान्य करून तिला एका कोंपऱ्यांत उभें राहण्यास परवानगी दिली. इतक्यांत चोपदार पुकारला. स्वारी येऊन थडकल्याची सूचना झाली. स्वार, शिपाई आपापल्या जागीं मस्तक नम्र करून उभे राहिले होते. स्त्रीशिपायांनीं पालख्या आंत नेल्या. ह्या योग्य संधीचा लाभ भिकारणीनें घेतला. इतर दासींबरोबर तीहि आंत शिरली. तिला मज्जाव करण्यास शिपाई तेथें नव्हते. स्वारी येतांच ते बाहेर रांगेनें उभे राहिले होते म्हणून भिकारणीचा आंत सहज प्रवेश झाला.

प्रार्थना वगैरे झाल्यावर सर्व स्त्रीवृंद स्वच्छंदानें बागेंत फिरूं लागला. दिलआराहि आईचा हात आपल्या दोन्ही हातांत घेऊन कारंज्याभोंवतीं फिरत होती. रुप्याप्रमाणें चकाकणारी तिची ओढणी सूर्याच्या सोनेरी किरणांत विशेष खुलत होती. तिचे मोकळे केश वाऱ्यानें भुरभुर उडत होते, व केसांचीं कांहीं कुरळें विशाल भालप्रदेशावर येऊन धनुष्याकार भृकुटींशीं स्पर्धा करीत होतीं. वरील सुंदर देखावा ती भिकारीण एका झाडाआडून पहात होती. तिचा फिक्कट चेहराहि क्षणभर आनंदानें प्रफुल्ल झाला. अमीर-उमरावांच्या स्त्रियांस तेथेंच सोडून मायलेकी दोघीजणी फिरत फिरत भिकारीण उभी होती तेथें सहज आल्या. आपल्या भावी राज्ञीपुढें गुडघे टेकून व दोन्ही हात जोडून भिकारणीनें मस्तक नम्र केलें. बोलण्याचाहि तिनें प्रयत्न केला. तथापि तो सफल झाला नाहीं. कांहीं अस्फुट शब्द तिच्या ओठांत उद्भवले व तेथेंच विराम पावले. तिची ती

दीनवाणी स्थिति पाहून बेगमसाहेबांनीं एक मोहोर तीस बक्षिस देण्याविषयीं दासीस हुकूम केला. "आई, तिला गातां येतं वाटतं; ती बघ तिच्याजवळ सारंगी आहे ती. अमिने, तिला गायला सांग." अमिनेनें सांगण्यापूर्वीच दिलआरेचे हळू उच्चारिलेले शब्द भिकारणीस ऐकूं आले. हातांत सारंगी घेऊन, ती खुंट्या पिळून सूर बसवूं लागली. सूर बसविल्यावर गोड आवाजानें भिकारीण गाऊं लागली. सारंगीच्या सुराबरोबर तिचा आवाज मिळून गेला. सर्व स्त्रीवृंद तिच्याभोंवतीं भ्रमरांप्रमाणें जमला. सर्वांच्या चित्तवृत्ति तल्लीन झाल्या होत्या. कारण भिकारीण गायनकलेंत बरीच कुशल वाटली. हां हां म्हणतां तिची वाटी मोहोरांनीं भरून गेली. सूर्यास्त होण्याची वेळ झाली होती. बेगमसाहेबांनीं जाण्याविषयीं गोष्ट काढली. पण कोणासहि जावेंसें वाटेना. आणखी एक गाणें ऐकल्यावर जावें असें सर्वानुमतें ठरलें. भिकारीण थकली होती. मोठ्याशा गाण्याच्या भरीस न पडतां स्वर बदलून खालील दोन ओळी उच्च स्वरांत आळवून आळवून पुनः पुनः ती म्हणूं लागली:—

दशा अब क्या हुई मेरी,
करम की है गती न्यारी । दशा अब०

गायनश्रवणानें उल्हसित झालेल्या सर्वजणी जाण्यास उठल्या. दिलआरेशिवाय सर्वांच्या मुखावर मूर्तिमंत आनंद विलसत होता. अद्यापपर्यंत आनंदांत भाग घेणारी दिलआरा मात्र शेवटच्या दोन ओळी ऐकून अगदीं कावरीबावरी झाली होती. तथापि तिची ही स्थिति कोणाच्याही लक्षांत आली नाहीं. भिकारणीस यथाशक्ति बक्षिस देऊन सर्वजणी आनंदांत निमग्न होत्सात्या जावयास उठल्या.

"चल बेटा ! संध्याकाळ झाली." तिचा हात धरून उठतां उठतां बेगमसाहेब म्हणाल्या.

"आई! आतां चांदणं पडेल. इथं चांदण्यांत थोडा वेळ बसावं असं माझ्या मनांत आहे." मनस्ताप दाबण्याचा प्रयत्न करीत दिलआरा म्हणाली.

"बरं आहे. महालांत सरदारणी-मानकरणींना पानगुलाब दिले पाहिजेत म्हणून मी जातें. तूं ये मागाहून. अमीना! रोषन! संभाळून आणा हो माझ्या लाडकीला."

असें सांगून बेगमसाहेब पालखींत बसल्या. इतर अमीरउमरावांच्या स्त्रिया आपआपल्या मेण्यांत बसल्या. कांहीं दासी व थोडे निवडक स्वार यांशिवाय बाकी लवाजम्यानिशीं बेगमसाहेबांची स्वारी पुढें झाली.

दिलआरेचा दासीवर्ग म्हणजे प्रौढ मुलीच होत्या. त्यांत पोक्त असें कोणी नव्हतें. त्या एके ठिकाणीं जमून गाऊं लागल्या. जरा एकीकडे अमीना व रोषन यांच्यासह दिलआरा बसली होती, व तिच्या पायांजवळ भिकारीण बसली होती. यःकश्चित् भिकारीण, परंतु तिच्याकडे पाहण्याची दिलआरेस छाती होईना. तिनें खालीं मान घातली होती. कांहीं वेळानें जवळच्या दोघी दासींना मोगऱ्याच्या कळ्या तोडून त्या उमलल्यावर हार करून आणावयास तिनें पाठवून दिलें. त्यांनाहि तेंच पाहिजे होतें. आपल्या मैत्रिणींना गातांना-खेळतांना पाहून त्यांनाहि खेळावयास जावेंसें वाटे. परंतु बेगमसाहेबांनीं दिलआरेस संभाळण्याविषयीं बजावल्यामुळें निरुपाय होता. परंतु दिलची आज्ञा होतांच त्या तेव्हांच गेल्या व भिकारणीसह दिलआरा एकटी राहिली. तिला नखशिखान्त कंप भरला होता. बोलण्याचा प्रयत्न करीत असतां त्यांत तिला यश येईना. भिकारणीची स्थितीहि अशीच झाली होती. सारंगी बाजूला ठेवून आपल्या दोन्ही हातांचें स्वस्तिक बनवून तें तिनें आपल्या धडधड-

णाऱ्या छातीवर ठेविलें होतें व हळूहळू तिच्याजवळ येऊन ती उभी राहिली. एकीच्याहि तोंडून शब्द उमटेना. दोघींचेहि दीर्घ निःश्वास त्या शांत प्रदेशांत स्पष्ट ऐकूं येत होते. परंतु ती शांतता फार वेळ टिकली नाहीं. कंठ साफ करीत भिकारीण बोलूं लागली—

"दिल! याप्रमाणें आतां किती शोक करशील? 'रात्र थोडी नी सोंगें फार' अशी सांप्रत आपली स्थिति आहे. आतां तुझ्या दासी येतील तोंपर्यंत माझ्याशीं कांहीं तरी बोल."

"मी काय बोलूं? आपणांस मी विसरलें असं का वाटतं आपल्याला? माझ्यासाठीं काय हें धाडस केलं? बरं तर बरं, नाहीं तर प्राणांवर बेतायचं!"

"मला माझ्या प्राणांची पर्वा नाहीं." भिकारीण हंसून म्हणाली, "दिल! तुझा शेवटचा निरोप घेण्यासाठीं व तुझें शेवटचें दर्शन घेण्यासाठीं आज मी असें धाडस करून येथें आलों आहें. उद्यां तर तूं बादशहाची बेगम होशील. सर्व जग तुझ्यापुढें मस्तक वांकवील. याप्रमाणें सौख्यशिखरावर आरूढ झाल्यावर तुला केव्हांच ह्या हतभाग्याची विस्मृति पडेल, व नंतर आपली भेटहि होणार नाहीं. म्हणून मी आज मुद्दाम आलों आहें. त्यांत तुला दुखवून अपमान करण्याचा हेतु नाहीं. तसें तूं मानूं नयेस."

ती छद्मवेषी भिकारीण आवेशयुक्त वाणीनें याप्रमाणें बोलत असतां तिचे डोळे चंद्रप्रकाशांत विलक्षण तेजानें चमकत होते.

"आपणांस असं वाटतं काय, कीं नबाबाची बेगम होण्यांत मला सुख वाटतें? नाहीं, नाहीं. बेगम होऊन राजमंदिरांत इतर राण्यांसह कुजत पडण्यापेक्षां एखाद्या झोंपडींत आपल्या सुखकर सहवासांत मला जास्त सुख वाटेल. तें राजवैभव मला आपणापुढें तुच्छ आहे. मी राजीखुषीनें बादशहाची बेगम होण्यास कबूल नाहीं.

आपण पहाल बेगम झाल्यावर माझी काय स्थिति होते ती ! आईनं राहण्याविषयीं आपणांस आग्रह केला; पण आपण राहिलां नाहीं. जातांना माझी भेटसुद्धां घेतली नाहीं, किती हो आपण निष्ठुर !"

उद्वेग, असूया, खेद इत्यादि मनोविकारांमुळें तिचा चेहरा लाल झाला होता. तिचा हात आपल्या हातांत घेऊन तो छद्मवेषी म्हणाला, "तें खरें, पण आपली कन्या राजाला देण्याचें सोडून मजसारख्या कफल्लकाला देण्याइतके तुझे आईबाप खुळे नाहींत. तुझ्या लग्नाकरितां मीं रहावें, असा मासाहेबांनीं आग्रह केला होता; परंतु ज्या वस्तूची मीं आशा केली ती परक्याची होतांना पहाण्यास माझ्यानें रहावेल का? दिल, ह्या दुर्दैव्याची तूं आठवण करीत होतीस हा तुझा थोरपणा आहे. ईश्वर तुला अक्षय सुखांत ठेवो ! मजविषयीं तूं कष्टी होऊं नको. मी कायमचा तुझ्या मार्गांतून दूर होतों. पतीसह तूं सुखानें नांद."

तिचा हात सोडून तो छद्मवेषी जावयास उठला. तो बोलत होता तोंपर्यंत ती अश्रुपात करीत ऐकत होती. परंतु आपणांस रडत टाकून हा जात आहे असें पाहतांच तीहि ताड्कन उठली, व आपल्या कांपऱ्या हातांत त्याचा कृश हात घट्ट धरून दीन स्वरानें म्हणाली– "नका हो माझा अव्हेर करूं. मी येतेंच बरोबर."

"असें वेड्यासारखें काय बरें करतेस दिल? त्या बघ तुझ्या दासी इकडे येत आहेत. आतां मला गेलेंच पाहिजे. तूं समजूतदार आहेस. पहा, रात्रच आड आहे. उद्यां तर तूं बाहशहाची बेगम होशील. उद्यां जर तूं माझें चिंतन करशील तर तें पाप होईल. कारण पतीविना अन्य पुरुषाचें चिंतन करणें पाप होय असें

आपल्या पवित्र कुराणांत सांगितलें आहे. राजाची राणी होण्याकरितां तूं जन्मली आहेस, मला तूं विसरून जा—"

" अशक्य ! अगदींच अशक्य ! आपणांस विसरणें मला शक्य नाहीं. मनानें एकाला वरल्यावर देहानं दुसऱ्यास वरणं हें पाप नाहीं असं का कुराणांत सांगितलं आहे ? गडे, आपली मूर्ति हृदयांत बाळगणाऱ्या मला ह्या पवित्र ठिकाणीं नबाबापुढें शपथ घेण्यास कसा धीर होईल ? काजी जेव्हां कुराणावर हात ठेवून मला शपथ घेण्यास सांगेल तेव्हां माझी स्थिति काय होईल ? मी कशी जगेन ? "

" असे वेडे विचार करूं नकोस. अल्ला सर्व चांगलेंच करील. मी जातों."

प्रेमभरानें तिच्या हाताचें चुंबन घेऊन तो चालला. आतां बोलण्यास वेळ नव्हता, कारण दासींचा हास्यध्वनि व पावलांचा आवाज जवळ ऐकावयांस येत होता. दीनवदनानें ती निश्चल उभी होती. तिचें भान जवळ जवळ नाहींसें झालें होतें. जेव्हां तो छद्मवेषी चार-पांच पावलें चालून गेला तेव्हां ती दीनस्वरानें म्हणाली, " शेवटीं जातांच ना मला टाकून ? बरं. पण माझी एवढी खूण तरी घेऊन जा." गळ्यांतील रत्नहार काढून चटकन तिनें तो त्याकडे फेंकला. तो जरा पुढेंच गेला होता; तरी तो हार त्याच्या सारंगीच्या खुंटीवर पडला. तो तसाच पुढें गेला. त्या शान्त वेळीं कोणाचेंसें विकट हास्य ऐकावयास आलें. छद्मवेषी तर दृष्टिआड झाला होता. मग हें हास्य कोणाचें बरें ? बिचारी दिलआरा पाषाणपुतळीसारखी निश्चल बनून तो गेला त्या दिशेकडे टक लावून पहात होती. चांदणें स्फटिकासारखें शुभ्र पडलें होतें. तरी तिला महालाकडे जाण्याचें भान नव्हतें. दासींनीं

नानातऱ्हेचीं फुलें गुंफून आणिलीं होतीं त्यांचा परिमल सर्वत्र पसरला होता; तथापि तिकडेहि तिचें लक्ष नव्हतें. तिची अशी चमत्कारिक स्थिति पाहून दासीहि घाबरल्या. शेवटीं अमीनेनें तिला शुद्धीवर आणलें.

"बाईसाहेब, महालांत चलायचं ना? मासाहेब वाट पहात असतील."

"काय म्हटलंस? अमीने, तुम्ही केव्हां आलांत ग?"

"आम्ही इथंच आहोंत, बाईसाहेब! रात्र झाली. म्हटलं घरीं चलायचं ना? मासाहेबांनीं स्वार पाठविला आहे."

"होय का? चला जाऊं या. पण अमीने! ती मघांची भिकारीण कुठं आहे? तुम्हां कोणाला दिसली का ग?"

"छे बाईसाहेब! आम्हांला नाहीं दिसली. ती गेली असेल. तिला बक्षिसहि पुष्कळ मिळालं. मग कशाला राहील? चला, आपण जाऊं या." तिला उठवीत अमीना म्हणाली, व तिला पालखींत बसवून सर्वजणी निघून गेल्या.

आज नगरांत जिकडे तिकडे आनंद व उत्साह दिसत होता. ध्वजापताकांनीं सर्व नगर शृंगारलें होतें. राजवाड्याला व दिलबाग महालाला अपूर्व शोभा आली होती. आज नबाबसाहेबांचें लग्न! अशा मंगल प्रसंगीं आनंदाला व उत्साहाला काय तोटा? तथापि आज एक व्यक्ति मात्र फार दुःखांत गढून गेलेली दिसत होती. दिलआरा, स्वतः नवरीमुलगी, काल रात्रीपासून दुःखी दिसत होती. रात्रीपासून तिला चैन नव्हतें. रडून रडून तिनें डोळे मुठीसारखे सुजविले होते. आजचा दिवस सगळ्यांकरितां आनंद, उत्साह घेऊन उजाडला होता; परंतु दिलआरेकरितां मात्र त्याच्या उलट होता. तथापि त्याचें खरें कारण कोणालाहि ताडतां आलें नाहीं. रात्रीं

फार वेळ मशिदींत राहिल्यामुळें तब्यत बिघडली असेल, अथवा दृष्ट झाली असेल, अशा समजुतीनें तिची दृष्ट वगैरे काढण्यांत आली. नंतर तो विषय अजिबात विसरून गेला. जें तें आनंदातिशयानें तिला सजविण्यानटाविण्यांत व तिची थट्टा करण्यांत दंग झालें होतें. ती बिचारी निमूटपणें सर्व सोशीत होती. सर्वांच्या आनंदांत व दिलआरेच्या दुःखांत तिसरा प्रहर केव्हांच उलटून संध्याकाळचे पांच वाजले. वराची स्वारी मोठ्या थाटानें मिरवत मिरवत वधू-मंडपीं येऊन दाखल झाली. काजीच्या मंगल आशीर्वादांत व वाद्यांच्या गजरांत लग्न लागलें; व तें राजवंशी जोडपें त्या कालच्या मुख्य मशिदींत पायां पडावयास गेलें ! बंदगी[1] झाल्यावर तेथेंहि उभयतांनीं शपथ घेतली. तथापि शपथ घेतांना वधूचा स्वर कंपित होत होता. लग्नमंडपांत आल्यापासून तिनें जी खालीं मान घातली होती, ती अद्यापि तशीच होती. वराची स्थिति मात्र तिच्या अगदीं उलट होती. नुकतेंच दुखण्यांतून उठल्यामुळें त्याचा राजवंशी चेहरा जरी फिक्कट दिसत होता, तरी त्याजवर एक प्रकारचें तेज होतें. आनंदातिशयानें क्षणोक्षणीं त्याचे नेत्र चमकत होते. शास्त्रविधि आटोपल्यावर त्यानें आपल्या गळ्यांतील रत्नहार काढून हास्यवदनानें वधूच्या कंठीं घातला. त्या हाराकडे दृष्टि जातांच विजेचा धक्का बसल्याप्रमाणें तीस झालें. तिनें हळूच वर पाहिलें तेव्हां नबाबाचा चेहरा हास्ययुक्त परंतु गंभीर असा तीस दिसला. आश्चर्यानें व भयानें तिचें मस्तक भ्रमण करूं लागलें, व 'हाय' एवढीं दोनच अक्षरें निःश्वासाबरोबर उच्चारून ती धाड्कन खालीं पडली. नबाबांनीं तीस सावरून धरिलें. तिच्या बेशुद्धीचें कारण कोणासहि कळेना. तशाच स्थितींत तीस राजवाड्यांत नेण्यांत आलें. इतक्यांत हकीमहि

---

१ (फारसी) दास्य, सेवा, सलाम.

आले व औषधोपचार सुरू झाले. धास्तीमुळें छातींत जबरदस्त धक्का बसून मूर्च्छा आली असें हकिमांचें म्हणणें पडलें. सर्वांच्या आनंदांत विरजण पडल्यासारखें झालें होतें. हकिमांच्या सतत उपचारांनीं कांहीं वेळानें नवीन बेगमसाहेब शुद्धीवर आल्या. तथापि त्यांच्या हृदयावर जो आघात बसला होता, त्यामुळें दिवसेंदिवस त्या क्षीण होत चालल्या होत्या. सर्व दिवसभर निःश्वास सोडणें, कोणी जवळ-पास नसल्यास अश्रुविसर्जन करणें, स्वतःशींच पुटपुटणें असा त्यांचा क्रम होता. याप्रमाणें दुःखमय दिवस कंठीत असतां एके दिवशीं सकाळीं जागृत होतांच त्यांना बिछान्यावर एक पत्र सांप-डलें. त्याच्या वाचनानें त्यांचा चेहरा प्रफुल्लित झाला. हकिमांच्या सतत परिश्रमानें साध्य होत नव्हतें, तें एका कागदाच्या चिठोऱ्या-च्या वाचनानें झालें ! तें पत्र येणेंप्रमाणें:—

'प्रिये, दिल ! तूं स्वतःस व्यर्थ त्रास करून घेत आहेस. माझ्या-जवळ तुझा हार पाहून तुला कोडें पडलें; परंतु त्याचा खुलासा वाचून तुझें तुलाच हंसूं येईल; आपला विवाह निश्चित झाला, तथापि मीं तुला पाहिलें नव्हतें; तुझ्या रूपगुणांची परीक्षा घेण्या-करितां कांहीं तरी बहाणा करून स्त्रीवेषानें मी तुला गायन-वादन शिकविण्याकरितां राहिलों; तुझ्या स्वभावाची परीक्षा झाल्यावर मी स्त्री नसून एक गरीब पुरुष आहें असें तुला जाहीर केलें; नंतर मला तेथें राहण्याची कांहीं गरज नव्हती. माझें उद्दिष्ट कार्य झालें होतें म्हणून मीं तुझा निरोप मागितला. तथापि तूं खुशीनें निरोप देईनास, व आपल्या लग्नाचे दिवस नजीक आले होते, म्हणून मी मासाहेबांचा निरोप घेऊन एके दिवशीं निघून गेलों. नंतर आजारीपणांत कांहीं दिवस गेल्यावर लग्नाच्या पूर्व दिवशीं मशिदींत भिकारणीच्या वेषानें तुला भेटलों. याचें कारण मी तुझा शिक्षक

होतों, तेव्हां तूं वैभवाविषयीं तुच्छता दर्शवीत असस, ते तुझे विचार मनापासूनचे होते कीं काय व नबाबाची बेगम होण्याच्या आनंदांत पूर्वीच्या गरीब शिक्षकास विसरलीस कीं काय हें मला पहावयाचें होतें. म्हणून माझ्या गरिबींत मला कामास यावा म्हणून लग्नाच्या पूर्वदिवशीं तूं दिलेला हार लग्नाच्या दिवशीं मी तुला मुद्दाम घातला म्हणून हा घोंटाळा झाला !

तुझा प्रियकर,

**नबाब.'**

वरील पत्र वाचून बेगमसाहेबांस आनंद होणें साहजिकच आहे. थोड्याच वेळांत नबाबसाहेबांची स्वारी तेथें आली. तेव्हां लग्न झाल्या दिवसांत आजच प्रथम हास्यमुखानें त्यांनीं त्यांचें स्वागत केलें. नंतर कृत्रिम क्रोधानें बेगमसाहेब म्हणाल्या—"अशी का मेली जीव घेणारी थट्टा करायची ?"

"त्या रत्नहारानें हा सारा घोंटाळा केला !" हंसत हंसत नबाबसाहेब म्हणाले. बेगमसाहेबांचें दुखणें आजपासून गेलें. पुन्हा पूर्ववत् सर्वत्र आनंदोत्सव सुरू झाला. बेगमसाहेबांच्या आकस्मिक दुखण्याचें व एकदम बरें होण्याचें सर्वांस आश्चर्य वाटे, तथापि जनानखान्यांतील दासी आपआपसांत म्हणत—

"अहो, त्या सटव्या भिकारणीची दृष्ट झाली हो ! दुसरं कांहीं नाहीं."

**सौ० आनंदीबाई शिर्के**

(कथाकुंज)

**प्रश्न व सूचना**

(१) ही गोष्ट बादशहानें केलेल्या वेषांतरावर उभारलेली आहे. वेषांतरांवर उभारलेल्या गोष्टींत स्वाभाविकपणा असतो काय ? या गोष्टींत तो कितपत आहे ?

( २ ) वर्णनामध्यें कित्येक ठिकाणीं आरबी-फारसी शब्द आलेले आहेत, तर कित्येक ठिकाणीं संस्कृत शब्द आलेले आहेत. यांत औचित्यअनौचित्य कोठें झालें असल्यास सांगा.

( ३ ) राजा आजारी पडून त्याचा चेहरा फिक्कट झाला होता या वस्तुस्थितीचा गोष्टींत कसा उपयोग करून घेतला आहे तें सांगा.

( ४ ) [ अ ] पुढील शब्दांची व्युत्पत्ति द्याः--मज्जाव, खैरात, यःकश्चित्.

[ आ ] पुढील समास सांगून अर्थ सांगाः—नखशिखान्त, छद्मवेषी, स्वागत.

( ५ ) [ अ ] 'उमराव' हें वास्तविक 'अमीर'चें अनेकवचन आहे, परंतु आपण त्याचा एकवचनी उपयोग करतों. 'कवाइत' हाहि शब्द मुळांत असाच असून 'काइदा' याचें अनेकवचन आहे.

[ आ ] 'हकीम' याचा मूळ अर्थ 'हिकमत' असलेला ( शहाणा ) असा आहे.

---

# स्वार्थत्यागाची मीमांसा

[ प्रो० नारायण सीताराम फडके यांचें नांव 'दौलत', 'जादूगार' इत्यादि मनोरम कादंबऱ्यांचे कर्ते म्हणून विशेष प्रसिद्ध असले तरी गंभीर स्वरूपाचें व विचारपरिप्लुत असें वाङ्मय लिहिण्यांतहि ते कमी निष्णात आहेत असें नाहीं. ते स्वतः तत्त्वज्ञानाचे प्रोफेसर आहेत. गंभीर स्वरूपानें सर्व प्रकारचें वाङ्मय वाचण्याची त्यांना हौस आहे व असें वाङ्मय आपण स्वतःहि निर्माण करावें अशी त्यांची महत्त्वाकांक्षा असून पूर्णपणें पात्रताहि आहे, हें 'प्रतिभासाधन', 'आजचे तरुण स्त्रीपुरुष व त्यांजपुढील प्रश्न' इत्यादि त्यांच्या पुस्तकांवरून सहज समजून येण्यासारखें आहे. पुढील उतारा वरीलपैकीं दुसऱ्या पुस्तकांतून घेतला असून तें सबंध पुस्तक तरुण

विद्यार्थ्यांनीं वाचावें अशी येथें शिफारस केल्याशिवाय राहवत नाहीं. आजकाल तरुण स्त्रीपुरुषांना स्वार्थत्याग करावासा वाटतो ही अभिनंदनीय गोष्ट आहे. हा स्वार्थत्याग कोणी, केव्हां, कितपत करावा हें पुढील उताऱ्यांत उत्तम रीतीनें सांगितलें आहे. ]

कोणत्याहि व्यक्तीचा त्याग फलदायक होण्यास त्या व्यक्तीच्या ठिकाणीं आधीं व्यक्तित्व आलेलें पाहिजे. त्याग करण्याच्या इच्छेला किंमत नाहीं असें नाहीं, पण देऊन टाकायला जवळ जेवढें असेल तेवढें त्या इच्छेचें चीज होईल. संन्याशाला दातृत्वाचा उमाळा आला तरी तो काय देणार ? किंवा वांझोटीला पान्हा फुटला तरी काय उपयोग ? भुईमुगाच्या रोपट्याला पुष्कळ वाटलें, कीं येणाऱ्या जाणाऱ्या श्रान्त वाटसरूंना छाया देऊन त्यांचा श्रमपरिहार करावा, तरी त्यापासून काय निष्पन्न होणार ?



प्रो० ना. सी. फडके

तारुण्याच्या कालांत सर्वांत प्रबळ इच्छा हीच असते, व असावयास पाहिजेच, कीं प्रेम करावें आणि परत प्रेमाचा आनंद लुटावा. हें प्रेम प्रणयाच्याच स्वरूपाचें असेल असें समजण्याचें कारण नाहीं. आईबापांची भक्ति, सद्गुरूची उपासना, देशाचा अभिमान इत्यादि अनंत प्रकारांनीं तें प्रेम व्यक्त होईल.

आत्मसमर्पणाची तीव्र इच्छा हेंच तारुण्यकालांतील जीविताचें सार होय. पण समर्पण करावयास जवळ कांहीं तरी संचय हवा

ना ? सुंदर तरुणीवर प्रीति करून तिला वश करावयाचें झालें तरी तिच्यासाठीं जितका त्याग हातून घडेल तितकी तिची प्रीति जडेल, आणि त्याग करण्यासारखें अंगीं जितकें अधिक बळ असेल तितका त्याग मोठा ठरेल. इतर प्रेमप्रकारांचेंहि असेंच आहे. आपला अधिकार जितका मोठा असेल, आपली क्षमता जेवढी अधिक असेल तेवढा आपल्या स्वार्थत्यागाचा परिणाम अधिक होईल व त्या त्यागामुळें आपल्या क्षुब्ध भावनांना उन्मादशांतीचें सौख्य मिळावें ही जी आंतली इच्छा असते ती अधिक अंशांनीं पूर्ण होईल.

आपल्या अंगीं घेण्याचें सामर्थ्य जितकें अधिक आलेलें असेल तेवढें आपल्या त्यागाचें मोल वाढेल. ज्याच्या अंगीं घेण्याची ताकद नाहीं त्यानें न घेतलें तरी त्या त्यागाला कांहीं अर्थच नाहीं. राजलक्ष्मी आणि संसारसौख्य पायांवर लोळत असतांना मानवजातीच्या उद्धारासाठीं भिक्षु होणाऱ्या बुद्धाचा त्याग अलौकिक म्हणावयाचा. उपासमार टाळण्यासाठीं सैन्यांत दाखल होणाऱ्या बारागिरानें देशासाठीं स्वार्थत्याग केला असें कोणी मानणार नाहीं. मन मानेल तर हातीं आलेली कल्याण-सुभेदाराची सून आपली म्हणतां येईल असा अधिकार असतांनाहि तिला 'माते' म्हणून हांक मारणाऱ्या शिवाजीमहाराजांचा त्याग अलौकिक ठरतो. सतरा विश्वे दारिद्र्याच्या मालकानें नूरजहानवर पापी नजर टाकली नाहीं तर त्यांत काय ? मिळविण्याची सत्ता जितकी मोठी तितकी त्यागाची शोभा अधिक.

*अमक्यासाठीं कांहीं तरी करावें, अमक्या व्यक्तीवर निरतिशय* प्रेम करावें, अमक्या स्त्रीचें हृदय जिंकावें, समाजासाठीं झिजावें, देशासाठीं उडी घ्यावी, या साऱ्या भावना तरुण हृदयांत कमी-

जास्ती प्रमाणांत उठणारच. पण या भावनांची तहान खरोखर भागवावयाची असेल तर तरुण स्त्रीपुरुषांनीं आपली क्षमता वाढविण्याकडे दुर्लक्ष करूं नये. तारुण्यांत अंतःकरणाची धाव चालू असते, उज्ज्वल कृत्यें करावींशीं वाटत असतात, कधीं कधीं हें करूं कीं तें करूं अशी घाई होऊन स्थलकालमर्यादा झटपट ओलांडाव्यासें वाटतें याचा अर्थ काय ? हें शिकूं कीं तें शिकूं ? कोठवर शिकूं ? लग्न केव्हां करूं ? कोणाशीं करूं ? सामाजिक सुधारणेसाठीं झटूं कीं व्यापारांत शिरून बुद्धिप्रभाव दाखवूं ? कुटुंबाचें कल्याण साधूं, कीं सारा भार देवावर टाकून देशासाठीं मरणाच्या वाटेवर पाऊल टाकूं ? अशा प्रकारचे हजार प्रश्न तरुण स्त्रीपुरुषांच्या मनाचा गोंधळ उडवितात याचा अर्थ काय ?

याचा अर्थ इतकाच, कीं दुसऱ्या कोणाला तरी सुखी करून त्यांत मिळणाऱ्या अवर्णनीय आनंदाचा उपभोग घ्यायसाठीं तरुणाचा जीव उत्सुक असतो. आपण सुखाचें केंद्र व्हावें, आपल्यापासून दशादिशांना सुखाचीं किरणें फांकावीं अशी यौवनांत जिवाला ओढ लागलेली असते. पण जिवाचें हें कोडकौतुक पुरवावयाचें असेल तर सुखोत्पादक शक्ति आपल्या अंगीं आधीं भरपूर सांठली पाहिजे हें विसरतां कामा नये. विजेच्या बॅटरीच्या योगानें पुढें शेंकडों दीपज्योति प्रज्वलित व्हावयासाठीं आधीं ती भरावी लागते. त्याचप्रमाणें चहूंकडे सौख्यकिरणें फेंकणाऱ्या बिंदूची स्थिति आपल्याला यावी असें वाटत असेल तर तारुण्याच्या पूर्वकालांत तशी योग्यता अंगीं आणण्यासाठीं अहर्निश झटलें पाहिजे. शेतकरी गोफण मारतो तें कधीं पाहिलें आहे काय ? त्या गोफणींतला दगड गोफणीचा कडाड् आवाज होऊन सुटल्याबरोबर सूंऽदिशीं जाऊन टिपण साधतो; पण तें साधण्यासाठीं आधीं कांहीं वेळ गोफण शेतकऱ्याच्या

डोक्यावर फिरावी लागते. तशी ती फिरल्याशिवाय दगड निशाणा-वर पडणार नाहीं.

सारांश, त्यागाची तळमळ आमच्या तरुण स्त्रीपुरुषांना लागली पाहिजे हें जितकें खरें तितकेंच त्या त्यागाची उत्तम फलश्रुति होण्यासाठीं तरुणांनीं आपली योग्यता सर्व प्रकारें आधीं वाढविली पाहिजे हेंहि खरें. आज आभाळ सगळीकडूनच फाटलेलें दिसत असल्यामुळें आमचीं माणसें भांबावून गेलीं आहेत. तरुणांची अधीर अंतःकरणें तर अधिकच भांबावून जात आहेत; पण अशा वेळींच वरील विवेचन कटाक्षानें लक्षांत ठेवावयास हवें.

आणखी ज्या एका गोष्टीचा अशा वेळीं विसर पडतो, पण जी सतत ध्यानांत वागविली पाहिजे म्हणून वर एकदां मीं म्हटलें ती ही, कीं जवळच्यांची आबाळ करून दूरच्यांचें हित साधण्यासाठीं त्याग करण्यांत शहाणपणा नाहीं. प्रत्येक व्यक्ति अनेक वाढत्या परिघांच्या वर्तुळांच्या केंद्रस्थानीं आहे असें मागें एके ठिकाणीं सांगितलेलें वाचकांस आठवत असेलच. या प्रत्येक वर्तुळावरील व्यक्तींशीं, संस्थांशीं किंवा तत्त्वांशीं व्यक्तीचा प्रसंगानुसार संबंध येत असतो व ज्या जोराचें आकर्षण घडेल त्या मानानें भावनांची भरती येऊन स्वार्थत्यागाचा मोह वाटत असतो.

या मोहामुळें पुष्कळदां असें होतें कीं, अखेरच्या वर्तुळावरील व्यक्तीसाठीं स्वार्थावर लाथ मारण्याच्या भरांत अगदीं निकटच्या वर्तुळावरच्या आपल्या जिव्हाळ्याच्या माणसांना कष्टांच्या व हाल-अपेष्टांच्या खाईत आपण लोटतों. हा प्रकार कितपत समर्थनीय आहे याची मला जबर शंका वाटते. कोणच्या कल्याणासाठीं कोणच्या कल्याणावर पाणी सोडावें किंवा सोडूं नये हें निश्चितपणें सांगतां येणें कठीण आहे हें कबूल. कार्याकार्यविचार सोपा नाहीं.

तो सोपा नसल्यामुळेंच अर्जुनासारखा पराक्रमी आणि ज्ञानी पुरुष घटकाभर स्तंभित व मूढ होऊन गेला.

देशासाठीं घरादारावर तुळशीपत्र ठेवणेंहि क्षम्यच नव्हे तर कर्तव्यच म्हणावें लागत असेल; पण मला वाटतें, तें असामान्य निकराच्या वेळीं. मायदेशावर शत्रु चालून येऊन समरकुंडच पेटल्यावर बायकोला वैधव्य येईल या भीतीनें घरीं राहणारा माणूस शहाणा ठरणार नाहीं याबद्दल वादच नाहीं. पण हें नीतिशास्त्र अपवादभूत निकराच्या घटकेपुरतें. नैमित्तिक तेंच नित्याचें मानणें चुकीचें आहे.

परंतु ही चूक आमच्या तरुण स्त्रीपुरुषांपैकीं पुष्कळांच्या हातून होत आहे. गांवांत मोफत वाचनालयें स्थापणाऱ्यांच्याच घरांत निरक्षरता माजलेली मीं पाहिली आहे. मजुरांचे कष्ट कमी करण्यासाठीं व्याख्यानांची झोड उडविणाऱ्यांच्या घरांत थकलेली आई आणि कोंवळ्या वयाची बायको मजुरासारखी राबून कसाबसा संसार उभा राखण्यासाठीं धांपा टाकतात, अशीं उदाहरणें मला माहीत आहेत. एखाद्या संस्थेचा वार्षिकोत्सव साजरा करण्याच्या तयारींत गुंतल्यामुळें घरीं आजारानें पडलेल्या बायकांपोरांकडे लक्ष द्यावयास ज्यांना वेळ नाहीं, असे स्वयंसेवक मला आढळले आहेत. देशाभिमानप्रवर्तक गाणीं गात फिरावयाची कामगिरी पतकरल्यामुळें ज्यांनीं आपल्या घरच्या माणसांना नीटनीटकें खायलाप्यायला मिळतें कीं नाहीं याची कधीं दादहि घेतली नाहीं अशीं माणसें माझ्या अवलोकनांत आलीं आहेत.

देशाच्या आजच्या स्थितींत असल्या प्रकारांवर अभिप्राय देणें कठिण आहे; व हे प्रकार अनिष्ट होत असें म्हणावयाचें म्हणजे सत्य व प्रिय दोन्ही बोलल्याचें समाधान लाभणें शक्य नाहीं. पण

इतकें म्हटलें पाहिजे कीं, हे प्रकार सर्वस्वीं इष्ट तरी खचित नव्हेत, आणि तरुणांनीं आपल्या वर्तनांत थोडीशी तरी प्रमाणबद्धता आणल्यास ते टळतील.

देशासाठीं संसारावर निखारे ठेवण्याच्या अपवादात्मक घटकेपेक्षां सामान्य काळांत व सरमिसळ सामान्य परिस्थितींत तरुण स्त्रीपुरुषांचें कर्तव्य कोणतें याचाच विचार येथें कर्तव्य आहे, व त्या दृष्टीनें हें सांगितलें पाहिजे, कीं राजकारणाच्या दूरच्या रोपटीं जगविण्यासाठीं आप्तस्वकीयांच्या कल्याणावर पाय देणें योग्य नव्हे. स्वार्थत्याग केव्हांहि उदात्तच खरा; पण त्यांत प्रमाणबद्धता असली तर तो निवळ उग्रच नव्हे तर चित्तवेधक आणि सुपरिणामी ठरेल. आधीं घरांत रमणीयता असावी आणि मग देशाचें सौंदर्य वाढविण्याचा उद्योग करावा.

याचा अर्थ तरुणांनीं स्वार्थांत मग्न राहून घरांतली तिजोरी फुगवावी असा विपर्यासानें करूं नये. संपत्तीखेरीज संसारांत इतर हजार प्रकारचें सौंदर्य असावें लागतें. आम्हांला त्याची कल्पनाहि नसते. त्यामुळें आमच्या घरांना खाणावळ आणि रेल्वे स्टेशनावरची वेटिंग रूम असें मिश्र स्वरूप आलेलें दिसतें. घर सुंदर करण्याचें व घरच्यांना सुखासमाधानांत ठेवण्याचें कर्तव्य क्षुद्र नाहीं. किंबहुना या कर्तव्याकडे सर्वांनीं लक्ष दिलें तर सारीं घरें सुखसंपन्न होऊन एकंदर राष्ट्राचा प्रश्न कांहीं अंशीं आपोआप सुटेल. प्रत्येक झाड टवटवीत राहिलें तर एकंदर बगीचाची शोभा आपोआप बरीचशी वाढल्यावांचून रहावयाची नाहीं. पैपैसा सांठवायची खबरदारी घेतली, कीं मोहरा आपोआप सांठतात असें म्हणतात तें खोटें नाहीं. निदान मी तरी तरुणांनीं कर्तव्याचा अनुक्रम उगीचच्या उगीच उलटासुलटा करूं नये असें

म्हणणाऱ्यांपैकीं आहें. सार्वजनिक सभेंत स्वयंसेवक म्हणून मिरविणाऱ्या तरुणांपेक्षां घरीं माहेरपणास आलेल्या बहिणीचीं मुलें हौसेनें कडेखांद्यावर फिरावयास नेणारा तरुण मला अधिक आवडतो. भावनांची प्रखरता आणि त्यागाची हौस तरुण स्त्रीपुरुषांच्या ठिकाणीं अवश्य असावी, पण ती हौस भागवितांना प्रमाणबद्धता सुटूं नये.

स्वार्थत्यागांत प्रमाणबद्धतेचें महत्त्व मानलें पाहिजे आणि त्याग करण्यापूर्वीं तरुणांनीं आपली योग्यता व क्षमता शक्य तेवढी वाढविली पाहिजे. या दोन मुद्द्यांवर मीं आतांपर्यंत जोर दिला. अर्थात् ही क्षमता कशी वाढवितां येईल हा प्रश्न येथें उपस्थित होतो व त्याचाच विचार पुढच्या प्रकरणांत करूं.

ना० सी० फडके

( आजचे तरुण स्त्रीपुरुष व त्यांजपुढील प्रश्न )

### प्रश्न व सूचना

( १ ) प्रो० फडके यांची या उताऱ्यांतील विचारसरणी थोडक्यांत सांगून ती तुम्हांला कोणत्या बाबतींत कितपत पटते हें सांगा.

( २ ) [ अ ] प्रो० फडके यांचे या उताऱ्यांतील चांगले दाखले निवडून काढा.

[ आ ] या उताऱ्यांतील समतोल व तालबद्ध Balanced व Rhythmical वाक्यांच्या जोड्या निवडून काढा.

( ३ ) [ अ ] खालील वाक्यांचा अर्थ सांगून त्यांतील कल्पनेचा २०–२५ ओळींपर्यंत विस्तार करा, किंवा अश्या गृहस्थितीचें यथार्थ शब्दचित्र काढा.

"आमच्या घरांना खाणावळ आणि रेल्वे स्टेशनावरची वेटिंग रूम असें मिश्र स्वरूप आलेलें दिसतें."

[ आ ] "पै पैसा सांठविण्याची खबरदारी घेतली, कीं मोहरा आपोआप सांठतात." हें वाक्य कोणत्या इंग्रजी म्हणीचें रूपांतर आहे ?

अशाच आणखी दोन इंग्रजी म्हणी घेऊन त्यांचें रूपांतर करण्याचा प्रयत्न करा.

[ इ ] वांझ, माहेर, या शब्दांची व्युत्पत्ति द्या.

[ ई ] ...वर तुळशीपत्र ठेवणें, ...वर निखारा ठेवणें, या शब्दप्रचारांचा वाक्यांत उपयोग करा.

[ उ ] फलश्रुति, तारुण्यसुलभ, अहर्निश हे समास सोडवून त्यांचा अर्थ सांगा.

[ ऊ ] 'सतरा विश्वे दारिद्र्य' म्हणजे काय? 'विश्वे' म्हणजे काय? 'अठरा विश्वे' म्हणण्याचा प्रघात असतांना 'सतरा विश्वे' असें चुकीनें म्हटलें आहे काय?

---

# सुंदर चित्र

[ रा. विष्णु सखाराम खांडेकर याना अलीकडील कादंबरीकार व लघुकथा-लेखक यांमध्यें उच्च स्थान आहे. पुढील गोष्ट अगदीं लहान असल्यामुळें त्यांचा कल्पनाविलास, कोटीबाजपणा वगैरे गुण या गोष्टींत तितकेसे दिसत नाहींत; तथापि लघुकथेची कला त्यांतील गर्भित तत्त्व व कोंकणचें वातावरण निर्माण करण्याचें कौशल्य या दृष्टीनें सदरहू गोष्ट वाचनीय आहे. ]

खास अंकासाठीं चित्राची मागणी, आणि तीहि सर्वांत श्रेष्ठ अशा मासिकाकडून. मग ब्रह्मानंद निराळा थोडाच असतो! शेतकऱ्याच्या सुंदर मुलीला स्वतःच्या स्वरूपाची जाणीव नसते असें नाहीं, पण— पण राजपुत्र मागणी घालायला आला कीं, तिच्या अंतःकरणांत आश्चर्याच्याहि लहरी उसळत नाहींत का? त्या तरुण चित्रकाराची स्थिति अशीच झाली.

त्याच्या मनश्चक्षूंपुढें एक गगनचुंबी मंदिर उभें राहिलें. "या सुंदर मंदिराचा पाया आज आपल्याला भरावयाचा आहे. असं मोहक चित्र निघालं पाहिजे कीं--"

सकाळ-संध्याकाळ तो समुद्रतीरावर जाऊन बसूं लागला; वद्य अष्टमीच्या ऐन मध्यरात्रीचा चंद्रोदय त्यानें पाहिला, टेंकडीवरून दिसणाऱ्या भोंवतालच्या यक्षभूमीचें त्यानें निरीक्षण केलें, पण त्याचें मन कुठेंच रमेना. भूक लागलेल्या तान्ह्या बाळाला ताई, काकी, मावशी यांनीं कितीहि कुरवाळलें तरी त्याची किरकिर कशी थांबणार? त्याला आईनेंच पदराखालीं—

त्याच्या तृषित कला-दृष्टीला त्याची माता दिसली. शेतांतल्या पायवाटेनें जात असतांना त्यानें सहज उजवीकडे पाहिलें; पेरे नुकतेच पुरे झाले होते. हिरव्यागार मळ्याच्या एका मधल्या भागांत कांहीं कबुतरें डौलानें बसलीं होतीं. लांबून पाहणाराला मधेंच कुणीं तरी पांढऱ्या शुभ्र फुलांच्या राशी करून ठेवल्याचा भास झाला असता. चित्रकाराचीं पावलें हळुहळू त्या बाजूला वळलीं. कबुतरें मधून मधून माना मुरडून इकडे तिकडे पहात होतीं. मधूनच चोंचीनें कांहीं तरी टिपीत होती. हिरव्या गालिचाच्या मध्यभागीं चाललेल्या त्यांच्या नाजुक चाळ्यांतील नृत्यकौशल्य पाहून चित्रकार मुग्ध झाला. उंच माडांची पार्श्वभूमि, नुकत्याच रुजलेल्या भाताचा कोमल हिरवा रंग, पांढरीं शुभ्र कबुतरें— किती सुंदर दृश्य! अमेरिकेच्या किनाऱ्यावर पाऊल टाकतांना कोलंबसाला किती आनंद झाला असेल याची चित्रकाराला आतां कल्पना आली.

आपण कवि नाहीं म्हणून त्याला वाईट वाटलें. किती मनोहर दृश्य होतें तें. निरभ्र आकाशांत चमचम चमकणारा तारकापुंज, रमणीच्या पदरावर रुळणारी टपोऱ्या मोत्यांची माळ— किती तरी कल्पना त्या सुंदर कबुतरांकडे पाहून त्याला सुचल्या. आपली चाहूल लागली, कीं कबुतरें भर्रकन उडून जातील म्हणून तो

---

१ बाग.

थोडासा दूरच उभा राहिला. 'हें दृश्य मला रेखाटतां आलें तर— किती नाजूक पांखरें ! आणि त्यांच्या हालचाली किती गोड ! या सुंदर चित्राची मोहिनी—मातृत्वहीन स्त्री गोजिरवाण्या मुला-कडे ज्या उत्कंठित दृष्टीनें पहाते, ती या वेळीं त्याच्या रसिक नेत्रांत दिसत होती.

'हूः हूः हूः' या कठोर उद्गारांनीं त्याच्या कलासमाधीचा भंग झाला. कासटी नेसलेला एक काळाकुळकुळीत मनुष्य दुरूनच त्या कबुतरांना भिववीत चित्रकाराकडे येत होता. त्याचे कर्णकर्कश उद्गार ऐकतांच तीं हां-हां म्हणतां उडून गेलीं. आपल्या समाधीचा भंग करणाऱ्या मनुष्याकडे एखाद्या कोपिष्ट ऋषीनें पहावें त्या-प्रमाणें चित्रकार त्या अडाणी मनुष्याकडे पाहूं लागला. शेतकऱ्या-सारखा दिसणारा तो मनुष्य जवळ येतांच चित्रकार रागानें म्हणाला,

"अरे वेड्या—"

"मी येडो ? आणि तूं मात्र शाणो नाय मोटो !" तो तिरसटपणें उद्गारला.

"कशीं छान बसलीं होतीं बिचारीं पांखरं ?"

"अगदीं फोटोकच[1] बसललीं, नाय् तीं !"

"फोटो नाहीं, पण चित्र काढणार होतों ना मी त्यांचं !"

"तुमचा चितार झालला, पण माझी पोरांबाळां पेजेशिवाय मरतलीं होतीं तेचां ?"

चित्रकार आश्चर्यानें त्याच्याकडे पाहूं लागला. कलेला जीवन देणाऱ्या कबुतरांचा आणि या अडाणी मनुष्याच्या पोराबाळांच्या मरणाचा काय संबंध ?

---

१ फोटोकरितांच.

" खूळ लागलंय तुला—" तो उपहासानें शेतकऱ्याला म्हणाला.

" माकां नाय्, तुमकांच ! इतके मेरेर[1] या उभे होतास आणि एक पांखरूं हांबडुंचों[2] झालां नाय् तुमच्या हातान् ? कालच पेरलंय् हो कुणगो[3] ! बींच जर खाल्लां कबुतरांनीं, तर उपाशींच मरतीतया माझीं पोरांटोरां ! "

खास अंकांत चित्रकाराचें त्याच सुंदर स्थळाचें चित्र प्रसिद्ध झालें, व तें सर्वांना आडवलेंहि. त्यांतील कबुतरें मात्र डौलानें शेतांत बसलीं नसून भिऊन भुर्रकन आकाशांत उडत होतीं.

वि० स० खांडेकर
( यशवंत )

### प्रश्न व सूचना

( १ ) या गोष्टींतील दाखले निवडून काढा व ते कितपत योग्य आहेत तें ठरविण्याचा प्रयत्न करा.

( २ ) या गोष्टींत दोनतीन ठिकाणीं वाक्यें अर्धवट सोडून दिलीं आहेत. असें करण्याचें कारण काय ?

( ३ ) कला व जीवन यांचा संबंध काय ? सदरहू गोष्टींत अखेरीस कबुतरें आकाशांत उडत असलेलीं दाखविण्याचें कारण काय ? तीं शेतामध्यें जणूं कांहीं 'फोटोकच' बसलीं आहेत असें दाखविलें असतें तर चित्र-कलेच्या दृष्टीनें कांहीं बिघडलें असतें काय ?

( ४ ) चित्रकार शेतकऱ्याला 'अरे वेड्या' म्हणतो व शेतकरी तिरसट-पणें 'मी येडो ? आणि तूं मात्र शाणो ! असें उलट विचारतो, दोघेहि कोणत्या अर्थानें शहाणे किंवा वेडे याचें विवेचन करा.

---

१ मेरेला, कडेला. २ हांकलून देण्याचें. ३ भातशेताचा एक भाग.

# बोकड व माणूस

## [ मोठ्या माणसांसाठीं एक छोटी गोष्ट ]

[ रा० प्रल्हाद केशव अत्रे यांची पुढील गोष्ट दिसण्यांत लहानशी दिसते पण तिचा आशय मोठा आहे. त्यांतील गर्भित विनोदहि ध्यानांत धरण्यासारखा आहे. ]

रविवारीं सहज वाचत पडलों होतों. 'सुबोधकथा' हें पुस्तक हातालगत होतें. तें उचलून वाचूं लागलों, तों पुढील गोष्ट नजरेस पडली. गोष्ट चांगलीच व परिचयाची; पण म्हटलें, पुन्हा एकदां वाचावी.



प्र. के. अत्रे

### शहाणे बोकड

एकदां एका डोंगरावर चरत असतां एक बोकड एका अतिशय अरुंद वाटेनें चालला होता. ती वाट एका कड्याच्या कांठानें गेली होती. एका बाजूस उंच सुळका व दुसऱ्या बाजूस खालीं खोल भयंकर दरी! तो जरा पुढें जातो तों समोरून दुसरा एक बोकड येत असतांना त्याला दिसला. दोघेहि अगदीं जवळ आले. आतां पुढें कसें जावयाचें? ती वाट इतकी अरुंद होती कीं, एकाला जाणें

देखील कठीण होतें. मग दोघे एकमेकांस ओलांडून कसे जाणार ! एवढेंच काय, पण त्यांपैकीं एकाला मागें वळून परत जाणेंहि अशक्य होतें. जरा पाऊल घसरलें, कीं दरींत पडून अंगाचा चुराडा व्हावयाचा ! शेवटीं त्यांतील एका बोकडाच्या डोक्यांत युक्ति आली. तो आपले पाय पोटाशीं दुमडून खालीं निजला. तेव्हां दुसरा बोकड त्याच्या अंगावरून पलीकडे गेला. अशा रीतीनें मोठ्या शहाणपणानें दोघांनींहि अडचणींतून उपाय काढला. मुलांनो, यापुढें तुम्ही शहाणपणानें व सलोख्यानें वागणार ना ?

बोकडाच्या शहाणपणाचें कौतुक करीत मीं पुस्तक मिटून खालीं ठेविलें व 'ज्ञानप्रकाश'चा ताजा अंक उचलला. प्रथमच पुढील हकीगत दृष्टीस पडली.

## भयंकर मारामारी

काल रोजीं पुणें-नगर रस्त्यावर दोन मोटर लॉरींच्या ड्रायव्हर व उतारू यांजमध्यें भयंकर मारामारी झाली. पुण्याहून नगरकडे 'बलभीम' कंपनीची गाडी चालली होती; व विरुद्ध दिशेनें नगरहून 'चांदबिबी-शहाजहान' कंपनीची गाडी येत होती. दोन्ही गाड्यांची गांठ एका अरुंद पुलावर पडली. फक्त एकच गाडी जाईल इतकाच तेथील रस्ता रुंद होता. दोन्हीहि गाड्या त्या ठिकाणीं अडून पडल्या. 'बलभीम' गाडीवाल्याचें म्हणणें असें कीं, "आपली गाडी पुलाच्या रस्त्यावर आधीं पोंहोचली." तर 'चांदबिबी'चा ड्रायव्हर 'अल्लाची कसम'

१ शपथ.

> खाऊन आपली गाडी पुलावर आधीं पोंहोचल्याची खातरजमा करूं लागला. कोणीहि ऐकेना. बोलाचाली-वरून मारामारीस सुरुवात झाली, ड्रायव्हरांच्या मदतीला त्यांच्या गाड्यांतील उतारूहि उतरले. खूपच गर्दी उसळली. जें हाताला लागेल त्याचा मारामारीस उपयोग करण्यांत आला. दहा लोकांना भयंकर जखमा झाल्या असून 'बलभीम' कंपनीच्या ड्रायव्हरचा डोळा फुटून अजिबात निकामी झाला आहे, व 'चांदबिबी' कंपनीच्या ड्रायव्हरच्या मांडीचें हाड मोडलें आहे. दोघांचीहि स्थिति काळजी करण्यासारखी आहे. हल्लीं सर्वांना पुण्याच्या इस्पितळांत आणून ठेविलें आहे. दोन्ही मोटारगाड्यांचा मारामारींत चुराडा झाला !

डोळे मिटून मीं ज्ञानप्रकाश खालींच ठेविला. या गोष्टीचें तात्पर्य—तात्पर्य काय सांगावयाचें, कपाळ !

प्र० के० अत्रे
( रत्नाकर )

**प्रश्न व सूचना**

( १ ) वरील गोष्टीचें रहस्य काय ?

( २ ) [ अ ] बोलाचाली, मारामारी, निकामी या शब्दांवर व्याकरणात्मक टीपा द्या.

[ आ ] या गोष्टींतील वाक्यें अगदीं लहान आहेत. तीं लहान मुलांना समजावीं म्हणूनच लहान घातलीं आहेत का ?

---

# मोरोपंतांनीं देशाभिमानाचीं काव्यें कां लिहिलीं नाहींत ?

[ मोरोपंतांनीं रामायण-महाभारतादि महाकाव्यांतील विषयांवरच भक्तिरसपरिपूर्ण अशीं काव्यें लिहिलीं, परंतु देशाभिमान उत्पन्न करणारीं व वीररसपूर्ण काव्यें कां केलीं नाहींत असा प्रश्न पुष्कळ वेळां मनांत आल्याशिवाय राहत नाहीं. या प्रश्नाचें उत्तर प्रो० श्रीनिवास नारायण बनहट्टी यांनीं आपल्या 'मयूरकाव्यविवेचन' या पुस्तकांत दिलेलें आहे. त्यांतील कांहीं भाग पुढें दिला आहे. ]

आमच्यां महाराष्ट्रांत कवींनीं भारतरामायणांच्याच कथा आधारास घेतल्या ही गोष्ट खंती बाळगण्याजोगी झाली नसून अत्यंत योग्य अशीच झाली आहे. उलट आपल्या काव्यासाठीं स्वतंत्र कथानक रचणें त्यांना भाग पडलें असतें तर त्यांची काव्यरचना इतकी उठावदार व इतकी सुंदर झाली नसती असेंच आम्ही म्हणतों. " विठ्ठलावांचूनी आणीक जे वाणी । नायकें मी कानीं आपुलीया ॥ " असें म्हणून तिन्हीत्रिकाळ हरिनामाचा गजर करणारे तुकोबा तर राहोतच, परंतु काव्यनिर्मिताचा उद्देश पुष्कळ अशीं पुढें ठेवून चालणारे जे मयूरमुक्तेश्वरादि त्यांना विधवांच्या दुःखावर एकादें करुणरसपूर्ण काव्य लिहावयास सांगितलें असतें तर काय थाट उडाला असता याची कल्पना करणें अवघड नाहीं. भारत-भागवतांतील त्याच त्या कथा वर्णन करीत बसण्याच्या ऐवजीं त्या वेळच्या महाराष्ट्राच्या इतिहासाकडे लक्ष पुरवून महाराष्ट्रीय वीरांच्या अद्भुत पराक्रमांवर या कवींनीं काव्यें लिहिलीं नाहींत याबद्दल हळहळ वाटणाऱ्या रसिकांची गैरसमजूत देखील अशा तऱ्हेचीच होय. इतरांच्या प्रेरणेवरून कवि कधीं काव्यें रचीत नसतो; त्याच्या हृदयांत जें स्फुरतें

तेंच काव्यरूपानें बाहेर प्रकट होतें. एकाद्यानें स्वेच्छेनें सुलक्षणी गाईचें दान दिलें असतां त्यानें घोडा कां दिला नाहीं असें म्हणून उलट त्याच्यावरच ठपका ठेवण्यासारखेंच हें राष्ट्रेतिहासप्रेमी लोकांचें रुसणें होय. शिवाजीमहाराजांसारख्या राष्ट्रोद्धारक वीर-पुरुषांच्या कथा त्या वेळच्या कवींच्या हृदयास उत्कटतेनें भासमान् झाल्या नाहींत, त्यांत त्यांचें हृदय तन्मय होऊन गेलें नाहीं; अर्थात्च त्या कथा त्यांच्याकडून काव्यरूपानें ग्रथित होऊं शकल्या नाहींत. आतां या कथा उत्कट रीतीनें त्यांच्या मनावर न बिंबण्यास तरी काय कारणें होतीं हें पाहिलें असतां त्यांचीं प्रामुख्यानें परमार्थप्रवण बनलेलीं अंतःकरणें हें एक कारण तर उघड दिसून येतेंच. त्यांचीं अंतःकरणें परमेश्वरभक्तींतच मुख्यतः तन्मय होऊन गेलीं असल्याकारणानें व्यावहारिक जगांतल्या घडामोडी कितीहि उदात्त व रमणीय असल्या तरी त्या त्यांच्या मनावर विशेष उत्कट परिणाम करीत नसत.

परंतु या एका कारणाशिवाय दुसरें कारणहि महत्त्वाचें व अवश्य लक्षांत घेण्याजोगें आहे. मोरोपंतादि कवींच्या वेळेस मराठे वीरांचे पराक्रम अगदीं नवे—ताजे होते. त्यांपैकीं कांहीं त्यांच्या काळाच्या पूर्वी नुकतेच घडून आले होते व कांहीं तर प्रत्यक्ष त्यांच्या डोळ्यांसमोरच घडून येत होते. आणि वर्तमानकालीन, किंवा समीपवर्तिभूतकालीन वृत्तान्त मनुष्याच्या मनास उत्कटत्वानें भासत नाहींत. त्यांचें सौन्दर्यसर्वस्व त्यांच्या डोळ्यांत भरत नाहीं असा सामान्य नियम आहे. कोणत्याहि वस्तूचें जवळून निरीक्षण केल्यास तिच्यांतील दोषच विशेष लक्षांत येतात; तिच्या सौन्दर्याचा अनुभव घ्यावयाचा असल्यास दुरूनच तिचें निरीक्षण करावें लागतें. नाटक हें दिव्यांच्या झगझगाटांत दूर बसूनच अवलोकावें; अगदीं जवळ

जाऊन नटांचें निरीक्षण केल्यास तोच रस उत्पन्न होईल अशी अपेक्षा कोणीं धरूं नये. चित्रकारांचीं चित्रेंहि विशिष्ट अंतरावरूनच पहावींत; त्यापेक्षां जवळ जाऊन पाहूं नयेत असा नियम असतो. तेव्हां या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या असतां ज्या घडामोडी पंतांच्या कालीं अगदीं निकटवर्ती होत्या, किंबहुना ज्या घडामोडींमध्यें ते स्वतः वावरत होते. त्यांची अद्‌भुतरम्यता त्यांस उत्कटत्वानें भासमान् झाली नाहीं, यांत त्यांचा कांहींच दोष नाहीं हें दिसून येईल. अत्यंत प्राचीन, किंवा काल्पनिक कथा याच मनुष्याच्या अद्‌भुत-रम्य भावनांचें पोषण करूं शकतात. निकटवर्ती वृत्तान्तामध्यें ती अद्‌भुतरम्यता येऊं शकत नाहीं. आजपर्यंतच्या सर्व महाकवींचीं उत्कृष्ट काव्यें अत्यंत प्राचीन इतिहासावर व काल्पनिक कथानकां-वरच रचलेलीं आहेत. तेव्हां पानपतचा वृत्तान्त तर राहोच, परंतु शिवाजीच्या चरित्रावरहि महाकाव्य होण्याचा समय पंतकालीं आलेला नव्हता. पंत हे एक भाविक अंतःकरणाचे भोळसट पुराणिक होते ( वस्तुतः ते तसे नव्हतेच ) असें मानिलें तरी, त्यांना निर-निराळ्या विषयांवर काव्यें लिहिण्यास सांगणाऱ्या अनेक सद्-गृहस्थांपैकीं एखाद्यानें तरी, सध्यां आपणांस स्फूर्तिदायक व अद्‌भुत वाटणाऱ्या मराठ्यांच्या इतिहासावर काव्य लिहिण्यास त्यांना कां सांगूं नये ! बाबा पाध्ये भर्तृहरीच्या कथानकांचें भाषांतर करण्यास सांगतात, पांडुरंगराय हरिवंश लिहिण्यास सांगतो, तर सदाशिव पाध्ये " कृष्णामाहात्म्य " मराठींत उतरण्याची आज्ञा करतो ! तात्पर्य, त्या वेळीं घडत असलेला मराठ्यांचा इतिहास तत्कालीन समाजाच्या मनांत अद्‌भुतरम्य कथांच्या रूपानें बिंबलेला नव्हता असेंच दिसून येतें. शिवाय पारतंत्र्यामध्यें गढलेल्या सध्यांच्या लोकांना विरोधामुळें पूर्वीचा स्वराज्याचा काल अत्यंत उज्ज्वल व

आदरणीय वाटतो तसा त्या कालांतच वावरणाऱ्या पंतादिकांना वाटण्याचें कारण नव्हतें. तात्पर्य, पंतांचें मन ज्या प्राचीन कथांमध्यें व विचारांमध्यें रमलें त्या कथांचा व त्या विचारांचाच त्यांनीं मनापासून एकाग्र वृत्तीनें उच्चार केला आणि हीच गोष्ट एकंदरीनें योग्य झाली. तसें ते न करते तर त्यांच्या कृति नीरस व फिक्या उतरून महाराष्ट्राच्या जिवंत वाङ्मयांत आज जें त्यांना उच्च स्थान आहे तें कधींहि प्राप्त झालें नसतें. ते कांहीं धंदेवाईक ग्रंथकार नव्हते; परमेश्वरभक्तीचा किंवा वाङ्मयसेवेचा त्यांनीं व्यावहारिक दृष्टीनें धंदा चालविला नव्हता. जे विचार, ज्या भावना व जीं राष्ट्रीय कथानकें त्यांच्या मनांत दाटून बाहेर वाट शोधूं लागलीं त्यांना त्यांनीं भाषेच्या द्वारा बाहेर पडण्यास वाट दिली येवढेंच. हाच त्यांचा निरपेक्ष व्यवसाय होता व त्यांतच त्यांना समाधान वाटत होतें. स्वतः पंत आपल्या मनाची ही तृप्त वृत्ति पुढील सुंदर शब्दांनीं प्रकट करतातः—

सजलजलदश्यामा ! रामा ! मनीं सुख वाटतें,
चरितचि तुझें भावें गावें असें मज वाटतें ।
जनकतनयाकांता ! शांताकृते रघुनायका !
पुरिव सदया ! कामा या माधवा वरदायका !

श्री० ना० बनहट्टी
( मयूरकाव्यविवेचन )

### प्रश्न व सूचना

( १ ) मोरोपंतांचीं काव्यें महाकाव्याच्या योग्यतेचीं आहेत असें कांहीं लोक मानतात. महाकाव्य म्हणजे काय ? महाकाव्यें म्हणून मानलेल्या मोरोपंतांच्या कांहीं काव्यांचीं नांवें सांगा. महाकाव्य व खंडकाव्य यांतील भेद ५–१० ओळींत सांगा.

(२) मोरोपंतांनीं देशाभिमान उत्पन्न करणारीं काव्यें कां लिहिलीं नाहींत?

(३) [अ] पुढील समासांचा विग्रह करून अर्थ सांगाः—परमार्थप्रवण, मयूरमुक्तेश्वरादि, निरपेक्ष.

[आ] कोणताहि ऐतिहासिक विषय काव्यविषय होण्याला मध्यंतरीं कांहीं काल लोटावा लागतो हें दर्शविण्याकरितां प्रो० बनहट्टींनीं कोणते दाखले घेतले आहेत?

[इ] तन्मय, द्वारा, तिन्हीत्रिकाळ या शब्दांवर व्याकरणात्मक टीपा द्या.

[ई] "कवीच्या हृदयांत जें स्फुरतें तेंच काव्यरूपानें बाहेर प्रकट होतें" या कल्पनेचा १० ओळींत विस्तार करा.

---

# सुपारी

[रा० यशवंत गोपाळ जोशी हे उदयोन्मुख लघुकथालेखकांपैकीं एक असून त्यांच्या लघुकथांमध्यें कौटुंबिक जीवनांतील साधे पण सुंदर देखावे चित्रित केलेले असतात. विशेषकरून प्रेमळपणा व ध्येयवादित्व हे गुण त्यांच्या गोष्टींत गर्भित असलेले दिसून येतात. पुढील गोष्टीमध्यें सात्त्विक करुणरस व कोमल हास्यरस यांचा इतका मिलाफ झाला आहे, कीं ही गोष्ट वाचीत असतां वाचकांच्या चेहऱ्यावर स्मित व डोळ्यांत अश्रु अशा प्रकारची स्थिति होऊन जाते. मार्मिक निरीक्षण, अंतर्मुख वृत्ति, मनाचा कोमलपणा व स्वाभाविक आशावादित्व या गुणांची देणगी असल्यास उच्च शिक्षणाच्या अभावीं देखील चांगल्या वाङ्मयाची निर्मिति होऊं शकते हें रा० य. गो. जोशी इत्यादिकांचे उदाहरणांवरून दिसून येतें.]

त्या वेळेला तिचें वय बारा वर्षांचें होतें आणि माझें अठरा वर्षांचें होतें. आज भाऊबिजेचा दिवस होता. कोंकणांतील माझे दोन चुलतभाऊ आज भाऊबिजेकरितां आले होते.

माझ्या बहिणीचें नांव सुभद्रा. वय बारा वर्षें हें वर आलेंच आहे. तिनें हट्ट घेतला, "आज भाऊबीज आहे; आज सगळा स्वैंपाक मीच करणार!"



य. गो. जोशी

"सोने–" —माझ्या बहिणीचें प्रचारांतलें नांव–"तांदूळ किती घेतलेस ग!" आईनें विचारलें.

"आईय्, तूं नको बोलूंस; मी आपल्या अदमासानं करतें सगळं–भाजीला तिखटमीठसुद्धां–मी आपल्या अदमासानं घालणार; अगदीं चिंचगूळसुद्धां!"

आई आणि माझे चुलतभाऊ घरगुती गोष्टी बोलत बसले होते. आईनें म्हटलें, "बरं, फजिती मात्र करून घेऊं नकोस हं!"

सुमारें तासभरानें आमच्या 'बाहिणाबाई'नें! पानें वाढल्याची वर्दी दिली. आम्ही सर्व भाऊ जेवायला बसलों.

"भाऊ, आमटी कशी झालीय् रे?"

"वा, छान!" आमटीचा भुरका मारीत मीं म्हटलें.

"होऽ! छान झाली म्हणतोस आणि वाटींतली मात्र संपत नाहीं!"

माझा नेहमींचा अनुभव आहे, कीं माझ्या बहिणीनें एकादा जिन्नस केला– तो मीं चांगला आहे असें म्हटलें– म्हणजे तो जिन्नस संपेपर्यंत मीं खाल्ला पाहिजे ! कारण जिनसेचा 'तुटवडा' पडणें हें जिन्नस चांगला झाल्याचें लक्षण असें माझ्या बहिणीचें तर्कशास्त्र होतें.

आतां मागचा भात घ्यायची वेळ आली होती. आंत भात उकरतांना भांड्याचा जो आवाज ऐकायला येत होता, त्यावरून भात संपुष्टांत आला होता हें मीं जाणलें.

भात वाढायला आल्यावर माझ्या चुलतभावानें विचारलें, "काय सोनूबाई, भात संपला वाटतें !"

"होय संपतोय्" असें म्हणत आग्रहाआगहानें चुलतभावांना तिनें भात वाढला. ताटांत फक्त चार शितें भात शिल्लक राहिला होता, व मला भात अजून घ्यायचा होता.

सोनूताई माझ्या पानाशीं आल्या व भाताचीं चार राहिलेलीं शितें माझ्या पानांत ढकलून घामाघूम झालेला आपला चेहरा हात खरकटे असल्यामुळें आपल्या मनगटानें पुशीत मला म्हणाल्या, "भाऊ, उठ रे आतां तूं ! तुझं पोट भरलंय् !"

मीं कुतूहलपूर्ण नजरेनें तिच्याकडे पाहिलें.

"ऊठ ना !"

"अग पण हो !"

आणि नंतर ती जी स्वैंपाकघरांत गेली ती आम्ही पानांवरून उठेपर्यंत कांहीं बाहेर आली नाहीं ! आमची हंसतां पुरेवाट झाली !

सख्खा भाऊ– त्याला हक्कानें उपाशी उठायला सांगायला काय हरकत आहे ? माझें पोट जरी थोडेंसें रिकामें होतें, तरी मी

आनंदानें उपाशीं उठलों. त्या तशा उपाशी उठण्यांत मला अतुल आनंद झाला होता.

* * *

आतां सोनूताई लग्न होऊन आपल्या सासरीं गेल्या होत्या. तिचें सासर परगांवीं होतें. तिला एक 'पुत्ररत्न' झालें होतें व त्या चिरंजीवांचें वय आज पांच वर्षांचें होतें. आजहि भाऊबिजेचा दिवस होता. पण मी होतों पुण्यांत; आणि ती होती परगांवीं. पुण्यांतहि माझी एक बहीण असल्यामुळें मी आमच्या सोनूताईकडे गेलों नव्हतों. नंतर तिनें सांगितलेल्या हकीगतीवरून व त्या हकीगतीला माझ्या कल्पनेचें साह्य देऊन ही हकीगत मीं लिहीत आहें.

रात्रीचे दहा-साडेदहा वाजले होते. सोनूताईच्या सासरीं भाऊबिजेच्या ओंवाळणीचा 'प्रोग्राम' होऊन गेला होता; पण सोनूताई आज कोणाला ओंवाळणार !

कुणीसें सांगितलें, " अग, तुझा भाऊ इथं नाहीं तर शकुनाचं देवाला आणि चंद्राला ओंवाळ तूं ! "

" बरं ! "

त्या दिवशीं संध्याकाळपासूनच सोनूताईच्या अंतःकरणांत चलबिचल चालली होती ! समुद्राच्या भरतीओहोटीप्रमाणें तिच्या मनांतले विचार खळखळत होते ! आणि समुद्रपाण्यावरून गार वारा वहावा त्याप्रमाणें तिचें श्वसन चाललें होतें ! ती समोर पाही— अगदीं लांब नजर पोंहोचेपर्यंत पाही ! तिला वाटे, हीं घरें, हीं झाडें, हे डोंगर उर्मटासारखे मधें उभे आहेत, नाहीं तर माझा 'भाऊराया' मला इथून दिसला असता ! तिनें दिवे लावले आणि सहजच ती दाराला हात देऊन उभी राहिली. तोंडानें शब्द नाहीं,

अंगाची हालचाल नाहीं– मला वाटतें श्वासोच्छ्वाससुद्धां एकदोन मिनिटें बंद होता किंवा असावा.

ती वेळ नक्की काय होती हरि जाणे ! त्याच वेळेला पुण्याला मलाहि थोडेंसें चुकल्याचुकल्यासारखें झालें होतें. त्या वेळेला मी माझ्या पुण्यांतल्या बहिणीकडून–'माई' तिचें नांव–ओंवाळून घेण्याकरितां पाटावर बसलों होतों आणि ओंवाळण्याकरितां म्हणून मीं तिला हांक मारली, " ए सोने––"

" सोनूताई परगांवीं आहेत बरं का." निरांजनासकट तबक हातांत घेत माई म्हणाली.

आणि अनुसंधानानें सांगायचें तर त्याच वेळेला बहुतेक 'सोनी' दरवाजांत स्तब्ध उभी असावी असें मला वाटलें. तिनें तिचा देह जागच्या जागीं उभा ठेवला. मनानें ती पुण्याला आली आणि बहुतेक म्हणूनच मीं 'माई'ला 'सोनी' म्हणून हांक मारली ! झालें; तिच्या मनाचेंहि समाधान झालें असावें, म्हणून तिचें मन परत गेलें. ती हंसली.

हें मध्यंतरींचें सांगितलें बरें का ! नंतर तिनें देवाला ओंवाळलें व अंगणांत जाऊन चंद्राला ओंवाळलें !

चंद्राला ओंवळणाऱ्या जगाच्या पाठीवर त्याच्या किती तरी बहिणी. तो प्रत्येकीला काय ओंवाळणी देणार ! आणि जी वस्तु बहिणींना ओंवाळणीला खरी पाहिजे असते ती देऊन कधींच संपत नाहीं. चंद्रानें समाधानाची व उत्साहाची ओंवाळणी घातली.

निरांजन ठेवण्याकरितां ती देवाजवळ गेली. तिचा लाडका मधु तिच्या पाठीला बिलगला आणि तिच्या खांद्यावरून आपला चिमुकला हात काढीत चिरंजीव बोलले, " आइय्, ही बघ मामाच्यावरची मीं ओंवाळणी घालतों तुला ! " असें म्हणून पठ्ठ्यानें एक सुपारी

तबकांत टाकली! तबकांतली सुपारी कडोसरीला खोंवून तिनें बाळाला– मधूला– उचलून घेतलें व प्रेमानें त्याचें सदाच अपुरें वाटणारें चुंबन घेतलें!

* * *

ही गोष्ट लिहितांना माझी फार गोंधळलेली स्थिति झाली आहे. ही 'गोष्ट' गोष्टीकरितां नाहीं! माझ्या मनाच्या सामाधानाकरितां आहे! म्हणून जशी जशी आठवण होते तशी तशी लिहीत आहें. त्यामुळें कथाप्रसंग मागेंपुढें होतील; पण त्याला माझा नाइलाज आहे! मी आपल्याकडून व्यवस्थित लिहिण्याचा प्रयत्न करणार आहें– पण छे, चुकलोंच!

मधली एक गोष्ट सांगावयाची राहिली. आमच्या पुण्याच्या बहिणाबाई ज्या होत्या त्या स्वभावानें अत्यंत तलख! एखाद्या प्रश्नाचें उत्तर यायचें तें विजेसारखें कडाडत! पण ती मायाळूहि तितकीच होती.

एका दिवाळीला काय झालें, अपराध होता माझाच कांहींसा, म्हणून आई मला बोलली. त्यावर मी आईला कांहीं तरी उलटून बोललों. त्या वेळेला आमच्या बहिणाबाई हजर होत्या. तितक्यांत मीं तिला कांहींसें काम सांगितलें, तों वीज कडाडली! "तुला आईची किंमत नाहीं तर मला तरी कशाला काम सांगतोस? मी नाहीं करीत तुझें कांहीं काम! आणि तुला आईला असें उर्मटपणानें बोलायचें असेल तर बोलत जाऊं नकोस माझ्याशीं– मला जरूर नाहीं तुझी!" आणि तिचे डोळे पाण्यानें भरून आले.

मी पुरुषी निष्ठुरतेनें म्हणालों, "बरं, बरं. बोलूं नकोस माझ्याशीं!" आणि मीं तिच्याशीं अबोला धरला. दिवाळी जवळ आली होती; नव्हे, आज नरकचतुर्दशीचा दिवस होता! माझी

बहीण घरीं आली होती. आम्ही अजून एकमेकांशीं बोलावयाला लागलों नव्हतों.

दुपारीं मायलेकी बोलत बसल्या होत्या. शेजारच्या खोलींतून मला त्यांचें बोलणें ऐकूं येत होतें.

" आईय्, भाऊ माझ्याकडून भाऊबिजेला ओंवाळून घेईल का ग ?" गांगरलेल्या चेहऱ्यानें तिनें आईला विचारलें.

" म्हणजे काय ?" आई म्हणाली.

" नाहीं, अजून बोलायला लागला नाहीं तो माझ्याशीं, म्हणून म्हणतें." मध्यें थोडा वेळ गेला आणि ती पुन्हा म्हणाली, " त्याला म्हणावं माझ्याकडून ओंवाळून घे ! मी ती घातलेली ओंवाळणी उचलायची सुद्धां नाहीं !" पदराच्या टोंकानें डोळे टिपीत ती म्हणाली.

मी पटकन् तिथें गेलों आणि म्हटलें, " माईय् !—"

" काय ?" घातलेली पालथी मांडी उचलून आळस देत ती म्हणाली.

" कांहीं नाहीं ! "

आम्ही एकमेकांकडे पाहून मनापासून हंसलों. आईनेंहि आमच्या हंसण्याला साथ दिली.

झालें,—पुढें काय लिहूं ? प्रसंगच संपला मग वर्णन तरी काय करूं ? मी मनांत काय बरें पुटपुटत होतों ? हं, केशवसुतांच्या काव्यांतील ओळ होती ती—

" ध्वनि हे ऐकुनि कितीकदां। दिडदा ऽ दिडदा ऽ दिडदा ! —"

*　　*　　*

ओंवाळून घेण्यांत आणि ओंवाळण्यांत काय असतें ? पैसे मिळविण्याकरितां का जेवण उपटण्याकरितां ? नाहीं, जें द्यायचें असतें—ध्यायचें असतें——

आतां मला अगदीं गहिंवरून आलें आहे; कारण ज्या 'प्रसंगा-करितां' म्हणून ही गोष्ट लिहायला घेतली, त्या प्रसंगाच्या आठवणीनें मला कांहीं सुचेनासें झालें आहे ! हिंवाळा—उन्हाळा—पावसाळा— माझ्या संसाराचा 'उन्हाळा' नुकताच झाला होता !

माझ्या बहिणींचा मी एकुलता एक भाऊ. आमच्या घरीं म्हणजे आतां मी व आई अशीं दोघेंच राहिलों होतों. माझी बायको नुकतीच वारली होती आणि सांपत्तिक दृष्ट्या माझी स्थिति अगदीं खालावली होती ! कारण कांहीं एक नाहीं ! एकादा धंदा माझ्या अंगावर आला नव्हता किंवा कांहीं नाहीं ! पण मला प्रसंग पाहून वागतां येत नव्हतें. आपल्याला जें योग्य वाटेल तें बोला-यचें आणि करायचें ! म्हणजे मी हेकेखोर नव्हतों. कुणीं सम-जावून सांगितलें— पटवून दिलें तर मी तसाहि वागत असें ! पण माझ्या अंतःकरणाला खोली नव्हती ! मी लौकर रागावत असें— लौकर थंड होत असें ! अगदीं 'स्टो'सारखें ! आतां पेट-लेला— किल्ली सोडली कीं पेटण्याचा मागमूस सुद्धां नाहीं ! पण सर्वांच्या मनोवृत्ति अशा असतात का ? आणि माझी मनोवृत्तीच चांगली म्हणून तरी कशावरून ?

लोकांच्यावर माझा लौकर विश्वास बसत असे आणि म्हणूनच मी प्रत्येक वेळीं फसत असें ! लोकांच्या वायद्यावर मी आपल्या देण्याघेण्याचे वायदे करीत असें, त्यामुळें माझा व्यवहार म्हणजे 'पोरखेळ' ठरला होता ! दुसऱ्यांनीं वायदा चुकविला तरी त्याची

सबब मला खरी वाटे ! त्याची मला कींव येई; पण या भोळसट-पणामुळें मी आपली स्वतःची किंमत गमावून बसलों होतों ! जगाकडे पाहण्याची माझी दृष्टीच मुळीं सदोष होती ! कोजागिरीच्या रात्रीं खेळीमेळीनें खेळायला जमावें–हंसावें–खिदळावें–मौज करावी, त्याप्रमाणें जगांत आपण खेळावयाला आलों आहोंत ही माझी कल्पना !

पण व्यवहार म्हणजे खेळ नव्हे ! एवंच काय, कीं कारण नसतांना मीं आपल्याभोंवतीं कर्जाचा बोजवारा उभा करून घेतला होता आणि त्यांत आणखी बायको मेलेली !

हो–तें एक सांगायचें राहिलेंच ! बायको मेली तेव्हांपासून मी होतां होईतों तिच्याविषयीं बोलणें टाळीत असें; पण जे एक एक शिष्ट येत करुणरसाची सारंगी घेऊन—मग कुणी आला कीं मीच सुरुवात करीत असें, " हें पहा मिस्टर, माझी किनई बायको मेली आहे. फार वाईट गोष्ट झाली; पण करणार काय आपण त्याला–" मग मात्र कुणी विचारीनासें झालें. अशांत दिवाळी आली. मीं ठरविलें होतें, दिवाळींत कांहींएक करावयाचें नाहीं. आपले हात पांघरून हंसतमुखानें आजूबाजूला पाह्यचें हीच आपली यंदाची दिवाळी !

व्यवहाराचे फटाकडे वाजवून आपले हात पोळले आहेत ! कशाला जा त्या धांगडधिंग्यांत ! वाटलें, जगाच्या सामन्यांतील 'आउट' झालेला 'गडी' म्हणून जगाचा खेळच आपण आपलें आपुलकीनें लांबून पाहात बसावें ! आणि जगानें पेटलेले फटाकडे आपल्या अंगावर टाकले तर—?

ही कल्पना मनांत आल्यावर मी आपला आपल्याशींच हंसलों !

दिवाळीचा सण तर मीं बहुतेक पार पाडला. आज शेवटचा भाऊबिजेचा दिवस—

सकाळींच आमच्या पुण्यांतल्या बहिणाबाई आल्या आणि म्हणाल्या, " भाऊ, आंघोळीला चल."

मनाला वाटलें आतां मी नको कसें म्हणूं ? बहिणीच्या चेहऱ्यावरची हास्याची फुलबाजी– तिच्या दृष्टीनें सुतकी ठरणाऱ्या माझ्या विचारानें विझवून टाकूं ? मग काय, मनांत नसतांना मी आपलें खेळणें करून घेऊं ?

" हें रे काय, चल ना लवकर. मला उशीर होतोय् ! " झाडसारवणुकीकरितां, रंगसफेती करण्याकरितां दिवाणखाना मोकळा करावा, त्याप्रमाणें माझ्या डोक्यांतील विचारांचा दिवाणखाना सताड उघडा आणि मोकळा झाला होता ! आणि तशा दिवाणखान्याचीं सर्व खिडक्यादारें उघडीं ठेविलीं आणि त्यांत दुपारचें उन्ह घुसलें म्हणजे तिथें कसें भयाण वातावरण निर्माण होतें, तसें माझें झालें होतें.

एक हात पाठीवर आडवा टाकून आणि दुसऱ्या हातानें स्वतःच्या नाकपुड्या दाबून धरीत मी बहिणीकडे पाहूं लागलों. तीहि माझ्याकडे पाहूं लागली. मला माझा श्वास आवरेना. गुलाबदाणींतून गुलाबपाणी जसें भुरुभुरु बाहेर येतें त्याप्रमाणें माझ्या नाकांतील श्वास सुटला आणि मीं गमतीनें हंसत म्हटलें, " चल ! "

आंतून आईनें विचारलें, " येतोय् का ग तो ? "

जमिनीवरचें कसलेंसें फडकें उचलीत बहीण म्हणाली, " हो ! "

मी अंगाला लावून घेण्याकरितां पाटावर येऊन बसलों. मला वाटलें काय थट्टा आहे ! भाऊबीज म्हणजे काय, दिवाळी म्हणजे

काय, ओंवाळणी म्हणजे काय आणि काय म्हणजे काय ! मी लहरींत येऊन एका तळहातावर दुसऱ्या हाताच्या बोटांनीं तबल्या-सारख्या टिचक्या वाजवायला लागलों.

अंगाला लावतां लावतां माझ्या बहिणीनें मला विचारलें, " भाऊ, आज भाऊबिजेला काय करूं ? "

" पिठलं आणि भाकरी ! "

" भलतंच काय रे बोलतोस ? "

" भलतंच नव्हे, हिशेबानें बोलतों आहें मी. भाऊबिजेला मेजवानी पिठलं आणि भाकरी व ओंवाळणीला आखी सुपारी ! खरंच आईय्, सुपारी आहे का ग घरांत ? " घरांत माझी एक भाची होती. विमला नांव तिचें.

पोरीनें खरोखरीच सुपारीच्या डब्यांत हात घातला. डब्यांत कांहींच नव्हतें. वांकडे तिकडे हात झाडीत विमल म्हणाली, " हुडुत ! आईय्, सुपारी नाहीं डब्यांत ! "

वरील वाक्य ऐकून मला काय अभिमान वाटला ! नाहीं म्हणजे एकाहि गोष्ट आज माझ्या घरांत नाहीं ! मी म्हणालों, " माईय्, आज आपली भाग्यशाली भाऊबीज ! चतुरशिंगीच्या रानांत वन-भोजनाला बसावें अशी माझ्या घरांत आज गंमत होणार आहे ! घर साहित्याशिवाय मैदानासारखें मोकळें आहे ! आणि आज आमच्या बहिणाबाई आपल्या खर्चानें आमच्या घरांत स्वैंपाक करणार आहेत. आज आपले घरांतच वनभोजन ! "

माझी बहीण करुणरसांत हंसली.

म्हणजे असें, माझ्या सध्यांच्या स्थितीबद्दल करुणा आणि त्या स्थितींत मीं धारण केलेल्या आनंदी वृत्तीबद्दल हंसणें !

वास्तविक भाऊबीजेला मी माझ्या बहिणीच्या घरींच जेवायला

जायचा; पण परिस्थितीच्या कड्यावरून खालीं पडल्यामुळें मी आप्तेष्टांत जायला लाजत होतों हें माझ्या बहिणीला माहीत होतें आणि म्हणूनच मला जेवायचें आमंत्रण आपल्या घरीं न करतां ती आपण होऊन माझ्याकडे आली होती.

सध्यां फक्त मी कल्पना करण्यांत तरबेज झालों होतों! आपल्या-भोंवतीं एकादी विशिष्ट परिस्थिति निर्माण झाली कीं, तीवर एखादी सुंदरशी कल्पना बसवायची– जगाचा अजिबात विचारच करायचा नाहीं–अशी माझी वृत्ति अलीकडे झाली होती.

त्याप्रमाणें मीं एक कल्पना बसविली. आजपर्यंत झालेल्या भाऊबीजेंत आजचीच भाऊबीज मला गमतीदार वाटत होती!

एकाद्या कुंडींत आपल्याला एकादें फुलझाड लावावयाचें असलें म्हणजे आपण अगोदर त्या कुंडीच्या तळाशीं एक बारीकसें भोंक पाडतों आणि मग त्यांत माती भरून फुलझाड लावतों. घड कुंडीला भोंक पाडण्याचें काय कारण? मला वाटतें आपल्या मनो-भावनेच्या कुंडीलाहि असेंच छिद्र असायला पाहिजे, तरच आपल्या प्रकृतीला मानवेल येवढी सुखदुःखाची आंच कायम ठेवून बाकी या छिद्रावाटे वाहून जाईल आणि आपल्या मनाचें झाड प्रफुल्लित राहील. सुंदर विचारा-आचारांचीं फुलें येतील त्याला!

मी आंघोळीला बसलों. माझी बहीण मला पाणी घालीत होती. आज माझ्या घरांत पाण्याची मात्र विपुलता होती! दोन-तीन बादल्या पाणी आज माझ्याकरितां तापविलें गेलें होतें. तें तपेलीनें माझी बहीण माझ्या अंगावर ओतीत होती आणि एखाद्या पुष्करणींतील कारंज्याखालीं बसून जलक्रीडा करावी अशा थाटानें माझी आंघोळ चालली होती. मध्येंच बहिणीनें म्हणावें, "भाऊ, पाठ चोळूं का रे?" मीं म्हणावें, "हुं."

आणि बहीण पाठ चोळूं लागली. त्या हस्तस्पर्शापुढें व्हाइट रोज, व्हिनोलिया, खस, चंदन वगैरे साबण रद्द होते !

आंघोळ झाली. पदार्थ अगदीं थोडा असला, कीं आपण त्याला देवाचा 'नैवद्य' म्हणतों, आज मीहि दैवीवृत्तीच्या गप्पा मारीत होतों; म्हणून देवाच्या 'नैवेद्या'प्रमाणें शिरा मला मिळाला. तो खाऊन मोठी कोरडी ढेंकर देऊन मी आपल्या खोलींत आलों.

" भाऊ, जातें हं. संध्याकाळीं ओंवाळायला येईन आतां ! "

मीं 'बरं' म्हटलं आणि बहीण निघून गेली ! मी संध्याकाळची वाट पहात बसलों. आणि मी वाट पहात बसलों नसतों तरी संध्याकाळ झालीच असती ! पण मी—

अखेर संध्याकाळ झाली. माझ्या घराच्या मोकळ्या मैदानांत अन्नपूर्णेनें—माझ्या बहिणीनें—येऊन स्वैंपाक तयार केला; आणि आईला म्हणाली, " आईग्, अगोदर ओंवाळायचं ना ? "

" हं ! " माझी आई म्हणाली.

" भाऊ, चल ना बस पाटावर."

ओंवाळायची तयारी झाली.

व्यवहाराला लाज नसेल, पण अंतःकरणांतली लाज कशी नाहींशी होणार ?

बहिणीनें ओंवाळायला हांक मारतांच माझ्या अंतःकरणानें झट्कन् अश्रूंचे फवारे माझ्या डोळ्यांतून बाहेर फेंकले आणि तीच 'ओंवाळणी' घेऊन मी पाटावर येऊन बसलों, व केंविलवाण्या स्वरांत आईला म्हणालों, " आईग्, बघ ना एकादी सत्तेची सुपारी आपल्या घरांत असली तर ! "

आई उठली. तिनें एकदोन डबे चांचपले; कुठें एक हिरड्या-

---

१ हें नांव नव्हे, विशेषण आहे !

बेहड्यांचा डबा होता तो उघडून पाहिला. त्यांत एकुलती एक सुपारी सांपडली. "हं ही घे." आईनें तिथूनच सुपारी टाकलीन् आणि पाटावर बसून मीं ती अलडपणानें झेलली. बहिणीनें मला ओंवाळलें. मीं सुपारी ओंवाळणी म्हणून टाकली, आम्हां बहीण-भांवडांना गहिंवरून आलें; पण तेच अश्रु पचवून आम्हीं त्यांचा आनंद निर्माण केला !

असेहि कांहीं दिवस गेले. अलीकडे मला व्यवहार थोडासा कळूं लागला होता; म्हणून संपत्तीचा केरकचरा माझ्या घरांत पुन्हा सांचत चालला होता !

या गोष्टीला नऊ दहा महिने झाले. मला वाटलें, आपण आतां पोटभर सुखानें जेवतों आहोंत. आपल्या बहिणींनाहि माहेरपणाला बोलावून घ्यावें आतां; म्हणून मी परगांवच्या बहिणीला पत्र लिहिलें. ती उलट टपालानें उत्तर यावें त्याप्रमाणें मुलांसकट आली, आणि माझी पुण्यांतली बहीण बाळंतपणाकरितां म्हणूनच आमच्याकडे आली. आठपंधरा दिवसांनीं ती बाळंतीण झाली. तिला मुलगा झाला. आज त्याचें बारसें होतें. बारशाचा स्वैंपाक सर्व झाला; पण फक्त केशर आणायचें राहिलें होतें. आई म्हणाली, " भाऊ, केशर घेऊन येतोस काय ? "

बहीण ऐकतच होती; ती म्हणाली, " आतां कशाला उन्हाचा पाठवितेस त्याला केशर आणायला ? माझ्या ट्रंकेंत आहे केशर." असें म्हणून बहिणीनें ट्रंकेची किल्ली माझ्यापुढें फेंकली. ती घेऊन मीं बहिणीची ट्रंक उघडली. केशराची डबी तर मला सांपडलीच; पण त्याच्याच शेजारीं एक मखमलीची डबी होती. ही काय भानगड आहे हें बहिणीला विचारावें म्हणून ती डबी घेऊन मी तिच्याकडे गेलों व तिला विचारलें, " माईय्, काय आहे ग या

डबींत?" कल्पना नसतांना नाटकांत एकदम ट्रान्फर सीन उघडावा तसें झालें !

माझी बहीण ताडकन् बाजेवरून उठली आणि माझ्या हाताला झोंबून ती डबी घेऊं लागली व तोंडानें बडबडत होती, "तुला काय करायचे आहे रे ? माझी आपली गंमत आहे त्यांत !" आणि माझ्या हाताशीं झोंबत आईकडे वळून म्हणाली, 'आईय् बघ ग!'

आई ती गंमत खरेंच पहात होती ! मीं त्या धांदलींत पटकन ती डबी उघडून पाहिली तों त्यांत काय— ! एक सुपारी होती ! "हें काय ग माई ? हीच का गंमत ? आणि ही सुपारी मीं पाहूं नये म्हणून का झटलीस तूं माझ्या अंगाशीं ! कसली आहे सुपारी ती ?"

लाजून जमिनीकडे व आईकडे पहात माई म्हणाली, "भाऊबिजेच्या ओंवाळणीची !"

कांचेला पारा लावला कीं त्याचा आरसा होतो, आणि त्यांत आपलें तोंड दिसतें; व पारा काढून टाकला कीं त्या कांचेंतून आपण आरपार पाहूं शकतों; आणि त्या कांचेंत आपण आपलें तोंड पाहण्याचा प्रयत्न केलाच तर अगदीं फिकट दिसतें ! गेल्या भाऊबिजेच्या ओंवाळणीची सुपारी एवढें ऐकल्याबरोबर माझी जी भांबावल्यासारखी वृत्ति झाली होती ती सांवरीत असतांनाच कांच, पारा, आरसा वगैरे विचार माझ्या मनांत आले ! काय त्याचा अर्थ असेल परमेश्वर जाणे ! "भाऊबिजेची सुपारी ! काय ग, एवढी जपूनशी ठेवली आहेस ?"

पदरानें आपले डोळे पुशीत ती म्हणाली, "मला ती पाहूनच आनंद वाटतो. माझ्या जिवाचा तो विरंगुळा आहे ! माझं माहेरचं सुख त्या सुपारींत भरलं आहे असं मला वाटतं !" इतक्यांत आमच्या

परगांवच्या बहिणाबाई तिथून बाहेर गेल्या व त्याहि हातांत एक सुपारी घेऊन आल्या व म्हणाल्या, " भाऊऽ, खरंच, कां असं होतं कुणास ठाऊक ? ही पाहिलीस का, माझ्या मधूनं थट्टेनं ही सुपारी मला ओंवाळणी म्हणून घातली आहेन्‌ ! लुच्चा म्हणाला, 'आईय्‌, मामा नाहीं इथं, मी घालतों तुला ओंवाळणी'. म्हणून ही सुपारी घातलीन्‌ ओंवाळणीच्या तबकांत; मला नवल वाटलं म्हणून ती सुपारी मीं तशीच जपून ठेविली आहे ! "

लहान मुलांना एकादी गोष्ट सांगितली कीं, लगेच जसें त्या गोष्टींतील तात्पर्य आपण त्यांना समजावून सांगतों त्या थाटांत मीं प्रवचन चालू केलें, " माई, सोने, आनंद--गंमत--मौज आहे ! सगळ्या सुखदु:खांची चव या सुपारीसारखी आहे; फक्त भावनेचा ओलावा पाहिजे ! आपण पूजा करतांना, लग्नसमारंभांत देवतांचं आवाहन या सुपारीच्या रूपानं करतों--काय ? "

मला पुढें शब्द आठवेना. मला गहिंवरून आलें. बहिणींच्या डोळ्यांतहि आंसवांचा पाऊस भरून आला. मी पुन्हा बोलण्याचा प्रयत्न केला; पण--" काय--काय--काय," यापलीकडे माझी जीभ वळेना. अखेर आवंढा गिळून मीं म्हटलें, " भगिनींनो, सुपारींत आपण सुख पाहूं शकतां-- काय तुमच्या प्रेमळपणाचं वर्णन करावं ! मी तुमचा भाऊ आहें याबद्दल मला धन्यता वाटते. प्रेमळ पांखरांनो, असेंच आनंदांत नाचा-- बागडा. सुखाचें सार सुपारींत पाहण्यांत मोठेपणा आहे--उदात्तपणा आहे ! " मीं आपलें बोलणें संपविलें; कारण त्या प्रेमळ प्रसंगानें त्या भारून गेल्या होत्या आणि वटवट फक्त माझीच चालली होती. अखेर मीहि थांबलों आणि पुतळ्या-प्रमाणें निश्चल उभ्या राहिलेल्या त्या निर्व्याज प्रेमदेवतांकडे आनंदानें हुरळून पाहात राहिलों.

अशा भारलेल्या स्थितींत किती तरी वेळ निघून गेला. कोणीच हालेना. अखेर 'बाजेवरची सारंगी' वाजूं लागली तशी माई पसार झाली. तिनें आपल्या बाळाला घेतलें आणि एकीकडे त्याला स्तनपान देत ती माझ्याकडेच पाहत होती. असा मायेचा ओलावा माझ्याभोंवतीं असतांना मी 'सुखी' नाहीं हें म्हणण्यांत काय अर्थ आहे !

य० गो० जोशी
( पुनर्भेट )

## प्रश्न व सूचना

( १ ) 'वसंति हि प्रेम्णि गुणा न वस्तुनि' ( प्रेमामध्यें गुण असतात, वस्तूंमध्यें नव्हे' यावर ३० ओळींपर्यंत एक निबंध लिहा.

( २ ) प्रस्तुत गोष्टीमध्यें कथानकाचे धागे मागेंपुढें झालेले दिसतात. हा दोष कीं काय याची चर्चा करा.

( ३ ) या गोष्टींतील योगायोगाचीं उदाहरणें सांगून तीं कितपत निर्दोष आहेत याचें विवेचन करा.

( ४ ) या गोष्टींत लहान लहानच पण मोठे हृदयद्रावक असे कांहीं प्रसंग वर्णिलेले आहेत. त्यांतील कांहींचा निर्देश करून एकांतील रसाचा किंचित् विस्तारानें आविष्कार करा.

( ५ ) पुढील वाक्यांचा ससंदर्भ अर्थ सांगाः—

[ अ ] हिंवाळा, उन्हाळा, पावसाळा—माझ्या संसाराचा 'उन्हाळा' नुकताच झाला होता.

[ आ ] पण व्यवहार म्हणजे खेळ नव्हे.

[ इ ] जगाच्या सामन्यांतील 'आउट' झालेला 'गडी' म्हणून जगाचा खेळ आपण आपलें आपुलकीनें लांबून पहात बसावें,

[ ई ] अखेर बाजेवरची 'सारंगी' वाजूं लागली.

( ६ ) [ अ ] 'नीरांजन', 'संपुष्ट' व 'चिरंजीव' यांची व्युत्पत्ति द्या.

[ आ ] पुढील समासांचा विग्रह कराः—

अतुल, भाऊबीज, निर्व्याज.

[ इ ] पुढील शब्दांचे किंवा शब्दसमूहांचे अर्थ सांगाः—

वायदा, संपुष्टांत येणें, हंसण्याला साथ देणें.

( ७ ) [ अ ] बहिणाबाई, भाऊराया, चिरंजीव, पुत्ररत्न या शब्दांतील विनोद कसा साधला आहे हें दाखवा.

[ आ ] या गोष्टींतील विनोदाची उभारणी केवळ शाब्दिक कोट्यांवर न करतां विशिष्ट प्रसंगांवर केलेली आहे हें उदारणांनीं स्पष्ट करून सांगा.

---

# संदर्भ-ग्रंथ



विद्यार्थी व शिक्षक यांना पुढील ग्रंथांचा चांगला उपयोग होईल. ते प्रत्येकापाशीं नसले तरी निदान शाळेच्या ग्रंथालयांत तरी ते अवश्य असले पाहिजेत.


(१) **मराठी-इंग्रजी कोश** ( मोल्स्वर्थ )
(२) **सरस्वती कोश** ( वि. वा. भिडे )
(३) **शब्दकोश** ( भाग चवथा प्रसिद्ध झाला आहे; शब्द-कोश-मंडळ )
(४) **गीर्वाण लघुकोश** ( ज. वि. ओक )
(५) **संस्कृत-इंग्रजी कोश** ( वा. शि. आपटे )
(६) **फार्सी-मराठी कोश** ( मा. त्रिं. पटवर्धन )
(७) **मराठी शब्द-रत्नाकर** ( वा. गो. आपटे )
(८) **प्राचीन चरित्रकोश** ( सिद्धेश्वरशास्त्री चित्राव )
(९) **अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक** ( गं. दे. खानोलकर )
(१०) **भाषाशास्त्र** आणि **मराठी भाषा** ( कृ. पां. कुलकर्णी )
(११) **मराठी भाषा–उद्‌गम** आणि **विकास** ( कृ. पां. कुलकर्णी )
(१२) **महाराष्ट्र–सारस्वत** ( वि. ल. भावे )
(१३) **मराठी गद्याचा इंग्रजी अवतार** ( द. वा. पोतदार )
(१४) **प्रतिभा–साधन** ( ना. सी. फडके )
(१५) **अभिनव काव्यप्रकाश** ( रा. श्री. जोग )
(१६) **शास्त्रीय मराठी व्याकरण** ( मो. के. दामले )
(१७) **मराठी भाषेची घटना** ( रा. भि. जोशी )
(१८) **मराठी वाक्प्रचार व म्हणी** ( वि. वा. भिडे )
(१९) **मराठीची सजावट** ( मुजुमदार–सांगली )
(२०) **काव्यालोचन** ( द. के. केळकर )
(२१) **सारस्वत–समीक्षा** ( आगाशे )


---

# चरित्रें व टीपा



## कोल्ह्याचें शहाणपण

पंचोपाख्यानाचे पूर्वी मराठींत महानुभावीय लेखकांनींच थोडेंसें गद्य लिहिलें; या वाङ्मयाचे नमुने रा० य. खु. देशपांडे यांच्या पुस्तकांत व भावे यांचे 'महाराष्ट्र सारस्वतां'त पाहावयास सांपडतील. एक नमुना म्हणून खालीं ५-६ ओळी दिल्या आहेतः— गांवां हस्ती आला तै जात्येंध[1] हस्तीतें पाहों गेले : एकें पावो देखिला : एकें सोंड देखिली : एकें कानु देखिला : एकें पाठि देखिली : एकें पोट देखिलें : एकें पूंस[2] देखिलें : मग एकमेकेंसीं सवादति : हारे तुवां हस्ति देखिला : पावो देखिला तो म्हणे हस्ति खांबासारिखा : सोंड देखिली म्हणे हस्ति मूसळासारिखा : कानु देखिला तो म्हणे हस्ति सूपासारिखा : पाठि देखिली तो म्हणे हस्ति भिंतीसारिखा : पोट्ट देखिलें तो म्हणे हस्ति कोथळेयासारिखा : पूंस देखिलें तो म्हणे हस्ति खरोट्यासारिखा : ऐसें एकमेका उरोधीति : तेयांमध्यें डोळसू असे तो म्हणे हा हस्तीचा एकेकु अवयेवु होय : पर हस्ति नव्हे : ऐसा अवयवी युक्त तो हस्ती : ॥

[ या धड्यांतील ओळ ११ मध्यें 'खादतु' या शब्दाबद्दल ग्वाल्हेरचे प्रो० रा. ह. दिवेकर हे 'राखतु' असा पाठ सुचवितात तोच बरोबर दिसतो. ]

---

## छत्रपति शिवाजीचें एक पत्र

पुस्तकांत दिलेल्या पत्रावरून शिवाजीचे काळीं फारशीचा किती अंमल होता हें दिसून येईल. त्याचे अगोदर सुमारें १५० वर्षांपूर्वी लिहिलेल्या एका पत्रांतील उतारा खालीं दिला आहे. त्यावरून त्याहि काळीं फारशीचा अंमल व्यावहारिक बाबतींत तरी जारी होता हें ध्यानांत येईल.

---

१ जन्मापासून आंधळा. २ पुच्छ, शेंपूट.

"आज रखूतखाने राजश्री बाबाजी राजे भोसले दामदौलतहू बिजानेबु कारकुनानी हाच व इस्तकबाल व मोकदमानी कसबे पाडेपेडगौऊ विदानद सुा समान तिसैन व तिसा मया दरवज इनाम बदल धर्मादाऊ बो। रामेस्वरभट बिन नारायणभट चिंतामनीभट बिन बालंभट सेकिन आरबी मुदगल हर्चो जमीन दर सवाद प्रज रामजी चिखलठाणा गजशरायनी चावर १। सवा एदमो नख्तथाती व महसुल कुलबाब कुलकानू दिधले असे दुमाला कीजे अवलादी अफलादी चालो दीजे दर हर साल खुर्दखताचा उजूर न कीजे तुम्ही तालीक घेऊनु असेली खुर्दखत इनामदार मजकुरापासी दीजे मोर्तबु तारीख २५ माहे जमादिलोवलु"

हा उतारा मराठी म्हणण्यापेक्षां फारशी म्हटला असतांच जास्त शोभेल. शिवकालीन दुसरीं कांहीं पत्रें पाहणें असल्यास राजवाड्यांचा एतद्विषयक खंड पाहावा. (अर्थ लावण्याची इच्छा असल्यास जिज्ञासूंनीं प्रो० मा. त्र्यं. पटवर्धन यांच्या फार्सी-मराठी कोशांत शब्द पहावेत.)

---

## वंशपरंपरा वतनें कां देऊं नयेत

'लोकीं जे कोणास न होय', 'सकतात', 'होत्साता', 'उपयोगास येई अशी'—या रूपांकडे व 'भूपति असें भूकरितां म्हणावें' यांतील 'करितां' या शब्दांच्या अर्थाकडे लक्ष द्यावें.

---

## वसई फत्ते झाली

राजवाडे व पारसनीस यांनीं छापलेल्या मूळ पत्रांत

वसई वसई होती त्याबद्दल वसई बसई होती असें वाचलें पाहिजे.

त्या वेळच्या राजकारणी व व्यावहारिक लोकांच्या बोलण्याच्या व लिहिण्याच्या ओघांत आलंकारिक वाक्यें कशीं येत होतीं हें पाहण्यासारखें आहे. भावना प्रबल असल्या व जवळ बोलण्यासारखें असलें म्हणजे अनुरूप भाषेसंबंधीं फार काळजी करावी लागत नाहीं हें यावरून दिसून येईल.

बाजीराव-चिमाजीअप्पांसारखे मोठमोठे व्यवहारकुशल लोक देखील गुरूच्या भजनीं लागत असत हें विचार करण्यासारखें आहे.

ब्रह्मेंद्रस्वामीसंबंधानें राजवाडे यांचें मत प्रतिकूल व पारसनीस यांचें अनुकूल होतें. जिज्ञासूंनीं दोघांचेहि ग्रंथ पहावेत. त्याचप्रमाणें सानेकृत साष्टीची बखर व सरदेसाई यांनीं संपादिलेले 'पेशवे दप्तरांतून' निवडले कागद यांतील 'वसई मोहीम' पा. १६ पहा. यशवंत नरसिंह केळकर यांनीं लिहिलेलें 'वसईची मोहीम' हेंहि जिज्ञासूंनीं पहावें.

---

## पानपतचा पळ

पानपतसंबंधीं 'भाऊसाहेबांची बखर' तर विद्यार्थ्यांनीं वाचण्याजोगी आहेच; पण त्याशिवाय रघुनाथ यादवकृत पानपतची बखर ( साने यांनीं संपादिलेली ) व चिंतामणराव वैद्य यांची 'दुर्दैवी रंगू' ही कादंबरी, हीं पुस्तकें वाचण्यासारखीं आहेत.

---

## शिवाजीमहाराजांचा निधनप्रसंग

ऐतिहासिक सत्याचे दृष्टीनें बखरींत कितपत विश्वास ठेवतां येईल यासंबंधीं शिक्षकांनीं विद्यार्थ्यांशीं चर्चा करावी.

चिटणीस-घराण्यासंबंधीं व चिटणिशी कामासंबंधीं अधिक माहिती हवी असल्यास महाराष्ट्रीय ज्ञानकोश भाग १३ पाहावा.

सदर मल्हारराव चिटणीस हा सातारचे प्रतापसिंह छत्रपतींचा चिटणीस असून त्यास सर्व चिटणीशी दफ्तर उपलब्ध होतें. प्रसिद्ध इतिहासकार ग्रँट डफ् यानें मराठयांचा इतिहास लिहितांना चिटणिशी बखरींचा बराच उपयोग केला आहे.

---

# नुकसान झालें पण दोष कोणाचा ?

इंग्रजी अंमलाच्या अव्वल अमदानींत मराठी भाषांतरित व शालोपयोगी पुस्तकें बरींच निर्माण झालीं. यासंबंधीं व तत्कालीन इतर लेखकांसंबंधीं अधिक माहिती प्रो० पोतदार यांच्या 'मराठी गद्याचा इंग्रजी अवतार' या पुस्तकांत पाहावयास सांपडेल.

---

# शतपत्रांचा इत्यर्थ

**गोपाळ हरि देशमुख ऊर्फ 'लोकहितवादी':**—( १८२३–१८९२ ). यांची योग्यता त्यांचे वेळच्या लोकांना जरी कळली नाहीं व गोपाळरावांना छळवाद सोसावा लागला तरी अलीकडे ती कळूं लागली आहे, व त्यांचेबद्दलचा आदर वृद्धिंगत होत चालला आहे. त्यांनीं आपला मुलगा शिक्षणाकरितां विलायतेस पाठविला याबद्दल त्यांना ज्ञातिबहिष्कृत करण्याचा प्रयत्न झाला ही एकच गोष्ट तत्कालीन समाजाची मनःस्थिति दर्शविण्यास पुरेशी आहे. लोकहितवादी हे विद्वान् असून त्यांना मराठी, संस्कृत व इंग्रजी यांशिवाय गुजराथी, फारशी व हिंदुस्थानी या भाषाहि अवगत असत. "जो कोणी भेटेल त्याला विचारून माहिती मिळवावी, इंग्रजी ग्रंथ वाचून त्यांवरूनहि टिपणें करावीं व एखाद्या वर्तमानपत्रांत ती माहिती प्रसिद्ध करावी असा त्यांचा नित्य परिपाठ असे......विद्यार्जनाच्या दुकानांतील रोजकीर्द असें नांव त्यांच्या ग्रंथांना देतां येईल." ( न. चिं. केळकर )

लोकहितवादींसंबंधीं अधिक माहिती पुढील ग्रंथांत मिळेलः—

( १ ) प्रो० ग. ह. केळकर यानीं लिहिलेलें लोकहितवादींचें चरित्र; ( २ ) कृ. ना. आठल्ये यांनीं लिहिलेलें चरित्र; ( ३ ) न. चिं. केळकरकृत टिळकचरित्र भाग १; ( ४ ) महाराष्ट्रीय ज्ञानकोश; ( ५ ) न. र. फाटककृत रानडे यांचें चरित्र.

## ज्यास कोणत्याहि गोष्टीची ददात नाहीं त्याची ददात

**कृष्णशास्त्री चिपळूणकरः**—( १८२४-१८७८ ). प्रथम यांनीं पुण्याच्या पाठशाळेंत वेदपठण व शास्त्राध्ययन केलें. ते इतके बुद्धिवान् होते, कीं त्यांचे गुरु मोरशास्त्री साठे हे त्यांस बृहस्पति म्हणत असत; व त्यांनींच १८४८ चे सुमारास इंग्रजी शाळा उघडलेली पाहून व पुढील सर्व भविष्य ओळखून कृष्णशास्त्र्यांना असा उपदेश केला कीं, “याउपर खांद्यावर शालजोडी टाकून हिंडण्यांत प्रतिष्ठा राहणार नाहीं; तूं शहाणा असलास तर इंग्रजी शीक.” शिष्यानें गुरूचा हा उपदेश मान्य करून लवकरच इंग्रजींत प्राविण्य मिळविलें. इंग्रजी विद्याभ्यास आटोपल्यावर १८५२ मध्यें त्यांना ट्रान्स्लेशन एक्झिबिशनरची जागा मिळाली. ज्या पाठशाळेंत ते शिकले त्याच पाठशाळेंत ते पुढें प्रोफेसर झाले. हळुहळू त्यांचा सरकारांतील हुद्दा व लोकांतील मानमान्यता वाढत जाऊन पुण्यांतील विद्वान व थोर मंडळींत ते अग्रस्थानीं आले. त्यांनीं ‘शाळापत्रकां’त व्याकरणावर जे निबंध प्रसिद्ध केले ते मोठे मार्मिक आहेत. जॉन्सनचें ‘रासेलस,’ व ‘अरेबिअन नाइट्स’ यांचीं त्यांनीं केलेलीं भाषांतरें सर्वमान्य झालीं आहेत. त्यांचा “अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह” हा विविध माहितीनें भरलेला ग्रंथ विद्यार्थ्यांना फार उपयुक्त आहे. ‘साक्रेतिसाचें चरित्र’ लहान पण गोड आहे. ते कविताहि सुंदर करीत, पण त्या बहुतेक भाषान्तरात्मक आहेत. त्यांच्या ‘पद्यमंजरी’त त्यांचीं सर्व भाषांतरित काव्यें आलीं आहेत. पैकीं त्यांचें ‘मेघदूता’चें भाषांतर उपलब्ध भाषांतरांत अद्यापि श्रेष्ठस्थानीं आहे. त्यांची ‘विद्याप्रशंसा’ विद्यार्थ्यांच्या परिचयाचीच आहे. मिशनऱ्यांचा हिंदुधर्मावर हल्ला चढलेला पाहून त्यांनीं ‘विचारलहरी’ नांवाचें वर्तमानपत्र काढलें होतें; पण तें फार वर्षें चाललें नाहीं.

कृष्णशास्त्र्यांचे ग्रंथांमुळें मराठी भाषेला एक प्रकारचें सरळ, सुगम व भारदस्त असें वळण लागलें. त्यांचें लिखाण मनाला आनंद देतें, परंतु स्वतंत्र प्रतिभेचें तेज त्यांत नसल्यामुळें त्यांची लोकप्रियता फार काळपर्यंत टिकणें शक्य नव्हतें.

**संदर्भग्रंथः**–विष्णुशास्त्री चिपळूणकरचरित्र (लक्ष्मणराव चिपळूणकरकृत).

---

## टीकाकाराचे अंगीं अवश्य असलेले गुण

**विष्णुशास्त्री चिपळूणकरः**—( १८५० ते १८८२ ). हे कृष्णशास्त्री चिपळूणकरांचे चिरंजीव. कृष्णशास्त्र्यांना मिशनऱ्यांचा स्वधर्मावरील हल्ला बराच बोंचला, तसाच विष्णुशास्त्र्यांना इंग्रजी राज्याचा, त्यांच्या चाली-रीतींचा वगैरे हल्ला बोंचला. त्यांना इंग्रजी राज्यापासून होऊं शकणारे फायदे कळत होते, पण हे फायदे करून घेण्याची लायकी उत्पन्न करून घेण्याकरितां स्वदेशबांधवांचें जाड्य घालवून त्यांच्यांत स्वाभिमान जागृत करणें त्यांना आवश्यक वाटलें. इंग्रजांचे गुण घेण्यासारखे असतील ते अवश्य घ्यावेत असें त्यांचें म्हणणें होतें. स्वदेशीयांची जागृती राजकारणाच्या बाबतींत नव्हे तर इतर सर्व बाबतींत करण्याचा त्यांचा प्रयत्न होता. शिक्षणाचा प्रसार व्हावा व तें आपल्या हातांत असावें म्हणून त्यांनीं १८८० मध्यें 'न्यू इंग्लिश स्कूल' काढलें; कलाभिवृद्ध्यर्थ 'चित्रशाळा' स्थापिली; लोकजागृतीकरितां 'केसरी' हें वर्तमानपत्र काढलें; पर-प्रांतांत लोकजागृतीचें काम करण्याकरितां 'Mahratta' हें इंग्रजी वर्तमानपत्र काढलें; वाचनाभिरुचि वाढविण्याकरितां व सुधारण्याकरितां 'निबंधमाला' मासिक काढलें, व पुस्तकें मिळण्याची सोय करून वाचनाभिरुचीचें पोषण करण्याकरितां 'किताबखाना' काढला आणि ग्रंथप्रकाशनासाठीं 'आर्यभूषण' छापखाना काढला.

**संदर्भग्रंथः**—( १ ) विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचें चरित्र ( लक्ष्मणराव चिपळूणकर );(२)विष्णु कृष्ण चिपळूणकर, टीकात्मक निबंध (गजानन त्र्यंबक माडखोलकर ); (३) महाराष्ट्राचे पंचप्राण ( करमरकर ); (४) विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचें द्विविध दर्शन ( बनहट्टी व माडखोलकर ).

---

## स्त्रीपुरुषांना एकच शिक्षण व तेंहि एकत्र द्यावें

**गोपाळ गणेश आगरकरः**—( १८५६ ते १८९५ ). यांचें ध्येय विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचेप्रमाणेंच देशाची सर्वांगीण सुधारणा व्हावी असें होतें. तेहि शास्त्रीबुवांच्या न्यू इंग्लिश स्कूलच्या आद्यसंस्थापकांपैकीं एक होते. फर्ग्युसन कॉलेजचे ते प्रिन्सिपल होते. या संस्थेच्या द्वारेंच नव्हे तर

वर्तमानपत्राच्या व स्वतःच्या उदाहरणाच्या द्वारें ते लोकशिक्षणाचें काम करीत होते. राजकारणाकडे त्यांचें दुर्लक्ष होतें हें म्हणणें अगदीं चूक आहे, पण सामाजिक प्रश्नांकडे त्यांचा अधिक ओढा हें मात्र खरें. १८८८ मध्यें त्यांनीं 'सुधारक' काढला. मागें दिलेल्या उताऱ्यावरून त्यांच्या विचारांची दिशा कळून येईल. भाषाप्रभुत्वादि त्यांत चांगलें दिसून येईल. 'सुधारकां-तील त्यांच्या लेखांशिवाय त्यांचा व्याकरणावर 'वाक्यमीमांसा' नांवाचा एक विस्तृत निबंध आहे; 'आमचे डोंगरीवरील १०१ दिवस' हें लहानसें पुस्तक व 'हॅम्लेट' नाटकाचें मराठी भाषांतर 'विकारविलसित' हीं त्यांचीं दोनहि पुस्तकें भाषेच्या दृष्टीनें सुंदर आहेत. त्यांचीं समाजसुधारणेसंबंधीं मतें लोकांना आवडणारीं नव्हतीं; शिवाय "इष्ट असेल तें बोलणार व शक्य असेल तें करणार" अशा प्रकारची त्यांची बाणेदार वृत्ति होती, म्हणून त्यांच्यावर लोकनिन्देचे पुष्कळ प्रहार झाले, पण ते कधींहि डगमगले नाहींत. त्यांचा स्वभाव फार शान्त, उदार व प्रेमळ होता.

**संदर्भग्रंथः**—(१) आगरकरांवरील चरित्रात्मक निबंध (मा० दा० आळ-तेकर); (२) आगरकर अंक (मनोरंजन-जुलै १९१६); (३) टिळक-चरित्र (न० चिं० केळकर); (४) आगरकर—अर्वाचीन मराठी वाङ्मय-सेवक खंड१ (गं० दे० खानोलकर); (५) आगरकर व्यक्ति व कार्य (वि० स० खांडेकर).

---

# विष्णुशास्त्र्यांच्या पूर्वीचे महाराष्ट्रीय पुढारी

**बाळ गंगाधर टिळकः**—(१८५६ ते १९२०). यांना 'लोकमान्य' या नांवानें पुष्कळ लोक ओळखतात. यावरून लोकमान्यत्व हा त्यांच्या अनेक विशेषांपैकीं एक विशेष स्पष्टपणें कळून येतो. विष्णुशास्त्री चिपळूणकर, आगरकर व टिळक हे डेक्कन कॉलेजांत, 'न्यू इंग्लिश स्कूल'च्या स्थापनेच्या वेळेस व 'केसरी' काढण्याच्या वेळेस जरी एक विचाराचे होते, तथापि त्यांच्या विचारांचे व कार्यांचे प्रवाह पुढें भिन्न दिशांनीं वाहूं लागले. हें असें कां झालें याचा विचार करण्याचें हें स्थल नव्हे.

लो० टिळकांच्या 'केसरी'वर खटले होऊन त्यांना तीनदां तुरुंगवास भोगावा लागला. त्यांतील राजकीय दृष्ट्या न्याय्यान्याय्यता 'काल' ठरवीलच.

हें मात्र निश्चित कीं, त्यांच्या शेवटल्या सहा वर्षांच्या तुरुंगवासानें मराठी वाङ्मयाचा फायदा झाला; कारण 'गीतारहस्या'सारखा अप्रतिम ग्रंथ याच अवधींत लिहून झाला. गीतेचा अर्थ कर्मयोगपर लावण्याचा या ग्रंथांत प्रयत्न केलेला आहे तो तज्ज्ञांना मान्य होवो न होवो, भाषेच्या व विद्वत्तेच्या दृष्टीनें तो सर्वांना आदरणीय झाला आहे. लो० टिळकांचे इंग्रजींतहि दोन ग्रंथ आहेत (पहिल्या प्रथम त्यांनीं इंग्रजींतच ग्रंथ लिहिले) व तेहि विद्वन्मान्य झाले आहेत. त्यांचीं नांवें:—(१) The Orion. (२) The Arctic Home in the Vedas. अलीकडे त्यांच्या चिरंजीवांनीं त्यांचे किरकोळ इंग्रजी लेख व कांहीं अप्रसिद्ध अशीं टांचणें 'Vedic Chronology and Vedang Jyotish' असें नांव देऊन पुस्तकरूपानें प्रसिद्ध केलीं आहेत.

**संदर्भग्रंथः**--(१) टिळक चरित्र (न० चिं० केळकर); (२) आगरकरांवरील चरित्रात्मक ग्रंथ (मा० दा० आळतेकर); (३) टिळक जीवन रहस्य (बापूराव आंबेकर)

---

# माझे कांहीं स्वभावदोष

**धोंडो केशव कर्वे:**-- जन्म १८५६; बी. ए. १८८४; गणिताचे प्रोफेसर–फर्ग्युसन कॉलेज १८९१, अनाथबालिकाश्रम (हिंगणें) स्थापना १९००; महिलाविद्यालय–स्थापना १९०७; निष्कामकर्ममठ–स्थापना १९०८; महिलाश्रम–स्थापना १९१६; महिला विद्यापीठ–स्थापना १९१६.

'प्रत्येक मनुष्याला निदान एक तरी चांगलें पुस्तक लिहितां येईल,-- जर त्यानें आपले खरेखुरे अनुभव अथार्थतेनें व संपूर्णतेनें दिले तर–' असें एका ग्रंथकारानें म्हटलें आहे. मग प्रो० कर्वे यांच्यासारख्या थोर गृहस्थांचें आत्मचरित्र तर केव्हांहि चांगलेंच व्हावयाचें. तें विचाराच्या व बोधाच्या दृष्टींनीच नव्हे तर भाषेच्या दृष्टीनेंहि महत्त्वाचें झालें आहे. व्यक्तिदृष्ट्या प्रो० कर्वे यांचें चरित्र बोधपूर्ण व स्फूर्तिदायक असून महाराष्ट्रांतील २–३ स्त्रीशिक्षणसंस्थांचा इतिहास सदर आत्मवृत्तांत ग्रथित असल्यामुळें त्याला विशेषच महत्त्व आहे. संस्था काढण्यांत व त्या यशस्वी रीतीनें चालवून

दाखविण्यांत कोणत्या अडचणी येतात व कोणतीं धोरणें संभाळावीं लागतात याचीहि समग्र माहिती मनमोकळेपणानें व कांहींहि आडपडदा न ठेवतां— स्वतःचे दोष व चुका देखील प्रांजलपणें कबूल करून— या ग्रंथांत सांगितलेली असल्यामुळें तो फारच मननीय झाला आहे.

प्रो० कर्वे यांचा लेखन हा व्यवसाय नसला. तरी वर्ण्य विषयाची आमूलाग्र माहिती, कार्याबद्दलची खरी आस्था व ध्येयावरची अचल निष्ठा या त्यांच्या गुणांमुळें त्यांच्या लेखनांत सरळपणा, प्रसाद व एक प्रकारचें सहजमाधुर्य हीं दिसून येतात.

मराठी भाषेंत आत्मचरित्रें फार थोडीं आहेत. प्रो० धर्मानंद कौसंबी यांचें 'निवेदन', सातारचे सीताराम गणेश देवधर यांचें 'आत्मचरित्र', प्रो० भाटे यांची आत्मचरित्रपर 'प्रेम की लौकिक' ही कादंबरी, बुकर टी. वॉशिंग्टन यांच्या आत्मचरित्राचें श्री० गुणाजी यांनीं केलेलें 'आत्मोद्धार' नांवाचें मराठी भाषांतर, श्री० पार्वतीबाई आठवले यांनीं लिहिलेलें 'माझी कहाणी', कै. लक्ष्मीबाई टिळक यांचीं 'स्मृतिचित्रें' हीं पुस्तकें विद्यार्थ्यांनीं वाचण्यासारखीं आहेत. श्री० नरसिंह चिंतामण केळकर यांनींहि स्वतःचें चरित्र लिहिलें आहे असें ऐकिवांत आहे; परंतु तें अद्यापि प्रसिद्ध झालेलें नाहीं.

---

## मराठी भाषा आणि तिच्यावर इतर भाषांचा परिणाम

**चिंतामण विनायक वैद्यः**—जन्म—कल्याण, १८ ऑक्टोबर १८६१; शिक्षण—एल्फिन्स्टन हायस्कूल व कॉलेज, बी. ए. १८८०; एम्. ए. १८८२; एल्एल्. बी. १८८४; या चार वर्षांचे अवधींत कॉलेजांत फेलो व सुपरिंटेंडेंट. सर्व परीक्षांमध्यें पहिल्या नंबरचीं अनेक बक्षिसें; वकिली १८८५—१८८६ ( ठाणें ); डि० जज्—उज्जैन ( पगार रु० ५०० ); चीफ जस्टिस् ग्वालेर १८९६; १९०५ मध्यें आजारीपणामुळें नोकरीचा राजीनामा; कॉंग्रेसचें कार्य १९०५ ते १९३०.

वरील टांचणामध्यें चिंतामणराव वैद्य यांच्या विशेष गुणांचा उल्लेखहि आलेला नाहीं. पहिल्यापासूनच ते मोठे विद्याव्यासंगी असून वाङ्मयाच्य

अनेक क्षेत्रांमध्यें त्यांनीं बहुमोल कामगिरी केली आहे. त्यांच्या लेखनाला सुरुवात स्त्रियांच्या उन्नतीसंबंधीं त्यांनीं जी 'अबलोन्नति लेखमाला' 'केसरी' पत्रांतून क्रमशः लिहिली त्या लेखमालेनें १८९० मध्यें झाली. ग्वालेरचें सर-न्यायाधीशाचें काम करीत असतांनाच त्यांनीं 'Mahabharat: a Criticism', 'Riddle of the Raamyan', व 'Epic India' हे चिकित्सात्मक व विद्वत्त्वप्रचुर असे इंग्रजी ग्रंथ लिहिले. 'महाभारत-उपसंहार', 'मध्ययुगीन भारत', 'हिंदु धर्माचीं तत्त्वें', विविधज्ञानविस्तारांत प्रसिद्ध झालेलीं 'निबंध व भाषणें', 'ऐतिहासिक निबंध' (ज्ञानप्रकाश)–या ग्रंथांवरून त्यांची बहुश्रुतता, त्यांचा दांडगा उद्योग, त्यांची स्मरणशक्ति, व तर्कपटुता हे गुण दिसून येतात. 'दुर्दैवी रंगू' या ऐतिहासिक कादंबरींत ऐतिहासिक सत्य व कल्पनेचा विलास यांचा सुंदर मिलाफ झाला असून पुराणाभ्यासजड वाटणाऱ्या विद्वानाच्या हातून विविधरसपरिप्लुत अशी ही सुंदर निर्मिति कशी झाली याचें आश्चर्य वाटतें! 'माझा प्रवास' या त्यांच्या पुस्तकामध्यें कोणी गोडसे या नांवाच्या गृहस्थानें त्यांना सांगितलेली १८५७ सालच्या बंडाची हकीकत मनोरम भाषेंत सांगितलेली आहे. 'History of Mediaeval Hindu India', 'History of Sanskrit Literature' ( Vaidic Period ), 'Shiwaji, the Founder of Maratha Swaraj' हे विद्वत्तापूर्ण ग्रंथ त्यांनीं अलीकडे आठ-दहा वर्षांत लिहिलेले आहेत. त्यांचीं 'श्रीरामचरित्र', 'श्रीकृष्णचरित्र' व 'भारतीय वीरकथा' हीं पुस्तकें विद्यार्थ्यांनीं अवश्य वाचण्यासारखीं आहेत. या सर्व प्रकारच्या लिखाणावरून वाङ्मयाचे दृष्टीनें महाराष्ट्राला ते कसे ललामभूत आहेत हें ध्यानांत येईल. हल्लीं ते महाभारताचें मराठी भाषांतर, संपादन, व संशोधन करीत आहेत.

---

# पळसाला पानें तीनच

**धनुर्धारी** ( रामचंद्र विनायक टिकेकर )–जन्म १८६२. मृत्यु १९०७. शिक्षण धारवाड येथें इंग्रजी ५ इयत्तांपर्यंत. शिक्षण पुरें होण्यापूर्वींच गरिबीमुळें धारवाड येथेंच M. S. M. रेल्वेच्या अकौंट ऑफिसांत नौकरी धरावी

लागली. लौकरच नौकरी सुटून वाङ्मयक्षेत्रांत पडले. केसरी वर्तमानपत्रांत 'धनुर्धारी' नांवानें लिहिण्यास आरंभ केला. धनुर्धारींचे लेख हरतऱ्हेच्या विषयांवर असून त्यांतील वाग्बाण मोठे परिणामकारक असत. त्यांनीं ऐतिहासिक, धार्मिक, औद्योगिक वगैरे विषयांवर बरींचशीं लहान लहान वाचनीय पुस्तकें लिहिलीं आहेत.

'वांईकर भटजी' हें त्यांचें सर्वांत प्रसिद्ध पुस्तक होय. हें पुस्तक स्वतंत्रच असून 'व्हिकार ऑफ वेकफील्ड्' ही कादंबरी कल्पना सुचण्यास निमित्तमात्र झाल्यामुळें उष्टेपणाचा त्याला केवळ नांवाचा विटाळ झाला आहे. धर्नुधारी यांच्या भाषेंत साधेपणा असून खोंचदारपणाहि आहे, सुबोधता असून अर्थगांभीर्य आहे व घरगुती विनोदाचा वर थर असला तरी बुडाशीं तात्त्विक विचारप्रवणता आहे.

( वांईकर भटजींचे सुरुवातीस रा० सा० कानिटकर यांचा प्रस्तावनावजा लेख व त्यांचे चिरंजीवांनीं जोडलेलें चरित्र पाहावें. )

---

## अखेर

**हरि नारायण आपटे**:—( १८६४ ते १९१९ ). यांना विष्णुशास्त्री चिपळूणकर, आगरकर व टिळक हे त्रिवर्ग न्यू इंग्लिश स्कूलमध्यें शिक्षक होते. हरिभाऊंनीं तीनहि गुरूंपासून घ्यावयाचें तें घेऊन आपलें स्वतंत्र ध्येय ठरविलें व एका स्वतंत्र मार्गाचा अवलंब केला. ललितवाङ्मयाच्या द्वारें त्यांनीं देशाभिमान जागृत केला, स्वाभिमान उत्पन्न केला, समाजसुधारणेकडे लोकांचें लक्ष वेधलें, स्त्री-शिक्षणादि कांहीं गोष्टी आदरणीय केल्या, समाजांतील कांहीं व्यंगें चवाठ्यावर आणलीं, व राजकारण हें समाजसुधारणेकडे दुर्लक्ष न करितां स्वार्थत्यागपूर्वक निरपेक्षतेनें आमरण चालविण्याचें व्रत म्हणून उदारबुद्धीनें कसें करावें हें सुचविलें. स्थानिकस्वराज्याच्या कारभारांत व अधिक व्यापक स्वरूपाच्या कार्यांतहि लक्ष घालून ते आपण वाङ्मयाच्या द्वारें शिकविलेलीं तत्त्वें परिस्थितीला अनुसरून कृतींत आणण्याचा प्रयत्न करीत. उषःकाल, केवळ स्वराज्यासाठीं, गड आला पण सिंह गेला, पण लक्षांत कोण घेतो–,

मी, मायेचा बाजार, इत्यादि ऐतिहासिक व सामाजिक कादंबऱ्या सर्वांच्या परिचयाच्या आहेत. संख्या व गुण या दोनहि बाबतींत त्यांचें स्थान उच्च आहे. या कादंबऱ्यांपैकीं 'पण लक्षांत कोण घेतो' याशिवाय इतर कादंबऱ्या प्रथम त्यांच्या 'करमणूक' पत्रांत प्रसिद्ध झाल्या. त्यांनीं 'संत सखूबाई' व 'सती पिंगला' हीं नाटकें व कांहीं प्रहसनेंहि लिहिलीं आहेत. 'विदग्ध वाङ्मय', 'मराठी वाङ्मयाचा अभ्यास', अकोलें येथील व्याख्यान, Wilson Philological Lectures अशीं त्यांचीं कांहीं व्याख्यानें वाचनीय आहेत. 'भासाच्या नाटककथा' व 'स्फुट गोष्टी' हीं त्यांचीं पुस्तकें विद्यार्थ्यांनीं अवश्य वाचावींत. त्यांना संस्कृत व इंग्रजी यांशिवाय बंगाली, फ्रेंच, जर्मन याहि भाषा अवगत असून हरतऱ्हेचीं पुस्तकें वाचण्याचा व संग्रह करण्याचा त्यांना फार नाद असे.

जास्त माहितीकरितां वेणुबाई पानसे व रा० बा० मा० आंबेकर यांनीं लिहिलेलीं हरिभाऊंचीं चरित्रें अवश्य वाचावींत. वा० ना० देशपांडे यांचें पुस्तकहि वाचनीय आहे. विविधज्ञानविस्तारांतील ( १९२० मधील ) काशीबाई कानिटकर यांचा लेख; तसेंच हरिभाऊ आपट्यावरील दोन निबंध ( प्रो० येरवडेकर व श्री० वाग्भट ना० देशपांडे यांनीं लिहिलेले ) हेहि पहावेत. नी० म० केळकर यांनीं नुकतेंच प्रसिद्ध केलेलं हरिभाऊ आपटे या नांवाचें पुस्तक फार मार्मिक आहे.

---

# रायगडावरील संपत्ति

**शिवराम महादेव परांजपे**:—( १८६४–१९२९ ) सालीं एम्. ए. चे परीक्षेंत 'भवानदास प्राईज' व 'गोकुळदासजी झाला वेदान्त प्राईज' हीं त्यांना मिळालीं. लौकरच ते पुणें येथें त्या वेळीं नुकत्याच सुरू झालेल्या महाराष्ट्र कॉलेजमध्यें संस्कृतचे प्रोफेसर झाले, परंतु गणपत्युत्सवांत व राजकारणांत त्यांनीं जो भाग घेतला तो पचण्यासारखा नसल्यामुळें त्यांनीं पुढील वर्षींच राजीनामा दिला. इ. स. १८९७ मध्यें त्यांनीं 'काळ' वर्तमानपत्र काढून तत्कालीन समाजाला व राज्यकर्त्यांना काळाची जाणीव करून दिली.

काळांतील त्यांचे लेख वक्रोक्तिपूर्ण असून मोठे परिणामकारक असत. इतके कीं, सरकारास ते आक्षेपार्ह वाटून त्यांच्यावर इ. स. १९०८ मध्यें खटला भरण्यांत आला व त्यांत त्यांना शिक्षा झाली. राजकारणावरील लेखांशिवाय गंभीर, तात्त्विक, व वाङ्मयात्मक विषयांवरहि त्यांनीं पुष्कळ लेख लिहिले असून ते सर्व विद्वत्तापूर्ण आहेत. त्यांनीं मानाजीराव, कादंबरी, पहिला पांडव इत्यादि नाटकें, आणि कांहीं गोष्टी व कादंबऱ्याहि लिहिल्या आहेत. त्यांचें वक्तृत्व अप्रतिम व वैशिष्ट्यपूर्ण होतें,–तें ऐकलेल्यांना तें विसरणें शक्य नाहीं, व न ऐकलेल्यांना त्याची कल्पना येणें शक्य नाहीं. इ. स. १९२९ सालच्या साहित्यसंमेलनाचें अध्यक्षस्थान त्यांना मिळालें व नंतर लौकरच ते मृत्यु पावले.

इ. स. १९२९ चे रत्नाकरांत श्री० म० माटे, ल० ब० भोपटकर, व दि० वा० दिवेकर यानीं परांजप्यासंबंधी लिहिलेले लेख वाचनीय आहेत.

---

## पेशवाईंतील कांहीं चुका

**विश्वनाथ काशिनाथ राजवाडे**:—( जन्म १८६४. मृत्यु ३१ डिसेंबर १९२६ ). हे मोठे विद्वान्, मार्मिक, अंतर्भेदी व स्वतंत्र प्रतिभेचे इतिहास-भक्त होते. महाराष्ट्रांतील इतिहास-संशोधनाला यांनीं एक स्वतंत्र वळण दिलें हें कोणीहि कबूल करील. त्यांनीं स्वार्थत्यागपूर्वक महाराष्ट्रांतील ‘इतिहासाचीं साधनें’ (कागदपत्रें, शिलालेख, ताम्रपट, नाणीं वगैरे, विशेषतः कागदपत्रेंच) मिळवून लोकांच्या नजरेस आणलीं व त्यावरून स्वतंत्र बुद्धीनें अनुमानें काढण्याचा प्रयत्न केला. त्यांचे कांहीं लेख प्रस्तावनांच्या रूपाचे आहेत; कांहीं स्वतंत्र रीतीने ग्रंथमाला. विश्ववृत्त, सरस्वतीमंदिर इत्यादि मासिक पुस्तकांतून वगैरे छापलेले आहेत. ‘राधामाधव-विलासचंपू’, ‘महिकावतीची बखर’, ‘इतिहासाचीं साधनें’ ( खंड १,४,६ व ८ ) इत्यादि पुस्तकांच्या प्रस्तावना फार महत्त्वाच्या आहेत. ‘भाषांतर’ नामक मासिकांत त्यांनीं प्लेटोच्या कांहीं संवादांचें भाषांतर केलें आहे. मराठी कादंबऱ्यांवरील त्यांचा लेख वाचनीय आहे. ‘संस्कृत भाषेचा उलगडा’ हा ग्रंथ भाषाशास्त्र

व समाज-शास्त्र या दृष्टींनीं फार महत्त्वाचा आहे. 'ज्ञानेश्वरीचें व्याकरण', 'सुबंत-विचार', 'तिङ्त-विचार' हीं पुस्तकें मराठी वैय्याकरण्याला वाचल्याशिवाय गत्यंतर नाहीं अशा योग्यतेचीं आहेत. मराठी छंदांसंबंधीं त्यांनीं एक सुंदर लेख लिहिला होता तो पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाला आहे. यांचे कांहीं सिद्धान्त दिसण्यांत विलक्षण दिसतात, पण सत्य हें पुष्कळ वेळां विलक्षण असते. हे सिद्धान्त मांडण्याची त्यांची पद्धति कित्येक वेळां प्रतिपक्ष्याला अपमानकारक वाटेल अशी होती व त्यांचा स्वभावहि किंचित् सडेतोड होता म्हणून ते लोकप्रिय होणें शक्य नव्हतें; तथापि त्यांच्या बुद्धिमत्तेबद्दल, विद्वत्तेबद्दल व स्वार्थत्यागाबद्दल सर्वत्र आदर होता.

ब्राह्मण्य, जातिभेद वगैरे जुन्या परंपरेबद्दल व मतांबद्दल जरी त्यांच्या मनांत आदर होता असें वाटलें तरी अखेरी अखेरीस त्यांचीं मतें पुराणाभिमानी लोकांना विलक्षण वाटणारीं व अमान्य होणारीं अशीं झालीं.

---

## वर्तमानपत्रकर्ता

**श्रीपाद कृष्ण कोल्हटकरः**—(जन्म १८७१ नागपूर येथें; मृत्यु १९३४). प्राथमिक व दुय्यम शिक्षण अकोला (वऱ्हाड); कॉलेज–डेक्कन. १८९१ बी. ए. हे नाटककार, विनोदी लेखक, मार्मिक टीकाकार, लघुकथालेखक व कादंबरीकार म्हणून प्रसिद्ध होते. त्यांचीं नाटकें:—वीरतनय, गुप्तमंजूष, मूकनायक, मतिविकार, परिवर्तन, वधूपरीक्षा, शिवपावित्र्य, प्रेमशोधन, श्रमसाफल्य, जन्मरहस्य, सहचारिणी; त्यांच्या कादंबऱ्या म्हणजे 'दुटप्पी का दुहेरी ?' व 'श्यामसुंदर' अशा दोनच. त्यांचे बरेच विनोदी लेख 'साहित्य-बत्तिशी' किंवा 'सुदाम्याचे पोहे' या नांवाच्या पुस्तकांत संग्रहित आहेत. त्यांच्या व न० चिं० केळकर यांच्या कांहीं लघुकथा 'कथासप्तकांत' वाचावयास मिळतील. त्यांच्या विवेचनात्मक व टीकात्मक निबंधांचा संग्रह 'कोल्हटकरांचा लेखसंग्रह' या नांवानें प्रसिद्ध झाला आहे. त्यांच्या कांहीं कविता 'गीतोपायन' नांवाच्या संग्रहांत प्रसिद्ध झाल्या आहेत.

'आधुनिक मराठी वाङ्मयांतील विनोदयुगाचे 'प्रवर्तनकार' असें रा. न० चिं० केळकर यांनीं कोल्हटकरांसंबंधीं म्हटलें आहे. पूर्वीं विनोदावरच भर दिलेले लेख नसत; ते लिहिण्यास कोल्हटकरांनीं सुरुवात केली. त्यांच्या विनोदांत शाब्दिक कोट्या तर आहेतच, पण याहून अधिक योग्यतेचा जो विनोद–म्हणजे प्रसंगनिष्ठा, विसंगति, अतिशयोक्ति वगैरेवर आधारलेला जो विनोद–– तोहि यांच्या लेखांत उत्कटत्वानें दिसून येतो. सामाजिक व धार्मिक सुधारणा व्हावी अशा प्रकारचा त्यांच्या लिखाणाचा रोख आहे. अभिमानास थट्टेसारखें चांगलें अंजन नाहीं हा आपला नेहमींचा अनुभव आहे असें ते म्हणतात; व हरतऱ्हेचा दुरभिमान दडवण्याकरितां विनोदात्मक अंजनाचा ते उपयोग करतात. अध्यक्ष ज्योतिष-संमेलन, सांगली, १९२०; अध्यक्ष कवि-संमेलन, पुणें, १९२२; अध्यक्ष साहित्य–संमेलन, पुणें, १९२७.

**संदर्भग्रंथः**—कोल्हटकरांचें चरित्र ( खानोलकर ); कोल्हटकरांचा लेखसंग्रह व त्याला जोडलेली श्री. न० चिं० केळकरांची प्रस्तावना; सर्वसामान्य विनोदासंबंधीं श्री० न० चिं० केळकर यांचें 'सुभाषित व विनोद'; कोल्हटकरांचें आत्मचरित्र; ( कोल्हटकरांचें चरित्र वि० स० खांडेकर व ग० त्र्यं० माडखोलकर लिहीत आहेत तें वाचनीय असणारच. )

---

# संत व सत्संगाची महती

**लक्ष्मण रामचंद्र पांगारकरः**—( जन्म शके १७९४, आषाढ वद्य ११, बुधवार ३१ जुलै १८७२ ). शिक्षण बहुतेक पुणें न्यू इंग्लिश स्कूल, व फर्ग्युसन कॉलेजांत. मॅट्रिक १८९१; बी. ए. १८९९. ५–६ वर्षें पंढरपूर, पुणें व उमरावती येथें शिक्षकाचें काम केल्यानंतर १९०७ चे फेब्रुवारींत त्यांनीं 'मुमुक्षु'स जन्म दिला. हा प्रथम १३ वर्षें साप्ताहिक व नंतर मासिक स्वरूपांत प्रसिद्ध होत आहे. त्यांनीं तीस-एक लहानमोठे ग्रंथ लिहिले असून त्यांपैकीं कांहींचीं नांवें खालीं दिलीं आहेतः—

१९०४—भक्तिमार्गप्रदीप, निबंधमालेचें स्वरूप व कार्य, मोरोपंती वेंचे, १९०८:—मोरोपंतांचें चरित्र; १९१०:—एकनाथचरित्र; व नाथभागवत; १९१२:—ज्ञानेश्वरचरित्र; १९२०:—तुकारामचरित्र; १९२३-२४:—सार्थ दासबोध, मनोबोध; १९३२:—मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड-१, व २.

त्यांनीं महाराष्ट्रभर व बाहेरहि प्रवास, यात्रा, व्याख्यानें व प्रवचनें यांचे योगानें पारमार्थिक वाङ्मय लोकांत प्रसृत केलें. यांची प्रवृत्ति अध्यात्म-मार्गाकडे विशेष असून त्यांची वाणी रसाळ व श्रोत्यांना तल्लीन करून सोडणारी आहे.

---

# माझी आगगाडी कशी चुकली

**नरसिंह चिंतामण केळकर**:—( जन्म १८७२ ). हे मोठे विद्वान्, मार्मिक व चतुरस्र लेखक आणि संपादक आहेत. 'मराठे व इंग्रज' आणि 'सुभाषित व विनोद' हे विवेचनात्मक ग्रंथ; तसेंच 'सरोजिनी', 'नवर-देवाची जोडगोळी' हीं रूपांतरात्मक नाटकें; व 'चंद्रगुप्त', 'तोतयाचें बंड', 'कृष्णार्जुनयुद्ध' व 'भानुदास' हीं त्यांचीं स्वतंत्र नाटकें प्रसिद्ध आहेत. लो. टिळक यांचें मोठें चरित्र, आयर्लंडचा इतिहास, तसेंच गॅरिबाल्डी व आयरिश देशभक्तांचीं चरित्रें यांनीं लिहिलीं आहेत. 'नवलपूरचा संस्थानिक' या नांवाची एक कादंबरीहि त्यांनीं लिहिली आहे. त्यांचे केसरींतील किरकोळ लेखहि पुस्तकरूपानें संग्रहित केलेले आहेत व ते वाचनीय आहेत. समर्पक दाखले, विचारांचा समतोलपणा, सुसंस्कृत विनोदाची छटा, भाषेची ठाकठिकी इत्यादि विशेष त्यांच्या लेखनांत व भाषणांत दिसून येतात.

**संदर्भग्रंथ**:—'केळकर' (त्यांच्या ६१ व्या वर्षाच्या निमित्तानें प्रसिद्ध झालेला मोठा ग्रंथ; यांत त्यांचें चरित्र असून त्यांच्या हरतऱ्हेच्या वाङ्मया-त्मक कामगिरीचें परीक्षण केलें आहे.) एका 'परिचिता'नें 'लोकशिक्षणां'त ऑगस्ट १९३२ मध्यें प्रसिद्ध केलेला टीकात्मक लेख मननीय आहे. **'प्रतिभें'**त ( वर्ष १, अंक १६ मध्यें ) रा. वि. स. खांडेकर यांनीं केळकरांचें स्वभावचित्र काढलें आहे तें वाचनीय आहे.

---

## न्यायाची सूक्ष्म दृष्टि

**कृष्णाजी प्रभाकर खाडिलकरः**—( जन्म १८७२ ). बी. ए. १८९२. १८९२–९४ सांगली हायस्कूलमध्यें शिक्षक. १८९७ केसरी संस्थेंत दाखल. १९०२ नेपालप्रवास. १९०८–१० केसरी मुख्य संपादक. हे प्रथम केसरीच्या संपादकवर्गांतले ओजस्वी लेखक या नात्यानें ख्यातीस आले. टिळकांच्या मृत्यूनंतर ते 'लोकमान्य' नांवाच्या दैनिकाचे संपादक झाले, व नंतर कांहीं वर्षें स्वतःच्या मालकीचें 'नवाकाळ' पत्र ते चालवीत होते. केसरीचे मुख्य संपादक होण्यापूर्वीच त्यांनीं नाट्यलेखनाच्या क्षेत्रांत प्रवेश केला होता ( १९०३ ). मराठी भाषेंत त्यांच्या नाट्यकृती चिरकाल टिकणाऱ्या आहेत. यांचीं कांचनगडची मोहना, सवाई माधवरावांचा मृत्यु, बायकांचें बंड, कीचकवध, भाऊबंदकी, सवतीमत्सर वगैरे गद्य; व मानापमान, विद्याहरण, स्वयंवर, मेनका, द्रौपदी, सावित्री इत्यादि संगीत नाटकें सर्वविश्रुत असून रंगभूमीवर उठावदारपणामुळें लोकप्रिय गणलीं गेलीं आहेत. युरोपीय महायुद्धाच्या कालांत त्यांनीं चित्रमयजगत्मध्यें दरमहा युद्धाची हालहवाल—मागल्या-पुढल्या परिणामांच्या विवेचनासह—लिहिण्याचा क्रम ठेवला होता. केसरींत लिहिलेले यांचे अनेक लेख विचार आणि भाषाशैली या दोन्ही दृष्टींनीं अभ्यास करण्यालायक आहेत.

**संदर्भग्रंथः**—खाडिलकरांची नाट्यसृष्टि ( धारपुरे ); महाराष्ट्र नाट्यकला व नाट्यवाङ्मय ( दंडवते ); नाट्याचार्य खाडिलकर ( शं. ना. सहस्रबुद्धे ).

---

## माझा पहिला डुकर

**जनरल नानासाहेब गणपतराव शिंदेः**—( जन्म १८७६ ). शिक्षण बडोदा कॉलेज. १८९५ मध्यें सैन्यांत नौकरीस आरंभ. १९०५ मध्यें कॅप्टन् कमॅंडिंग, १९१० मेजर कमॅंडिंग; १९१७ ए. डी. सी. टु हिज् हायनेस, व कर्नल कमॅंडिंग; १९२२ काडी जिल्ह्यांत दरवडेखोरांना पकडण्याच्या कामगिरीवर; जी. ओ. सी. १९२७ 'राजरत्न' सुवर्णपदक मिळालें; स्वागताध्यक्ष, साहित्य संमेलन, बडोदें, १९३५.

यांनीं बडोदें संस्थानांतील सैन्यासंबंधींच्या नियमांबद्दल वगैरे कांहीं मराठी व इंग्रजी पुस्तकें संस्थानाकरितां लिहिलेलीं आहेत. यांनीं स्वतः प्रसिद्ध केलेलीं पुस्तकें पुष्कळ व निरनिराळया विषयांवर आहेत. पैकीं कांहीं खालीं दिलीं आहेतः—

१ मराठ्यांच्या प्रसिद्ध लढाया. २ हिंदुस्थानचा लष्करी इतिहास. ३ सुविचाररत्नमाला. ४ शिस्त. ५ एका शिपायाचें आत्मचरित्र.

शिकारीसंबंधानें, पानपतच्या वगैरे लढायांसंबंधानें त्यांनीं अनेक मासिकांत जे लेख लिहिलेले आहेत ते पुस्तकरूपानें संग्रह करण्यासारखे आहेत. लढाया, शिकार, खेळ वगैरेसंबंधानें त्यांना प्रत्यक्ष माहिती असल्यामुळें त्यांच्या भाषेंत एक प्रकारचा जिवंतपणा असून त्या त्या विषयांतील पारिभाषिक शब्द त्यांच्या लिहिण्यांत सहजगत्याच येतात.

---

## शिवाजी

**अण्णा बाबाजी लठ्ठेः**—(जन्म १८७८). शिक्षण डेक्कन कॉलेज; एम्. ए., एल्एल्. बी. कोल्हापूर येथील राजाराम कॉलेजमध्यें इंग्रजीचे प्रोफेसर ( १९०७–११ ); एज्युकेशनल् इन्स्पेक्टर–कोल्हापूर ( १९१४ ); 'डेक्कन् रयत'चे संपादक ( १९१८–२० ); लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे सभासद ( १९२१–२३ ); युनिव्हर्सिटी रिफॉर्म कमिटीचे सभासद ( १९२४ ); कोल्हापूरचे दिवाण ( १९३० पर्यंत ); पुढें बेळगांवास वकिली. यांचीं पुस्तकें:—

(1) Introduction to Jainism; (2) Growth of British Empire in India; (3) Memoirs of Shahu Chhatrapati, (४) मराठी वर्तमानपत्रें व मासिकें यांतील लेख. हे उदारमतवादी असून समाजसुधारणा व राजकीय सुधारणा यांकडे यांचें विशेष लक्ष आहे. संस्थानी राजकारणासंबंधीं तर ते तज्ज्ञांपैकीं एक आहेत. त्यांच्या मतांमध्यें समतोलपणा असून भाषेंत सरळपणा व स्पष्टवक्तेपणा हे गुण विशेष दृष्टीस पडतात.

---

## विभूति व परिस्थिति

**माधव श्रीहरि ऊर्फ बापूजी अणे:**—(जन्म १८८० ऑगस्ट २९); शिक्षण—बी. ए. १९०२ कलकत्ता; बी. एल्. १९०७; यवतमाळचे सुप्रसिद्ध वकील, व महाराष्ट्रांतील राजकीय पुढाऱ्यांपैकीं धडाडीचे एक. हे केवळ राजकारणांतच लक्ष देतात असें नसून वाङ्मयाचा व्यासंगहि त्यांस पहिल्यापासून आहे. निःशस्त्रप्रतिकार, धर्ममीमांसा, मराठी वाङ्मयांतील मासिकें, इत्यादि निबंध व लेख आणि भाषणें यांचा संग्रह यवतमाळ येथील 'बापूजी वाङ्मयमंडळा'नें प्रसिद्ध केला आहे तो वाचनीय आहे. याशिवाय १०।१५ ग्रंथांस त्यांनीं प्रस्तावना लिहिल्या आहेत. पैकीं आनंदगीत ( भाग १।२।३ ), उत्तमश्लोककृत प्राकृत सप्तशति, लो० टिळकांच्या आठवणी व आख्यायिका, कर्मवीरनें प्रसिद्ध केलेलें लो० टिळकांचें चरित्र, गोसावीसांप्रदाय ( भाग १ ), पतितपरावर्तन, इत्यादि ग्रंथांना लिहिलेल्या प्रस्तावना बऱ्याच विस्तृत व विद्वत्तापरिपूर्ण आहेत. १९२९ सालीं ग्वालेर येथें भरलेल्या साहित्य-संमेलनाचे ते अध्यक्ष होते. सध्यां त्यांनीं 'श्रीकृष्णचरित्र व द्वापरकालीन भरतखंड' आणि 'महाभारतासंबंधीं कांहीं विचार' हे दोन ग्रंथ लिहिण्याकरितां हातीं घेतले आहेत. १९२० पासून १० वर्षें वऱ्हाड प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचे अध्यक्ष. १९२३ वऱ्हाडतर्फे असेंब्लींत सभासद.

यांची भाषा सरळ, ओजस्वी व जुन्या संस्कृत वाङ्मयांतील दाखले, श्लोक, उपमादि अलंकार, इत्यादिकांनीं युक्त अशी असते.

**संदर्भग्रंथ:**—१ अणे यांचें चरित्र (श्री० स. ह. बल्लाळ यांनीं लिहिलेलें). २ लोकनायक अणे यांचे लेख व भाषणें (संग्राहक—भीमराव हणमंत जतकर, यवतमाळ). ३ लो० ना० बापूजी अणे (दा. वै. आठल्ये, लोकशिक्षण, नोव्हेंबर १९३२).

---

## 'हक्क' का 'प्रेम'

**वामन मल्हार जोशी:**—( जन्म १८८३ ). शिक्षण डेक्कन कॉलेज, बी. ए. १९०४; फेलो १९०४–६; एम्. ए. १९०६. समर्थ विद्यालयाला

मिळाले १९०७; मराठा व मेसेज् यांचे उपसंपादक १९१३–१६; 'विश्ववृत्ता'चे सहसंपादक १९१८; १९१८ पासून प्रोफेसर (मराठी व मानसशास्त्र); भारतवर्षीय महिला विद्यापीठ; आजन्म–सेवक अनाथ बालिकाश्रम मंडळ–हिंगणें १९२० पासून; अध्यक्ष साहित्यसंमेलन, मडगांव १९३०. यांनीं रागिणी, नलिनी, सुशीलेचा देव आणि 'इन्दु काळे व सरला भोळे' या चार कादंबऱ्या; 'आश्रम-हरिणी' ही एक लहानशी कादंबरी; 'नीतिशास्त्र-प्रवेश' व 'साक्रेटिसाचे संवाद' हीं दोन गंभीर विषयांवरील पुस्तकें; 'नवपुष्पकरंडक' हें किरकोळ गोष्टींचा वगैरे संग्रह करणारें पुस्तक; तसेंच 'विचार-विलास' हें निरनिराळ्या प्रकारच्या लेखांचें संग्रहात्मक पुस्तक, अशा प्रकारची वाङ्मयसेवा केली आहे. रा० न. र. फाटक 'गद्यमुक्ताहारांत' म्हणतातः—

"यांनीं लिहिलेल्या कादंबऱ्यांत 'रागिणी' ही कादंबरी विशेष लोकप्रिय झाली आहे. यांचे लेख समतोल, विचारप्रवर्तक व ज्ञानप्रचुर असे असतात. यांनीं लिहिलेल्या वाङ्मय विषयावरील टीका बहुतेक 'विविधज्ञानविस्तारांतून' प्रसिद्ध झाल्या आहेत; आणि त्या टीकांचा रोख ग्रंथकाराचें रहस्य ओळखून त्याच्या कृतीशीं समरस होऊन गुणदोषविवेचन करावयाचें असा असतो."

**संदर्भग्रंथः**—'रत्नाकर'मधील १९३० एप्रिलच्या अंकांत रा. येरवडेकर यांनीं लिहिलेलें चरित्र पहा. तसेंच 'मे'च्या अंकांतील प्रो० मायदेव यांनीं लिहिलेलें स्वभावचित्र; ना. म. पटवर्धन यांनीं 'प्रतिभें'त लिहिलेलें स्वभावचित्र; रा० रा. प्र. कानेटकर यांनीं लिहिलेलें चरित्र.

---

# महानुभावीय मराठी वाङ्मय

**यशवंत खुशाल देशपांडेः**—वऱ्हाडांतील प्राचीन देशपांडे घराण्यांत जन्म (ता. १४-९-१८८४). शिक्षण अमरावती व मुंबई येथें; मराठी व इंग्रजी विषय घेऊन त्यांनीं एम्. ए., एल्एल्. बी. झाल्यावर यवतमाळ येथें वकिलीचा व्यवसाय सुरू केला. प्राचीन मराठी वाङ्मय आणि इतिहास

यांच्या संशोधनाचा पहिल्यापासून व्यासंग. संशोधनाचें केंद्र वऱ्हाडांत व्हावें म्हणून यवतमाळ येथें 'शारदाश्रम' संस्था स्थापन केली. महानुभावीय मराठी वाङ्मय, विष्णुदासांची कविता, श्रीऋद्धिपूरवर्णन हे ग्रंथ व कांहीं निबंध या मंडळामार्फत प्रसिद्ध करविले आहेत. प्राचीन मराठी वाङ्मयांतून नरेंद्रकविकृत लीलाचरित्र, रुक्मिणीहरण, इत्यादि ग्रंथ सटीप व विचिकित्सक प्रस्तावनांसह लौकरच प्रसिद्ध करणार आहेत. हे नागपूर युनिव्हर्सिटीचे सभासद, इंडियन् हिस्टॉरिकल् रेकर्डस् कमिशन्चे ३ वर्षें सभासद असून वाङ्मयक्षेत्रांत त्यांनीं चांगलें नांव मिळविलेलें आहे.

यांची भाषा अलंकारादिकांनीं मंडित नसली तरी साधेपणा व सरळपणा यांमुळें आणि संशोधकाची वृत्ति तिच्यांत प्रतिबिंबित होत असल्यामुळें ती लोकांना प्रिय होते.

---

# कवितेचें कर्तृत्व

**राम गणेश गडकरीः**—( १८८५ ते १९१९ ) हे कवि, विनोदी लेखक व नाटककार म्हणून प्रसिद्ध आहेत. कवित्वाच्या बाबतींत 'केशवसुत' व बाकीच्या दोन बाबतींत त्यांनीं श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांना प्रथम गुरु केलेलें दिसते. पण गडकऱ्यांचेंहि वैशिष्ट्य आहेच आहे. 'वाग्वैजयंती' नांवाच्या पुस्तकांत त्यांच्या बहुतेक स्फुट कविता प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यांचीं नाटकें म्हणजे–( १ ) प्रेमसंन्यास, ( २ ) पुण्यप्रभाव, ( ३ ) भावबंधन, ( ४ ) एकच प्याला व ( ५ ) राजसंन्यास ( अर्धवट राहिलेलें ). 'वेड्यांचा बाजार' हें फार्सवजा नाटक व 'मूकनायक' नांवाचें अगदीं लहान—पांच मिनिटांत वाचून होईल असें नाटक हींहि वाचनीय आहेत. 'संपूर्ण बाळकराम' या पुस्तकांत त्यांचे बरेचसे विनोदी लेख आलेले आहेत.

**संदर्भग्रंथः**—( १ ) गडकरी– व्यक्ति व वाङ्मय ( वि. स. खांडेकर ); ( २ ) गडकऱ्यांचा विनोद ( शि. गो. भावे ); ( ३ ) गडकरी ( हर्षे ); ( ४ ) संपूर्ण बालकराम या पुस्तकास लिहिलेली रा. अत्रे यांची प्रस्तावना.

---

# एका अस्पृष्टाच्या डायरींतील पानें

**श्रीपाद महादेव माटेः**—( जन्म १८८६ ). शिक्षण सातारा व पुणें येथें. एम्. ए. मराठी विषय घेऊन. बी.ए. झाल्यापासून शिक्षकाचें काम. ( प्रथम न्य इंग्लिश स्कूलमध्यें, नंतर नूतन मराठी विद्यालयांत. आतां सर परशुरामभाऊ कॉलेजांत प्रोफेसर. ) उत्तम शिक्षक म्हणून त्यांची फार ख्याति आहे. १९०८ मध्ये 'काळ' पत्रांत व नागपूरच्या 'देशसेवकां'त त्यांनीं कांहीं लेख लिहिले. लेखनाचा हा उपक्रम आतांपर्यंत चालू आहे. १९१७ पासून अस्पृश्योद्धाराचें काम त्यांनीं हातीं घेतलें असून त्यांत ते मानापमान न पाहतां, जिवापाड मेहनत करीत आहेत. सामाजिक सुधारणा ही समाज-शास्त्राला धरून असावी असा त्यांचा कटाक्ष आहे; व ते समाजशास्त्राचाहि चांगला अभ्यास करीत असतात. अस्पृश्योद्धार वगैरे सामाजिक प्रश्नांसंबंधीं तसेंच वाङ्मयात्मक विषयावरहि त्यांनीं केसरी, रत्नाकर वगैरे नियतकालिकां-त लेख लिहिले असून 'बालकवि' व 'माधवानुज' यांच्या कवितासंग्रहांना त्यांनीं मोठ्या मार्मिक प्रस्तावना लिहिल्या आहेत. त्यांनीं कांहीं कविताहि लिहिलेल्या आहेत. 'पाश्चात्य पुरुषश्रेष्ठ' या पुस्तकांत त्यांनीं कांहीं पाश्चात्य थोर पुरुषांचीं चरित्रें दिलीं असून तीं वाचनीय आहेत. यांनीं 'केसरीप्रबोध' व 'महाराष्ट्र सांवत्सरिक' असे दोन उपयुक्त संदर्भ-ग्रंथ संपादिलेले आहेत. 'अस्पृष्टाचा प्रश्न' हा ग्रंथ त्यांच्या नांवलौकिकांत भर घालणारा आहे.

माटे यांच्या भाषेंत जुनीं काव्यें, बखरी, वगैरेंतील शब्द, त्याचप्रमाणें खेड्यांत राहणाऱ्या लोकांच्या तोंडीं असलेले शब्द हे मधून मधून पेरलेले असतात. त्याचप्रमाणें नवीन शब्द बनविण्याची त्यांना फार आवड आहे. यामुळें त्यांच्या भाषेंत पुष्कळ वेळां सामर्थ्य व अर्थानुगामित्व उत्पन्न झालें असलें तरी क्वचित् प्रसंगीं थोडासा क्लिष्टपणा व विजोडपणा हे दोष उत्पन्न झालेले दिसतात.

---

# तीन नाट्यछटा

**शंकर काशीनाथ गर्गे:**—हे 'दिवाकर' या नांवानें नाट्यछटा लिहीत असत. यांचा जन्म सन १८८९ सालीं पुणें येथें झाला व ते १ ऑक्टोबर सन १९३१ रोजीं वारले. त्यांचें सर्व शिक्षण पुणें नूतन मराठी विद्यालयांत झालें; व ते १९१६ पासून अखेरपर्यंत नू० म० विद्यालयांतच इंग्रजीचें प्रत्यक्ष पद्धतीनें शिकविणारे एक नाणावलेले शिक्षक म्हणून प्रसिद्ध होते. मध्यंतरींच्या काळांत ( १९०९ ते १२ पर्यंत ) ते पोलीस सुपरिंटेंडेंटचे ऑफिसमध्ये होते. पुढें १९१२–१५ पर्यंत डिप्रेस्ड् क्लासेस मिशनच्या सेंट्रल प्रायमरी स्कूलमध्यें शिक्षक होते. वयाच्या अकरा-बाराव्या वर्षापासून यांना सुप्रसिद्ध नट गणपतराव जोशी यांच्या शाहू नगरवासी नाटक मंडळीच्या नाटकांचे प्रयोग पाहण्याचे बरेच योग आले. यांच्या वडिलांना नाटकांचा बराच नाद असल्यामुळें गर्गे यांना अभिनयकुशल नटांचीं नाटकें पाहण्याची संधि लाभली, व या निमित्तानें गद्य नाटकांतील स्वगत भाषणांचा त्यांच्यावर बराच परिणाम झाला होता. कै० प्रि० वा. ब. पटवर्धन यांच्या साहचर्यानें त्यांना इंग्लिश कवि ब्राउनिंग याच्या काव्याची गोडी लागली. ब्राउनिंगचे Dramatic Monologues ( आत्मकथनात्मक एकपात्री संभाषणें ) वाचून यांना नाट्यछटा लिहिण्याची स्फूर्ति झाली. नाट्यछटा हें नांव कै० वा. ब. पटवर्धन यांनीं सुचविलें. मराठी आधुनिक कवींपैकीं केशवसुत यांचे हे मोठे भक्त होते. १९१३ सालीं यांनीं केसरींत नाट्यछटा लिहिण्यास सुरुवात केली. यांच्या नाटयछटा सुमारें ६० असून त्या पुस्तकरूपानें एकत्र प्रसिद्ध झाल्या आहेत. नाटयछटेचा प्रकार कै० दादा गोगटे यांनीं मनोरंजनमध्यें 'नेपथ्यपाठ' लिहून व रा० कुलकर्णी यांनीं 'करमणुकी'मध्यें तसेच लेख लिहून १९१० चे सुमारास सुरू केला होता; पण त्या वेळीं नाटयछटा हें नांव रूढ नव्हतें. हें नांव व हा प्रकार रूढ करण्याचा मान गर्गे यांचा आहे ( विविधवृत्त १६ जुलै १९३३ पहा. )

लिहिलेलीं पुस्तकें:—'कारकून', 'आय्. सी. एस्.' हीं नाटकें आहेत. सदरहू नाटकांचीं पुस्तकें अप्रसिद्ध आहेत. तीं लवकरच प्रसिद्ध होतील.

---

# कहाणी

**दत्तो वामन पोतदारः**—जन्म शके १८१२. मुक्काम चिरवाडी, जि० कुलाबा. कऱ्हाडा ब्राह्मण, गोत्र अत्रि. मॅट्रिक ( नू० म० विद्यालय, शके १८२८ ); बी. ए. ( फर्ग्युसन कॉलेज १८३२ ); शिक्षक ( नू० म० विद्यालय शके १८३४ ); आजीव-सभासद ( शिक्षण–प्रसारक मंडळी, शके १८३७ ).

यांचा स्वदेशाभिमान व स्वभाषाभिमान प्रसिद्ध असून त्यांचें कर्तृत्वहि वाखाणण्याजोगें आहे. इतिहास-संशोधनाकडे त्यांचें विशेष लक्ष असून पुणें येथील इतिहास-संशोधन मंडळाच्या आधारस्तंभांपैकीं ते एक आहेत. १८३४ ते ३९ पर्यंत वसंत व्याख्यान-मालेचे ते चिटणीस होते. त्यांचें 'मराठी गद्याचा इंग्रजी अवतार' हें शके १८४४ मध्यें प्रसिद्ध झालेलें पुस्तक मराठी गद्याच्या इतिहासजिज्ञासूंस अत्यंत उपयुक्त आहे. रा० न. चिं. केळकर यांनीं लिहिलेल्या 'मराठे व इंग्रज' या पुस्तकाचें रा. पोतदारांनीं केलेलें विस्तृत परीक्षणहि ( 'मराठे-इंग्रज परीक्षण' शके १८४४ ) वाचनीय आहे. त्यांनीं शाळांतील मुलांना वेळोवेळीं केलेला 'वासंतिक उपदेश' विद्यार्थ्यांना फार बोधप्रद आहे. त्यांचे दुसरेहि अनेक लेख मराठी मासिकांत निरनिराळ्या वेळीं प्रसिद्ध झाले आहेत. ते इंडियन हिस्टॉरिकल रेकर्ड कमिशनचे जादा जोड-सभासद होते.

त्यांची भाषा अस्सल मराठी वळणाची असून तिच्यांतील लहान लहान, ठसकेबाज, जुन्या ऐतिहासिक शब्दांनीं व वाक्प्रचारांनीं युक्त अशा वाक्यांनीं तिला एक प्रकारचें वैशिष्टय आलें आहे.

---

# पश्चात्तप्त भिक्षु

**चिंतामण विनायक जोशीः**—जन्म पुणें येथें १९ जानेवारी १८९२ रोजीं. शिक्षण–नूतन मराठी विद्यालय व फर्ग्युसन कॉलेजामध्यें. एम्. ए. झाल्यावर ४ वर्षें यांनीं शिक्षकाचें काम केलें. १९२० ते १९२९ पर्यंत

बडोदा कॉलेजांत मराठी, इंग्रजी व पाली भाषांचे प्रोफेसर झाले. त्यांतच १९२८ मध्यें बडोदें राज्याच्या मुख्य दफ्तरदाराचे जागीं नेमणूक झाली व त्याच जागीं हल्लीं आहेत. बडोदा येथील दहाव्या साहित्यसंमेलनाचे ते चिटणीस होते; त्याचप्रमाणें 'सहविचार' द्वैमासिकाचे सहसंपादक होते. त्यांचे विनोदी लेख वेळोवेळीं निरनिराळ्या मासिकांतून प्रसिद्ध झाले आहेत. त्यांनीं 'एरंडाचें गुऱ्हाळ', 'संशयाचें जाळें', 'जातकांतील निवडक गोष्टी', 'मॅन्युअल ऑफ् पाली', 'सद्धम्मप्पकासिनी', 'वायफळाचा मळा' इत्यादि पुस्तकें लिहिलीं आहेत. यांच्या लेखनांत स्वतंत्रता, विनोद व एक प्रकारचा खोंचदारपणा हे गुण दृष्टीस पडतात. (रा० वा. वि. जोशी, वकील बडोदें, यांनीं २७।३।३३ च्या 'प्रतिभे'च्या अंकांत प्रो० जोशी यांचें स्वभावचित्र काढलेलें आहे तें पहा.)

---

## बेगम दिलआरा

**सौ० आनंदीबाई शिर्के:**—जन्म १८९२ बडोदें येथें. प्राथमिक शिक्षण बडोदें संस्थानांत निरनिराळ्या प्रांतीं गुजराथींतून व मराठींतून. यांची युनिव्हर्सिटीची कोणतीहि परीक्षा झाली नाहीं, तथापि त्या इंग्रजीहि जाणतात; त्यांना हिंदीहि येतें. हरिभाऊ आपटयांची 'पण लक्षांत कोण घेतो' व गुजराथींतील 'सरस्वतिचंद्र' या कादंबऱ्या अगदीं लहानपणींच त्यांच्या वाचनांत आल्या. "इतक्या लहानपणीं कीं, त्या काल्पनिक कादंबऱ्या न वाटतां, खऱ्याखुऱ्या गोष्टी मला त्या वेळीं वाटत" असें त्या एके ठिकाणीं म्हणतात. वरील कादंबऱ्यांप्रमाणें आपणहि खऱ्या गोष्टी सभोंवतालांतून शोधून काढून लिहाव्या असें तेव्हांपासून त्यांस वाटूं लागलें. यांचें माहेरचें नांव अनसूया असें होतें. तथापि त्यांनीं प्रथम 'कुमारी आनंदी' हें टोपण नांव घेऊन कांहीं गोष्टी लिहिल्या. 'शारदाबाईचें संसारचित्र' ही त्यांची पहिली गोष्ट असून ती १९१० सालीं मासिक मनोरंजनामध्यें प्रसिद्ध झाली. 'बेगम दिलआरा' ही 'मराठा मित्र' मासिकांत प्रसिद्ध गोष्ट श्री० तात्यासाहेब कोल्हटकर यांना फार आवडून त्यांनीं लेखिकेस एक अभिनंदनपर पत्र लिहिलें होतें. श्री० कोल्हटकर यांचें वरील गोष्टीकडे जसें लक्ष

वेधलें तसेंच आणखी एका व्यक्तीचेंहि लक्ष वेधलें व ती व्यक्ति म्हणजे त्या वेळचे 'मराठा मित्र' मासिकाचे सहसंपादक श्री० शी. स. शिर्के ही होय. 'कु० आनंदी' यांच्या मराठा मित्र मासिकांत प्रसिद्ध झालेल्या सर्व गोष्टी रा० शिर्के यांच्या नजरेखालून जात; तथापि १९१३ एप्रिलपर्यंत उभयतांचा प्रत्यक्ष परिचय नव्हता. नंतर त्याच वर्षी १८ डिसेंबरला उभयतांचा विवाह झाला. श्री० शिर्के हे डिस्ट्रिक्ट स्कूल बोर्डाचे ॲड्मिनिस्ट्रेटिव्ह ऑफिसर आहेत, व सौ० आनंदीबाई शिर्के याहि त्याच बोर्डांत गेलीं ७ वर्षे सभासद आहेत. त्यांच्या गोष्टींचा दुसरा संग्रह 'कुंजविकास' नांवाचा दोन वर्षांपूर्वी प्रसिद्ध झाला आहे.

---

## स्वार्थत्यागाची मीमांसा

**नारायण सीताराम फडके**:—जन्म ४–८–१८९४. मॅट्रिक्युलेशन नू० म० विद्यालय; एम. ए. फर्ग्युसन कॉलेज; १९१६–१९ प्रोफेसर न्यू पूना कॉलेज; १९२६ पासून प्रोफेसर राजाराम कॉलेज, कोल्हापूर. हे इंटर-मीजिएटचे वर्गांत असतांनाच लेख लिहूं लागले. यांची 'अल्ला हो अकबर' ही पहिली कादंबरी ते एम्. ए. चा अभ्यास करीत असतांना ( १९१६ ) प्रसिद्ध झाली. आज त्यांच्या नांवावर २०–२५ पुस्तकें प्रसिद्ध असून त्यांपैकीं ७–८ कादंबऱ्या आहेत. या कादंबऱ्यांपैकीं 'अटकेपार', 'दौलत', 'जादूगार', 'निरंजन', 'उद्धार' व 'कलंकशोभा' या विशेष लोकप्रिय आहेत. 'काश्मीरचा गुलाब' या नांवाची त्यांची कादंबरी लवकरच प्रसिद्ध होणार आहे. यांनीं युगांतर नाटक लिहिलें आहे. यांच्या गंभीर स्वरूपाच्या पुस्तकां-पैकीं 'प्रतिभासाधन', 'आजकालच्या तरुण स्त्री-पुरुषांपुढील प्रश्न', 'मानस-मंदिर', 'आधुनिक गीता' हीं विशेष प्रसिद्ध आहेत. पहिल्या पुस्तकाला आधारभूत असे अनेक ग्रंथ असले तरी विद्वानांचे विचार पचवून व स्वतः विचार करून त्यांनीं तें लिहिलें असल्याबद्दल त्यांत प्रत्यन्तर पुरावा आहे. या ग्रंथामुळें मराठी टीकाशास्त्रात्मक ग्रंथांमध्यें चांगली भर पडलेली आहे. चरित्रात्मक वाङ्मयामध्येंहि त्यांनीं भर घातली असून त्यांचे स्फुट निबंध व किरकोळ लेख तर पुष्कळच आहेत. यांतील कांहीं व्यक्तिवैशिष्ट्यात्मक सुंदर

निबंध 'गुजगोष्टी' नांवाच्या वाचनीय पुस्तकांत संग्रहित आहेत. त्यांनीं इंग्रजींतहि ( Sex Problem in India, Psychology वगैरे ) कांहीं पुस्तकें लिहिलीं आहेत.

हुबेहूब वर्णन करण्याची त्यांची हातोटी वाखणण्यासारखी असून त्यांच्या भाषेमध्यें एक प्रकारचा विलास, खेळकरपणा व नटवेपणाहि आहे. ललित-कलांवर त्यांची योग्य भक्ति आहे व याचें एक लहानसें उदाहरण म्हणजे त्यांच्या कादंबऱ्यांतील कांहीं नायक इतर कादंबऱ्यांतील नायकांप्रमाणें ठरीव ठशाचे नसून कलेचे अनन्य भक्त आहेत. कलाविलासामध्यें ध्येयाची फारशी लुडबूड नसावी असें जरी त्यांचें मत दिसलें तरी व्यवहार हा ध्येयशून्य असावा असें त्यांचें मुळींच मत नाहीं. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे व्यवहाराला काल्पनिक ध्येयांच्या अस्मानांत न चढवितां उलट स्वर्गीय ध्येयें भूमीवरील व्यवहारांत कशीं उतरवितां येतील हें त्यांनीं सांगितलें आहे.

( व्यक्तिपरिचयाकरितां ३ जुलै १९३३ च्या 'प्रतिभे'तील प्रो० वाडेकरांचा लेख पहा. )

---

## सुंदर चित्र

**विष्णु सखाराम खांडेकरः**—जन्म ( १८९८ ). शिक्षण प्राथमिक व दुय्यम सांगली येथें. पुढें फर्ग्युसन कॉलेजांत इंटरपर्यंत. शिरोडें ( जि० रत्नागिरी ) येथील टयुटोरिअल इंग्लिश स्कूलचे हे हेडमास्तर असून सावंत-वाडी येथें प्रसिद्ध होणाऱ्या 'वैनतेय' साप्ताहिकाच्या वाङ्मयविभागाचे हे संपादक आहेत. १९३५ सालीं भरलेल्या गोवें प्रांताच्या साहित्यसंमेलनाचे ते अध्यक्ष होते. यांचीं प्रकाशित पुस्तकें:—हृदयाची हांक, कांचनमृग, उल्का, दोन ध्रुव (कादंबऱ्या); रंकाचें राज्य (नाटक); नवमल्लिका, ऊन-पाऊस, दंव-बिंदु (कथासंग्रह); गडकरी—व्यक्ति व वाङ्मय; आगरकर—व्यक्ति व कार्य (चरित्रात्मक निबंध); वायुलहरी ( कलात्मक निबंध ). रा. खांडेकर व रा. माडखोलकर श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांचें चरित्र लिहीत आहेत तें लवकरच प्रसिद्ध होईल. खांडेकरांनीं 'छाया' या चित्रपटाचें कथानक लिहून त्या क्षेत्रांतहि पदार्पण केलें आहे.

हे कोल्हटकरांच्या पट्टशिष्यांपैकीं एक असून त्यांच्या लिखाणाची यांचेवर बरीच छाया पडली आहे, त्यांच्या भाषेंत चमत्कारपूर्ण अलंकार व व मार्मिक कोटया पुष्कळ असतात, परंतु अतिरेकामुळें क्वचित् प्रसंगीं दोष उत्पन्न होतो. आधुनिक लघुकथालेखकांमध्यें तें पहिल्या पंक्तींतले असून टीकालेखकांमध्यें व कादंबरीकारांमध्यें त्यांचें स्थान बरेंच उच्च आहे. त्यांच्यामध्यें वक्तृत्वकलाहि चांगली आहे. ( चरित्राकरितां 'प्रतिभा' वर्ष १, अंक ११ पहा. )

---

# बोकड व माणूस

**प्रल्हाद केशव अत्रेः**--( जन्म १८९८ ). शिक्षण–म० ए० सो० चें हायस्कूल व फर्ग्युसन कॉलेज, पुणें. १९१९ त बी. ए. झाल्यावर मुंबई येथील भर्डा हायस्कूलमध्यें शिक्षकाची नोकरी केली, व पुढें लौकरच तेथील बी. टी. कॉलेजमध्यें जाऊन त्या परीक्षेंत त्यांनीं १ ला नंबर मिळविला ( १९२६ ) बी. टी. झाल्यावर कांहीं वर्षें ते पुणें येथील 'कँप एज्युकेशन सोसायटी'मध्यें हेडमास्तर म्हणून काम करीत होते. १९२८ मध्यें ते शिक्षणशास्त्राचा विशेष अभ्यास करण्याकरितां विलायतेस गेले व तेथील टी. डी. च्या परीक्षेंतहि त्यांनीं उत्तम लौकिक मिळविला. परत आल्यावर पुन्हा ते आपल्या मूळच्या जागेवर रुजू झाले, व सध्यां ते तेथेंच काम करीत आहेत. महाराष्ट्रांतील प्रमुख शिक्षणशास्त्रज्ञांमध्यें त्यांची गणना होते. नुकतेंच त्यांनीं पुण्यासच 'आगरकर हायस्कूल' काढलें आहे. ते 'मनोरमा' व 'अध्यापन' मासिकाचे संपादक होते.

यांनीं 'केशवकुमार' या नांवानें बऱ्याच कविता लिहिल्या आहेत; व त्यांतील कांहीं विनोदी कवितांचा संग्रह 'झेंडूचीं फुलें' या नांवानें प्रसिद्ध झाला आहे. या पुस्तकानें त्यांना विशेष कीर्तीचा लाभ करून दिला; कारण अशा विनोदात्मक, उपहासात्मक, किंवा विडंबनात्मक कवितांचा इतका चांगला संग्रह मराठी वाङ्मयांत अपूर्व होता. महाराष्ट्रशारदा भाग २ यांत त्यांनीं आधुनिक कवींच्या कवितांचा संग्रह केला आहे. गुरुदक्षिणा,

वीरवचन, साष्टांग नमस्कार, घराबाहेर, भ्रमाचा भोपळा, उद्यांचा संसार इत्यादि नाटकें त्यांनीं लिहिलीं आहेत. नाटकासंबंधीं एक चर्चात्मक पुस्तक लिहिण्याचें त्यांनीं योजिलें आहे. तें प्रसिद्ध झाल्यास एका चांगल्या पुस्तकाची भर पडेल.

यांचें गद्यलेखनहि मार्मिक व विनोदपूर्ण असतें. त्यांच्या कांहीं लघु-कथाहि वाचनीय आहेत. यांनीं प्रचलित क्रमिक पुस्तकांतील दोप लेखांच्या व व्याख्यानांच्या द्वारें लोकांपुढें मांडले असून स्वतःच्या कल्पनेप्रमाणें कांहीं शालोपयोगी क्रमिक पुस्तकें त्यांनीं तयार केलीं आहेत.

---

## मोरोपंतांनीं देशाभिमानाचीं काव्यें कां लिहिलीं नाहींत ?

श्रीनिवास नारायण बनहट्टीः—(जन्म तारीख ६ मार्च १९०१). शिक्षण—पुणें, डेक्कन कॉलेज. १९२१ ते १९२३ दक्षिणाफेलो, डेक्कन कॉलेज. एम. ए. १९२३; या परीक्षेंत 'झाला वेदान्त प्राईज' वगैरे ३–४ बक्षिसें. एल्‌एल्. बी. १९२५; मराठीचे अध्यापक—एल्‌फिन्स्टन कॉलेज, मुंबई १९२६–२७; मराठीचे अध्यापक मॉरिस कॉलेज, नागपूर १९२७.

यांचे वडील नारायण दासो बनहट्टी हे मोठे व्युत्पन्न लेखक असून त्यांच्या चिरंजीवांचें संस्कृत-विपयक प्रेम व बहुश्रुतता हीं वडिलार्जित आहेत. यांनीं 'मयूरकाव्यविवेचन' हा ग्रंथ लिहून मोरोपंतांविषयींच्या वाङ्मयांत चांगली भर घातली आहे. 'ज्ञानोपासना' व 'भारतीयांचें कर्तव्य' या ग्रंथांत त्यांची बहुश्रुतता व व्यापक आणि मार्मिक बुद्धि दिसून येतात. यांनीं 'विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचे आधुनिक आक्षेपक', 'मराठी वाङ्मयाचें आणखी एक अज्ञात दालन', 'लोकमान्य टिळकांचीं धर्मविषयक मतें', 'मराठी वाङ्मयाची पाठशुद्धि' इत्यादि बरेच लेख निरनिराळ्या मासिकांत लिहिलेले आहेत. यांच्या लेखांत कोट्या, अलंकार वगैरेचा लखलखाट नसला तरी विवेचनाची सूक्ष्मता, विचाराचा समतोलपणा व भाषेचा भारदस्तपणा इत्यादि

गुण दिसून येतात. यांनीं 'नवभारत ग्रंथमाला' नांवाची एक ग्रंथमाला संपादिलेली आहे.

---

## सुपारी

**यशवंत गोपाळ जोशीः**— जन्म १२ डिसेंबर १९०१, डिक्साळ येथें. शिक्षणः—इंग्रजी ४ थी पास. धंदा लिथोग्राफर.

यांचें शालेय शिक्षण जरी फार– किंबहुना मुळींच– झालेलें नसलें तरी अलीकडील लघुकथालेखकांमध्यें त्यांनीं चांगलेंच नांव मिळविलेलें आहे. यांच्या गोष्टींचा संग्रह 'पुनर्भेट' भाग १ व २ या पुस्तकांत झालेला आहे. यांची 'हिरकणी' ( कादंबरी ), 'संगीत श्रीमुखांत' व 'भोळाशंकर' हीं दोन नाटकें प्रसिद्ध झालीं असून मोरपिसें ही स्वतंत्र सामाजिक कादंबरी व सुखाचा शोध हें नाटक अशीं लवकरच प्रसिद्ध होणार आहेत. " आवडत्या गोष्टी " या नांवाच्या कथासंग्रहाचें यांनीं संपादन केलें आहे.

यांच्या लघुकथांमध्यें काल्पनिक ध्येयें किंवा प्रेमप्रसंग यांचें विशेष वर्णन नसून सर्वसामान्य कुटुंबांमध्यें दिसून येणाऱ्या साध्या व स्वाभाविक प्रसंगांचें रसयुक्त व हृदयस्पर्शी असें वर्णन असतें. प्रसंग नेहमींचे, भाषा साधी, वर्णनें अतिशयोक्तिरहित असें असून देखील त्यांत ध्येयवाद व सुसंस्कृत भावना गर्भित असल्यामुळें त्यांच्या लघुकथा थोड्याच दिवसांत बरीच प्रसिद्धि पावल्या आहेत.

---

# याच लेखकांनीं लिहिलेलीं पुस्तकें

प्रो० वा. म. जोशी, एम्. ए., महिलापाठशाला, एरंडवणें, पुणें ४.

| | | | |
|---|---|---|---|
| * | १ रागिणी ( आवृत्ति ३ री ) | | ३–०–० |
| * | २ आश्रमहरिणी ( आवृत्ति ३ री ) | | ०–६–० |
| * | ३ नलिनी | | २–४–० |
| * | ४ सुशीलेचा देव ( आवृत्ति २ री ) | | २–०–० |
| | ५ इंदु काळे व सरला भोळे | | १–०–० |
| * | ६ नीतिशास्त्रप्रवेश ( आवृत्ति ३ री ) | | ४–०–० |
| * | ७ साक्रेटिसाचे संवाद | | ३–८–० |
| * | ८ नवपुष्पकरंडक | | ०–८–० |
| * | ९ विचारविलास | | ३–०–० |
| * | १० A Gist of the Geeta Rahasya ( प्रती संपल्या ) | | ०–८–० |
| ¶ | ११ वाङ्मयमाला पुष्प १ लें ( आवृत्ति २ री ) रा. ना. म. पटवर्धन यांचे सहकारितेनें | | १–४–० |

प्रि० ना. म. पटवर्धन, एम्. ए., एल्. टी., अध्यापिकाशाला, हिंगणें.

| | | |
|---|---|---|
| * | १ आमची ( दिवाळी ) ( आवृत्ति २ री ) | ०–६–० |
| ‡ | २ जगांतील मौजा ( आवृत्ति २ री ) | ०–६–० |
| ‡ | ३ जगांतील मुलें | ०-१०-० |
| ‡ | ४ साम्राज्यांतील आपले संबंधी | ०-१०-० |
| * | ५ जगांतील प्रमुख पिकें व तीं पिकविणारे लोक | ०–६–० |
| | ६ आमच्या इंदूचें शिक्षण (यशोदा चिंतामणी ट्रस्टनें पुरस्कारिलेलें) | १-०-० |

## हिंगणें येथील अनाथबालिकाश्रम संस्थांमधील इतर लेखक-लेखिकांनीं लिहिलेलीं पुस्तकें

प्रो० धोंडो केशव कर्वे, बी. ए., संस्थेचे संस्थापक.

| | |
|---|---|
| १ आत्मवृत्त ( आवृत्ति २ री ) | ३–०–० |
| २ संक्षिप्त आत्मवृत्त | ०-१२-० |

**श्री० पार्वतीबाई आठवले**, अनाथबालिकाश्रम.

१ माझी कहाणी (आवृत्ति २ री)

२ My Story (Translated by Rev. Abbott)

**डॉ० कमलाबाई देशपांडे**, बी. ए., पीएच्. डी., महिलापाठशाळा, पुणें.

१ गीत-द्विदल (रा० य. न. केळकर यांचे सहकार्यानें) ०–८–०

**कु० बाळूबाई खरे**, बी. ए., महिलाश्रम हायस्कूल, हिंगणें.

*१ अलंकार-मंजूषा ३–८–०

२ हिंदु व्यवहार-धर्मशास्त्र (श्री० का. न. केळकर यांचे सहकार्यानें) ४–०–०

*३ रानफुलें ०–४–०

४ स्त्रियांच्या हक्कांची सुधारणा (श्री० का. न. केळकर यांचे सहकार्यानें) ०–४–०

**कै० गो. म. चिपळूणकर**, एम्. ए., कन्याशाळा, पुणें.

१ Scientific Basis of Women's Educatien. Rs. ३–०–०

**प्रो० वा. गो. मायदेव**, एम्.ए., महिलापाठशाळा, पुणें.

* १ तांबे यांची कविता १–८–०

¶ २ काव्यमकरंद ०-१०-०

* ३ गरिबाची गोष्ट ०–८–०

४ अभिनयगीत (लहान मुलांकरितां गाणीं) ०–६–०

**श्री० भा. धों. कर्वे**, बी. एस्सी., बी. टी., एम्. एड्., अध्यापिकाशाला, हिंगणें.

* १ शिक्षणविषयक नवे विचार ३–०–०

२ "मी कसा झालों!" ०–८–०

**श्री० वि. आ. मोडक**, बी. ए., बी. टी., महिलाश्रम, हिंगणें.

* १ भूगोलावरील कांहीं विचित्र प्राणी १–०–०

‡ २ भूगोलावरील साहसी प्रवासी ०-१०-०

‡ ३ भूगोलावरील वनस्पतींचे प्रदेश ०-१२-०

४ भारतीय बांधवांचे भूप्रदेश

५ वर्णनात्मक भूगोल (बा. गं. नेने यांचे सहाकरितेनें)

**श्री० मा. स. मोने**, अध्यापिकाशाला, हिंगणें.

* १ मराठी भाषेचे व्याकरणकार २-०-०

¶ २ आपलें बोलणें-व्याकरणाचीं क्रमिक पुस्तकें भाग १ ते ४

किंमत अनुक्रमें ३, ४, ५, व ६ आणे

* ६ संक्षिप्त मराठी व्याकरण ( व्ह. फा. परीक्षेच्या उजळणीकरितां ) ०-४-६

७ पंचवार्षिक ( पं. भीष्माचार्यकृत )

[ महानुभावीय वाङ्मय-जिज्ञासूंकरितां ] ०-४-०

८ मराठी व्याकरण व साहित्य--

[ प्रौढ विद्यार्थी व शिक्षक यांजकरितां ] [ छापत आहे ]

श्री० **पतकी**-प्रचलित राज्यव्यवस्था

हीं सर्व पुस्तकें व्यवस्थापक, पुस्तक-विक्री-खातें, हिंगणें बुद्रुक, पुणें ४ येथें विकत मिळतील.

---

* लायब्ररी व बक्षिसाकरितां मंजूर.

‡ पुरवणीवाचनाकरितां मंजूर.

¶ अभ्यास पुस्तक [ टेक्स्ट ] म्हणून मंजूर.

४ भारतीय बांधवांचे भूप्रदेश
५ वर्णनात्मक भूगोल ( वा. गं. नेने यांचे सहकारितेनें )